

॥ मतं मे श्रीशिवराजपुत्रस्य श्रीशंभुराज ॥
॥ छत्रपतेः यदत्रोपरिलेखितं ॥ श्री ॥

स्वराज्यरक्षक

# छत्रपती संभाजी

लेखक : आनंद घोरपडे

# स्वराज्यरक्षक
# छत्रपती संभाजी

– आनंद घोरपडे



❑ जिजाई प्रकाशन ❑

रक्ताच्या नात्याबरोबरच
अंत:करणाचेही नाते जपणाऱ्या
माझ्या सर्व बंधू-भगिनींना समर्पित.

- आनंद

## अनुक्रमणिका

## मनोगत

'शिवछत्रपती समज-अपसमज' हे माझे छोटेसे ऐतिहासिक पुस्तक प्रकाशित झाल्यानंतर माझ्या मनात सहज विचार आला की, शिवरायांचे ज्येष्ठ पुत्र संभाजीराजे यांच्याबद्दल तर ते युवराज असल्यापासून फार मोठ्या प्रमाणावर गैरसमज प्रचलित होते. तपस्वी इतिहास संशोधक वा. सी. बेंद्रे यांनी आपल्या ४०-४२ वर्षांच्या अथक संशोधनानंतर १९६० साली संभाजीराजांवर आपले 'श्रीछत्रपती संभाजी महाराज' हे पुस्तक प्रसिद्ध करेपर्यंत जवळपास २७० वर्षांच्या काळात हे अपसमज अस्तित्वात होते. श्री. बेंद्रे यांच्या पुस्तकानंतर डॉ. सौ. कमल गोखले यांचेही संभाजी महाराजांचे संबंधित अपसमज दूर करणारे 'शिवपुत्र संभाजी' हे अप्रतिम पुस्तक १९७१ साली प्रसिद्ध झाले. त्याहीनंतर १९९० मध्ये 'छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथ' डॉ. जयसिंगराव पवार यांच्या संपादनाने प्रकाशित झाला. त्यात अनेक इतिहासकार व इतिहासतज्ज्ञ यांचे संभाजी महाराजांसंबंधित लेख मिळवून डॉ. पवारांनी प्रत्येक लेखाचा गोषवारा तर दिलाच, पण संभाजी महाराजांवर आधी लिहिल्या गेलेल्या सर्व लिखाणांचा परामर्श घेणारे फार सुरेख असे प्रदीर्घ प्रास्ताविक लिहिले आहे. वरील नमूद तिन्ही पुस्तकांनी, संभाजी महाराजांची मलिन केली गेलेली प्रतिमा साधार पुराव्यांनिशी पूर्णपणे पुसून टाकून, मूलतः संभाजी महाराज कसे साहसी व झुंझार सेनानी, कर्तव्यदक्ष राजा व प्रजाप्रिय असे शिवपुत्र म्हणून शोभेल असेच व्यक्तिमत्त्व होते व त्यांनी औरंगजेबासारख्या सामर्थ्यशाली शत्रूबरोबरच पोर्तुगीज व सिद्दी या सागरी सत्ताधाऱ्यांशी एकाच वेळी दिलेल्या ८-९ वर्षांच्या शौर्यशाली व स्फूर्तिदायक लढ्यानंतर स्वराज्य रक्षणाकरिता दुर्दैवी पण धैर्यशाली हौतात्म्य कसे पत्करले याचे मोठे गौरवशाली व यथार्थ चित्रण केले आहे. अशा वास्तवात खरं म्हणजे माझ्यासारख्या इतिहासाच्या सामान्य अभ्यासकास याच विषयावर पुन्हा लिहिण्यासाठी धाडस करण्याचे काही कारण नव्हते, पण....!

डॉ. कमल गोखले यांच्या पुस्तकाची प्रस्तावना लिहिताना थोर इतिहास संशोधक महामहोपाध्याय श्री. दत्तो वामन पोतदार यांनी म्हटलं आहे, 'ऐतिहासिक पंडित हा मानवी इतिहासाच्या सूक्ष्म अवलोकनाने, मननाने आणि चिंतनाने परिष्कृत झालेली प्रतिभा वापरतो.' ख्यातनाम ललित लेखक व इतिहासतज्ज्ञ श्री. शिवाजी सावंत यांनीही डॉ. जयसिंगराव पवार संपादित संभाजी महाराजांच्यावरील स्मारक ग्रंथातील आपल्या लेखात म्हटलं आहे, 'इतिहासातील व्यक्तिरेखा आपणास हवा तेवढा सोयीच्या कालखंडाचा तुकडा घेऊन कधीच नीट समजत नाहीत, हे माझे पूर्ण अभ्यासानंतरचे नम्र व ठाम मत आहे. त्यासाठी इतिहासात सततचा जो एक दीर्घ व मूक अंतःस्रोत असतो त्याची नस नेमकेपणी ललित लेखकाला गवसावी लागते.' फक्त ललित लेखकालाच नव्हे, तर प्राधान्येकरून इतिहासकाराला अशी नस, कारण व परिणाम, सत्य आणि आभास यांचा पडताळा घेण्यासाठी सापडणे अधिक गरजेचे आहे. हे सांगण्याची गरज नाही.

असेच पण अधिक स्पष्टपणे आपले विचार मांडताना, हिंदूधर्म ग्रंथांचे एक अभ्यासू चिकित्सक व विचारवंत डॉ. आ. ह. साळुंखे म्हणतात, 'इतिहासातील एखाद्या घटनेचा अन्वयार्थ लावताना त्या घटनेकडे एक सुटी घटना म्हणून पाहता येत नाही. ती घटना घडवणाऱ्या आणि त्या घटनेची नोंद करणाऱ्या लोकांचे सामाजिक हितसंबंध, त्यांची परंपरा, त्यांच्या प्रकृती इत्यादी असंख्य घटक ध्यानात घेऊनच त्या घटनेचे स्वरूप समजावून घ्यायचे असते.'

या दृष्टीने विचार करता मला असे आढळून आले की, महाराणी सोयराबाई यांचा युवराज संभाजीस बाजूस सारून किंवा राज्याची वाटणी होऊन छत्रपतींच्या मूळ रायगडावरील गादीचा वारसा आपला मुलगा राजाराम यास मिळावा ही भावना सर्वसाधारण सावत्रमातांची पूर्वापार दृष्टोत्पत्तीस आलेली प्रवृत्ती पाहता एक वेळ सहज समजू शकते. तथापि, थोरल्या महाराजांनी जाणते व विश्वासू म्हणून नेमणुका केलेली त्यांच्या प्रधानमंडळातील व इतर ज्येष्ठ मंडळींपैकी मोरोपंत, आण्णाजी दत्तो, प्रल्हाद निराजी, बाळाजी आवजीसारख्यांनी दिल्लीच्या बलाढ्य मोगल बादशहाची जंगी फौज मराठी राज्यावर ते पूर्णतः नेस्तनाबूत करण्याच्या इराद्याने लवकरच चालून येणार हे स्पष्ट होत असताना, राजारामांसारख्या केवळ ९-१० वर्षांच्या (आणि हा



त्यांचा प्रयत्न राजाराम ४-५ वर्षांचे असल्यापासूनच चालू होता.) अननुभवी आणि नाजूक प्रकृती व प्रवृत्तीच्या राजपुत्राचा पक्ष; आपले शौर्य, साहस आणि कर्तव्यपरायणता सिद्ध केलेल्या व मातब्बर औरंगजेबाच्या चौफेर आक्रमणास प्रभावशालीपणे पायबंद घालण्यास सर्वथा समर्थ असलेल्या (जे पुढे सिद्धही झाले), युवराज म्हणून आधीच संबोधित झालेल्या संभाजीराजांच्या विरोधात, तेही बहुतांशी फार गंभीर न भासणाऱ्या कारणांसाठी का धरावा व त्यासाठी त्याचे चारित्र्यहनन करून त्यांच्या खुनाचे प्रयत्न करण्यापर्यंत, त्यासाठी छत्रपती शिवाजी महाराजांनी अत्यंत परिश्रमाने स्थापन केलेल्या सार्वभौम हिंदवी स्वराज्याचा मोठा हिस्सा औरंगजेबाचा पुत्र अकबर यास आंदण देण्याची योजना आखण्यापर्यंत, एवढेच नव्हे तर त्यांना पकडून देण्यासाठी मोगलांना मदत करण्यापर्यंत का मजल मारावी, याचा बोध केवळ तत्कालीन कारणांवरून नीट होण्यासारखा नाही. काही इतिहासकारांनी फक्त एवढेच म्हटले आहे की, त्यांनी ते स्वार्थासाठी केले, पण त्या पलीकडे जाऊन आधीच्या कोणत्याच इतिहासकाराने कट करणाऱ्यांच्या अंतस्थ हेतूचा अन्वयार्थ लावण्याचा प्रयत्न केल्याचे दिसत नाही. खरं म्हणजे संभाजीराजांना विरोध करणाऱ्या प्रधानमंडळातील धुरिणांच्या धार्मिक प्रवृत्ती, त्यांचे सामाजिक हितसंबंध, त्याबाबतीत इतिहासात दृग्गोचर झालेली परंपरा व सतत आढळून येणारा दीर्घ व मूक अंतःस्रोत, तसेच या घटना नोंदणाऱ्यांचा कल व प्रवृत्ती इत्यादी घटकांचा सूक्ष्म अभ्यास करून कारणमीमांसा शोधायला हवी होती. मात्र, ज्येष्ठ लेखक, इतिहासकार व विचारवंतांनी वर नमूद केलेल्या त्यांच्या मार्गदर्शक तत्त्वांनुसार, इतिहासाचा एक सामान्य अभ्यासक या नात्याने मी जेव्हा याबाबतीत मागोवा घेतला तेव्हा एक वेगळीच कारणमीमांसा माझ्या दृष्टोत्पत्तीस आली आणि तीच जनतेसमोर यावी या हेतूने मी या लेखनास हात घातला.

संभाजीराजांसारख्या स्वतंत्र व सार्वभौम राज्याच्या अधिकृत वारसाने मोगलांसारख्या शत्रूस विरोधकाच्या भूमिकेतून मिळणे हा लहानसहान अपराध होऊ शकत नाही हे मीही जाणतो. (पण हे स्वराज्याच्या हितासाठी रचलेल्या गुप्त राजकीय डावाच्या अनुषंगाने असेल तर) मात्र काही इतिहासकारांनी जे म्हटले आहे की, संभाजीराजे मोगलांस मिळाल्याने त्यांना राज्यपद देण्यास प्रधानमंडळातील धुरिणांचा विरोध होता हे काही मला पूर्णांर्थाने बरोबर वाटत

नाही. संभाजीराजे मोगलांकडे गेले ते १३/१२/१६७८ साली. त्यांचा दिलेरखानाशी पत्रव्यवहार सुरू झाला. तोही थोरले महाराज ऑक्टोबर १६७६ मध्ये कर्नाटक स्वारीस गेल्यानंतर. पण त्याआधी १६७५ पासूनच त्यांच्याविरुद्ध अनेक खोट्यानाट्या वावड्या उडवून, त्यांचे चरित्र्यहनन व बदनामी करून त्यांना युवराज म्हणून स्वाभिमानाने स्वराज्यात जगणे अशक्य करून, त्यांना शिवाजी महाराजांच्या मनातून उतरवून, त्यांच्या मराठी राज्याच्या सिंहासनावरील हक्कास बाधा आणण्याचा गंभीर व मेटाकुटीचा प्रयत्न काही पाताळयंत्री ज्येष्ठांनी केला, तेव्हाच त्यांनी (गुप्त राजकीय डावाची भक्कम पूर्वपीठिका तयार झाल्यावर) अखेरचे असे हे पाऊल उचलले. अर्थात, त्यामुळे त्यांच्या विरोधकांना अधिक बळ प्राप्त झाल्यासारखे वाटले असले तरी ते त्यांच्या विरोधाचे मूळ कारण नव्हे. इतरही काही कारणे देण्यात येतात, पण तीही सर्व नंतरची. मुळात संभाजीराजांच्या हक्कास वेगळ्याच कारणांसाठी विरोध होत होता. ती कारणे काय होती याचा खुलासा नंतर येईलच. पण ते मोगलांना मिळाले म्हणून प्रायः त्यांना विरोध झाला असे म्हणणे म्हणजे इंग्रजी वाक्प्रचाराप्रमाणे Putting the cart before the horse (घोड्यापुढे गाडी लावणे) असा होईल. संभाजीराजांनी असा निर्णय कोणत्या परिस्थितीत व काय कारणाने घेतला याचाही उहापोह पुढे केला आहे. हे पुस्तक लिहावे की न लिहावे अशा द्विधा मनःस्थितीत मी बराच काळ होतो. मी ते लिहावे असा माझे थोरले बंधू कॅ. प्रतापसिंह घोरपडे, भारतीय नौसेना (निवृत्त) यांचा आग्रह होता. दरम्यान, त्यांनीच मला संदर्भासाठी लागणारी पुस्तके पुरविल्याने मला स्वस्थ बसून चालणारे नव्हते. म्हणून जमेल तसे मी हे पुस्तक माझ्या दृष्टिकोनातून लिहिले आहे. बंधूंच्या अपेक्षेप्रमाणे ते उतरले असल्यास त्याचे सर्व श्रेय केवळ त्यांचेच.

यात प्रारंभी मला जे इतिहास संशोधक, इतिहासकार व इतिहासतज्ज्ञ यांच्या ग्रंथांचा व लेखांचा हे छोटे नृपशंभूंचे चरित्र लिहिण्यास आधार मिळाला त्यांचे आभार मानले पाहिजेत. कारण त्यांनी परिश्रमपूर्वक संशोधन/अभ्यास करून लिहिलेल्या साहित्याचा मला उपयोग झाल्यानेच आयत्या पीठावर ही रांगोळी काढणे मला शक्य झाले, अन्यथा माझ्यात ती कुवत नव्हती.

'शिवछत्रपती समज -अपसमज' या माझ्या छोट्या ऐतिहासिक पुस्तकाच्या प्रकाशनानंतर मी 'स्वराज्यरक्षक छत्रपती संभाजी' याही छोटेखानीच होऊ



शकणाऱ्या ऐतिहासिक पुस्तकाचं लिखाण पुरं केलं. बहुतांशी समाज हा भले मोठे संशोधनात्मक ऐतिहासिक ग्रंथ वाचण्याच्या फारसा भरीस पडत नाही. म्हणून ज्येष्ठ इतिहासकारांच्या अशा ग्रंथाच्या आधारेच मी ही दोन्ही पुस्तकं संक्षिप्त रूपात लिहिली. हेतू हा की, निदान ही लहानसहान पुस्तकं तरी त्यांनी वाचावीत व खरा-खोटा इतिहास समजून घ्यावा. हा माझा हेतू मोठ्या प्रमाणात साध्य होण्यास जर कोणी कारणीभूत झालं असेल, तर अग्रेसर मराठी साप्ताहिक चित्रलेखा व त्याचे चतुरस्र संपादक ज्ञानेश महाराव हेच होत. मी शंभूराजांवरील चरित्राचं माझं लिखाण ज्ञानेशजींच्या हाती ठेवलं. तेव्हा त्यांनी ते वाचून पाहिलं आणि आधीच्या माझ्या शिवचरित्राची, जे आधीही त्यांनी वाचलं होतं त्याची मागणी केली. त्यानंतर ही दोन्ही चरित्रे, प्रथम पिता व नंतर पुत्र या क्रमवारीने, धारावाहीच्या रूपात आपल्या चित्रलेखा साप्ताहिकात खोट्या इतिहासाचा समाचार घेणारी लेखमाला या समर्पक शीर्षकाखाली प्रसिद्ध करून त्यातील मजकूर आपल्या साप्ताहिकाच्या असंख्य वाचकांच्या नजरेस आणला. त्यानंतर धारावाहीत विखुरलेला हा इतिहास एकत्रितरीत्या पुस्तकांच्या रूपात कायम राहून इतर अनेकांच्या वाचनात यावा-येत राहावा यासाठी त्याला ग्रंथरूपात आणण्यासाठी ज्ञानेश महाराव यांनी प्रयत्न केले. आंधळा मागतो एक डोळा आणि देव देतो दोन, अशीच अवस्था माझ्या या अल्पस्वल्प कामगिरीबाबत चित्रलेखा व त्याचे संपादक यांच्याकडून झाली आहे. या त्यांच्या माझ्यावरील अनुग्रहाबाबत त्यांचे आभार मानावेत तेवढे थोडेच आहेत. त्यांचा उत्तराई होणं माझ्या आवाक्याबाहेरचं आहे. तेव्हा त्यांच्या कायम ऋणातच राहणं मला प्राप्त आहे.

**- आनंद घोरपडे**

# १. संभाजीराजांची जडणघडण व स्वभाव वैशिष्ट्ये

संभाजीराजे या मऱ्हाट देशीच्या पहिल्या युवराजांचा जन्म दि. १४ मे १६५७ रोजी सईबाई राणीसाहेबांच्या उदरी पुरंदर येथे झाला. त्याआधी त्यांना तीन मुली होत्या. सईबाई या निंबाळकर घराण्यातील असून त्यांचं शिवाजीराजांशी १६४०-४१ मध्ये लग्न झालं होतं. त्या रूपाने सुंदर व मृदू आणि गोड स्वभावाच्या होत्या. या बाळंतपणानंतर त्यांची प्रकृती फार दिवस चांगली राहिली नसावी. त्या बहुधा बाळंतरोगाने आजारी होत्या. त्यासाठी त्यांना पुरंदरवरून प्रतापगडावर नेण्यात आलं. आजारपणात प्रकृती क्षीण झाल्याने त्यांना अंगावर पुरेसं दूध येत नव्हतं. यास्तव जिजामातेने नसरापूर जवळच्या कापूरवहाळ गावच्या गाडे आडनावाच्या मराठा घराण्यातील धाराऊ आवा या स्त्रीला संभाजीराजांची दाई म्हणून प्रतापगडावर नेलं व नंतर धाराऊच्या अंगावरील दुधावर संभाजीराजांचं बालपणी पोषण होऊ लागलं. या दुखण्यातून सईबाई उठल्याच नाहीत. त्यांना ५ सप्टेंबर १६५९ या दिवशी राजगडावर देवाज्ञा झाली. ही घटना शिवाजीराजांच्या अफझलखान भेटीच्या (.११ नोव्हेंबर १६५९) केवळ काही दिवस आधीची.

संभाजीराजे जन्मतःच अतिशय गुटगुटीत, गोरेपान व देखणे होते. त्यांचे रूप सुंदर, सतेज होते असं चिटणीस बखर म्हणते, तर शिवदिग्विजयात संभाजीराजे आधीच स्वरूपवान, पूर्व वय, त्यायोगे सौंदर्येकरून फार चांगले दिसत असं वर्णन आहे. ते वडिलांबरोबर आग्रास गेले, त्यावेळच्या राजस्थानी अधिकाऱ्यांनी प्रत्यक्ष पाहून त्यांचं वर्णन करताना म्हटलं आहे की, ते नऊ वर्षांचे असून विलक्षण स्वरूपवान व गोऱ्या वर्णाचे आहेत. आबे करे या फ्रेंच प्रवाशाने १६७२ मध्ये म्हणजे संभाजीराजे पंधरा वर्षांचे असतानाचं त्यांचं



वर्णन करताना म्हटलं आहे की, ते मजबूत बांध्याचे असून अतिस्वरूपवान आहेत. त्यांचं देखणे व्यक्तिमत्त्व हाच सैनिकांचे त्यांचेकडे आकर्षण वाढविणारा मोठा गुण आहे इत्यादी. आणि हे थोडे विस्ताराने इतरत्र आलेच आहे.

माता सईबाई या संभाजीराजे दोन वर्षांचे असतानात निवर्तल्याने आपल्या लाडक्या नातवाच्या काटेकोर शिक्षणाची जबाबदारी जिजामातेने उचलली. आपल्या शिवबास त्यांनी जसं घडवलं तसंच त्यांनी शंभूबाळासही, शिवरायांची गादी चालवण्यास सुयोग्य व्हावं यादृष्टीने सर्वंकष शिक्षण आपल्या खास देखरेखीखाली दिलं असणार. त्यात भर फक्त त्यांच्या पित्याच्या सद्गुणांची व पराक्रमाच्या कथांची. शिवरायांसारखा असामान्य पिताही आपल्या राज्याच्या वारसाची सर्व दृष्टीने उपयुक्त अशा शिक्षणाची व्यवस्था केल्याशिवाय कसा राहील? युद्धकलेच्या शिक्षणाबरोबरच त्यांनी पारंपरिक विद्या व शास्त्रे अशी संभाजीराजांच्या शिक्षणाची सोय केशव पंडित व उमाजी पंडित या विद्वान शास्त्र्यांच्या देखरेखीखाली केली होती. मल्हार रामरावाने आपल्या 'सप्त प्रकरणात्मक शिवचरित्रात' संभाजीराजे व राजारामराजे हे दोघेही राजपुत्र मराठी दौलतीचे भविष्यकालीन शिल्पकार आहेत म्हणून शिवाजीराजांनी मोठ्या दूरदृष्टीने त्यांच्या शिक्षणव्यवस्थेची तरतूद केल्याचं म्हटलं आहे. त्यात 'संभाजीराजे प्रबुद्ध झाले. त्यांस व राजारामसाहेब यांस विद्याभ्यास करावा, सुशिक्षित असावे म्हणोन घोड्यावरी बसणे, शास्त्रविद्या, शस्त्रविद्या, तालीम, तिरंदाजी सर्व करविते झाले..... अष्टप्रधान यातच राजपुत्राची गणना आहे. सर्व अमात्य राजाचा वाम कुंज, युवराज राजपुत्र हा सव्य भुज असे आहे, त्याअर्थी हे सुशिक्षित असावे म्हणून लेखनादि अभ्यास करवून पंडितांचा सहवास करविला आणि उत्तम वृद्धसेवक त्यांचे समीप ठेवले. दंडनीती, राजधर्म हे सांगितले वगैरे मजकूर आहे. 'शिवदिग्विजय' या बखरीतही शिवाजीराजांनी या राजपुत्रांच्या शिक्षणाची व्यवस्था किती खोलवर विचार करून केली होती, याचा तपशील दिला आहे. अर्थात, संभाजीराजे व राजाराम यांच्या वयात सुमारे तेरा वर्षांचं अंतर असल्याने संभाजीराजांचं शिक्षण याप्रकारे स्वतंत्ररीत्या राजारामांच्या शिक्षणाआधीच सुरू झालेलं असणार हे उघड आहे. संभाजीराजांना संस्कृतच्या बाबतीत आपल्या घराण्याकडूनच परंपरागत वारसा मिळाला होता. शिवाजीराजांनी त्यांच्या संस्कृत शिक्षणाची चांगली व्यवस्था केली होती.

इ.स. १६७७-७८ मध्ये संभाजीराजे शृंगारपुरास असताना त्यांना वेदमूर्ती केशव भट्ट पुरोहित यांनी दंडनीती शिकवली व प्रयोगरूप रामायण ऐकवलं. त्यांनी 'राजारामचरितम' या आपल्या संस्कृत काव्यात सकलशास्त्रविचारशील आणि धर्मज्ञशास्त्रकोविद अशा शब्दांत युवराज संभाजीराजांची प्रशस्ती केली आहे. याच आपल्या काव्यग्रंथात संभाजीराजांच्या व्यक्तिमत्त्वाचं वर्णन करताना 'ज्वलन ज्वलन तेजस संभाजीराजे' म्हणजे जणू 'धगधगते तेजस अग्निशीखच असे शंभूराजे' म्हटलं आहे. 'बुधभूषण' ह्या आपल्या संस्कृतमधील ग्रंथाचा प्रारंभ संभाजीराजांनी शिवाजी महाराजांच्या हयातीत १६७७ मध्ये केला होता. त्यातील एका भागात राजा व त्याचे गुण, मुख्य प्रधान, राज्याचे सल्लागार, राजपुत्राचे शिक्षण व कर्तव्ये, राज्याचे इतर घटक, कोश, दुर्ग, राजाचे हेरखाते, राजसभा, परमुलुखावर स्वारी इत्यादी विषय चर्चिले आहेत. त्यावरून राजधर्मासंबंधित त्यांच्या असलेल्या अध्ययनाची प्रचिती यावी. (३-१७-३२९) या ग्रंथांची समाप्ती मात्र संभाजीराजे गादीवर आल्यावर १६८१ मध्ये झाली असावी.

त्यावेळच्या पद्धतीनुसार, घोड्यावर बसणं, तलवार चालवणं, भालाफेक, धनुर्विद्या, मल्लयुद्ध आदी लष्करी विद्येचं शिक्षण संभाजीराजांना योग्य वयापासून, या प्रत्येक क्षेत्रातील पारंगत व्यक्तींकडून मिळालं असणार. पण इतिहासात यापैकी कोणाच्याच नावाचा आढळ होत नाही. प्रत्यक्ष स्वारीचा अनुभव यावा, म्हणून महाराज या आपल्या पुत्रास स्वतःबरोबर काही स्वाऱ्यावरही नेत असावेत. नंतर नंतर तर त्यांनी अनेक वेळा संभाजीराजांना ५-१० हजार निवडक सैन्यांच्या तुकडीचं नेतृत्वही दिल्याचं आढळतं. (२, पृ. २७)

युद्धकलेत आणि राजकीय डावपेचात वाक्‌बगार असणाऱ्या शिवरायांसारख्या पित्याचं मार्गदर्शन या तडफदार पुत्रास लाभल्याने संभाजी राजे या क्षेत्रात तरबेज झाले.

पुस्तकीज्ञान व युद्धकलेतील शिक्षण मिळत असतानाच संभाजीराजांना आपल्या आठव्या वर्षांपासून प्रत्यक्ष राजकारणाचे धडेही मिळण्यास सुरुवात झाली. १६६४ मध्ये औरंगजेबाने मिर्झाराजे जयसिंह यांस शिवाजीराजांवर स्वारीसाठी पाठवलं. दक्षिणेत येताच जयसिंहाने ३० मार्च १६६५ रोजी पुरंदरला वेढा घातला. शिवाजीराजांनी मुघली सैन्याचा प्रतिकार करण्यासाठी अनेक उपाय योजले. मुघलांचा वेढा मारून काढण्याच्या कार्यात मराठ्यांची



बेसुमार हानी झाली असती आणि अमाप पैसाही खर्च झाला असता. फार काय, मुघलांविरुद्ध टिकाव धरणंही अशक्य वाटल्याने शिवाजीराजांनी जयसिंहाबरोबर तहाची बोलणी सुरू केली. ११ जून १६६५ या दिवशी महाराज व जयसिंह यांची भेट झाली व १३ जूनला मराठे व मुघल यांच्यात तह झाला. या तहान्वये शिवाजीराजांना देशावरील ९ व कोकणातील १४ किल्ले आणि त्यांच्याखाली येणारा मुलूख मुघलांना द्यावा लागला. याशिवाय शिवाजीराजांनी औरंगजेबाची एकनिष्ठपणे सेवा करावी, असंही तहात ठरलं. साहजिकच ते औरंगजेबाचे ताबेदार झाले होते. या पेचातून युक्तीने स्वतःची सुटका करून घेण्याच्या दृष्टीने त्यांनी पाच हजाराची मनसब आणि नोकरीच्या खर्चाची जहागीर संभाजीराजांच्या नावाने स्वीकारली आणि राजकारणाचे डावपेच करण्यासाठी ते स्वतः मोकळे राहिले. अशा तऱ्हेने बालवयातच नकळत संभाजीराजांचा राजकारणात चंचूप्रवेश झाला आणि राजकारणाचे प्रत्यक्ष धडे घेण्याची संधी त्यांना मिळाली. तहातील अटीप्रमाणे ता. १८ जून १६६५ रोजी उग्रसेन कच्छवाहबरोबर संभाजीराजे जयसिंहाच्या छावणीत दाखल झाले. जयसिंहाने पोषाख आणि रूप्याच्या हौद्यासह हत्ती देऊन संभाजीराजांचा सन्मान केला. सप्टेंबर १६६५ पर्यंत ते मुघलांकडे ओलीस राहिले. याच तहाच्या पोटी, विजापूर व गोवळकोंडा या राज्याशी शिवाजीराजांनी एकजूट करू नये, या हेतूने जयसिंहाने शिवाजी व औरंगजेब यांच्या भेटीची योजना आखली होती व त्यावेळच्या राजकीय परिस्थितीत शिवरायांनी ती मान्यही केली होती. मुघलांचा मनसबदार असल्याने व पित्याचं प्रतिनिधित्व स्वीकारलं असल्याने, संभाजीराजांनाही पित्याबरोबर बादशहाच्या भेटीस आग्रास जाणं भाग होतं. त्यांच्या बालवयाचा विचार करता महाराष्ट्रातून दूर उत्तरेस जाणं त्या काळात तरी फारच त्रासदायक होतं. पितापुत्र ५ मार्च १६६६ रोजी आग्रास जाण्यास निघाले, ते ११ मे रोजी उन्हाचा त्रास सहन करीत तेथे पोहोचले. बालवयातील या खडतर प्रवासाने संभाजीराजांच्या काटकपणाची, सहनशीलतेची आणि धैर्याची कसोटी लागली. आग्र्याच्या भेटीत अपमान झाल्याने शिवाजीराजांनी जो बाणेदारपणा दाखवून औरंगजेबाचं पुन्हा तोंडही पाहण्याचं नाकारलं, तेही संभाजीराजांच्या मनावर कायम बिंबणारंच दर्शन होतं. मनसबदार म्हणून संभाजीराजे, जयसिंह पुत्र रामसिंगबरोबर बादशहाच्या दरबारात नेहमी जात असत. अशाच एका भेटीत बादशहा औरंगजेबाने जेव्हा

खवचटपणे 'राजे आमच्या या मल्लाशी कुस्ती खेळता काय?' असं संभाजीराजांना विचारलं, तेव्हा ९ वर्षांच्या या तेजस्वी राजपुत्राने उत्तर दिलं, 'मी राजा आहे, अलबत्या-गलबत्याबरोबर कुस्ती खेळत नसतो.' संभाजीराजांनी बाकरे यांना दिलेल्या दानपत्रात या घटनेचा उल्लेख आहे. (२-पृ. ३१, १८-पृ. ४१३) संभाजीराजांच्या मानी व बाणेदार स्वभावाचा निदर्शक असा आणखी एक असाच प्रसंग त्यांच्याच एका दानपत्रातील मजकुरावरून विदित होतो तोही येथेच नमूद करणं योग्य होईल. दिलेरखानास सोडून परत आल्यानंतरच्या त्यांच्या एका दानपत्रात ते म्हणतात, 'दिलेरखानाने आपल्या गुडघ्याने मला डिवचले. बस, मी भडकलो आणि मुघलांना सोडून चालता झालो.' (१८, पृ. ४१३)

आग्र्यात सुमारे तीन महिने बादशहाच्या कैदेत राहिल्यानंतर शिवाजीराजे १७ ऑगस्ट १६६६ रोजी संभाजीसह कैदेतून पसार झाले. आग्र्यास जातानाचा व हा कैदेतील असा एकूण सुमारे पाच महिन्यांचा वडिलांच्या सान्निध्यातील काळ संभाजीराजांना खूप काही शिकवून गेला असणार. कारण आदर्शाचा प्रत्यक्ष सहवास हेच खरं शिक्षण असतं. महाराजांचा धीरोदात्तपणा, बाणेदारपणा, आलेल्या कठीण प्रसंगातून कच न खाता मार्ग काढण्याची शैली, या त्यांच्या गुणांची संभाजीराजांना जवळून ओळख पटली व तो प्रभाव त्यांच्यावर कायम राहिला. कैदेतून सुटका करून घेतल्यावर शिवाजीराजे वेषांतर करून, मुघलांचा पाठलाग चुकवीत व चकवा देत राजगडावर ता. १२ सप्टेंबर १६६६ रोजी परतले. पण त्यांनी पकडले जाण्याचा निष्कारण धोका नको, म्हणून संभाजीराजांना मागेच मथुरेत मोरोपंत पिंगळे यांचा मेव्हणा कृष्णाजीपंत, काशी राऊ व विसाजीपंत यांच्या स्वाधीन करून आले. शिवाजीराजाचं पत्र व निरोप आल्यावर संभाजीराजांस या त्रिवर्गाने त्यांचेकडे पोहोचवावं, असं ठरले. मध्यंतरी संभाजी मृत झाल्याची हूल उठवून त्यांची उत्तरक्रियाही शिवाजीराजांनी उरकून घेतली. त्यामुळे संभाजीराजांना सुखरूपपणे वडिलांकडे पोहोचवणं त्यांना थोडंफार सुकर झालं. पण तरीही वेषांतर करून काळजी घेत, चुकवाचुकवी करीत संभाजीराजांना कृष्णाजी विश्वासराव, त्यांच्या मातोश्री व काशी त्रिमल यांनी ता. २० नोव्हेंबर १६६६ रोजी म्हणजे खुद्द शिवाजीराजे राजगडास पोहोचल्यानंतर २ महिने ८ दिवसांनी राजगडावर सुखरूपपणे आणून पोहोचवलं. संभाजीराजांच्या आयुष्याचा विचार करता हे आग्रा प्रकरण त्यांच्या जडणघडणीच्या दृष्टीने



महत्वाचं मानावं लागेल. प्रथम लहान वयात मनसबदार म्हणून शिवाजीराजांचं प्रतिनिधित्व करावं लागलं, मुघली दरबारचा थाट पाहायला मिळाला. मानमरातबची, देण्या-घेण्याची, दरबारी रीतीरिवाजाची त्यांना माहिती मिळाली. आईवाचून पोरकं झालेल्या या लहान मुलाला परप्रांतात, दूर अशा अनोळखी ठिकाणी, अपरिचित माणसांबरोबर चोरून-मारून राहण्याची व लपूनछपून वावरत परतीचा दीर्घ प्रवास करण्याची जी वेळ आली, त्याचा अनुभव त्यांच्या मनावर चांगलाच उमटला असणार.

आग्र्याहून बाप-लेक दोघंही सुखरूप स्वराज्यात परतल्यावर, शिवाजीराजांना काही काळ शांतता हवी असल्याने त्यांनी शहाआलमशी तहाच्या वाटाघाटी सुरू केल्या. त्याप्रमाणे सख्य होऊन तहाप्रमाणे शिवाजीराजांचा प्रतिनिधी म्हणून बालसंभाजीराजांना परत चार हजाराची मतसब देण्याचं आणि वऱ्हाड व खानदेशात मोकासा द्यायचं ठरलं. मुघलांची ही दुसऱ्यांदा मनसब स्वीकारण्यासाठी संभाजीराजे राजगडावरून ९ ऑक्टोबर १६६७ रोजी औरंगाबादेस जायला निघून तेथे २७ ऑक्टोबर रोजी पोहोचले. दुसऱ्या दिवशी त्यांची व जसवंतसिंग यांची भेट होऊन ४ नोव्हेंबर १६६७ रोजी मुघली मनसबदार या नात्याने त्यांनी शहाआलमची भेट घेतली. शहाआलमने त्यांना हत्ती व रत्नजडित तलवार भेट दिली. मनसबदारीच्या तांत्रिक गोष्टीची पूर्तता झाल्यावर संभाजीराजे जसवंतसिंगाच्या माणसाबरोबर ५ नोव्हेंबर १६६७ रोजी राजगडास परतण्यास निघाले. संभाजीराजाचं वय लहान असल्याने त्यांचे प्रतिनिधी म्हणून सेनापती प्रतापराव गुजर व निराजी रावजी हे १६६८ च्या ऑगस्टमध्ये औरंगाबादेस गेले. मात्र, हा तह फार काळ न टिकल्याने ते दोघेही १६६९ मध्ये राजगडास परतले. या मनसबदारीच्या मुदतीत जेव्हा त्या भागातील बंदोबस्तासाठी महाराज आपलं सैन्य हंबीरराव व आनंदराव यांचेबरोबर पाठवीत, तेव्हा त्यांच्याबरोबर संभाजीराजेही स्वारीत असत.

शिवाजी महाराजांचा १६७४ मध्ये राज्याभिषेक झाल्यानंतरही १६७५ च्या सुमारास त्यांच्यात आणि मुघल यांच्यात तहाची बोलणी सुरू होती. महाराजांना आदिलशहावर स्वारी करायची असल्याने असा तह करायची त्यांची इच्छा होती. महाराजांनी काही किल्ले द्यावे व ५-६ हजाराची मनसब घेऊन संभाजीराजांना बादशहाकडे नोकरीस धाडावं, अशा अटीवर हा तह व्हावयाचा होता. त्याप्रमाणे खानजहान बहादूरशी बोलणी झाल्यावर त्याच्या

अर्जानुसार, शिवपुत्र संभाजीराजे यांना सहा हजार फौज व ८० लाख दामाची मनसब, नगारे, नौबती, झेंडा वगैरे दिल्याचं फर्मानही बादशहाने गुर्जबरदाराबरोबर रवाना केलं. त्याप्रमाणे तह घडूनही आल्याचा समज सर्वत्र झाला होता. पण प्रत्यक्षात मात्र पक्का विश्वास न वाटल्याने शिवाजी महाराजांनी हा तह होऊ दिला नाही.

१६७० पासूनच शिवाजीराजांनी युवराज म्हणून संभाजीराजांना शिक्षण देण्यास प्रारंभ केला. राज्यकारभाराचा त्यांना अनुभव यावा म्हणून महाराजांनी २६-१-१६७१ पासून त्यांना स्वतंत्र लेखनिकही दिले. १९ सप्टेंबर १६७१ पूर्वीच महादजी यमाजी हा संभाजीराजे यांचेकडे वाकेनिविसीचे मुतालिकीस होता. त्याला दरबारात येण्या-जाण्याचं काम करावं लागे, म्हणून वार्षिक १०० होन मुक्रर केले होते. लिखाणासाठी कागद, शाई व मदतनीस देण्यास महाराजांनी १९-९-१६७१ रोजी धारराव निंबाळकर यांस लिहिलं आहे.

लहानपणापासून युद्धकलेचे शिक्षण मिळालेलं असलं, तरी १६७२ पासून संभाजीराजे प्रत्यक्ष आघाडीवरही स्वतंत्ररीत्या जाऊ लागलेले दिसतात. १६६८ आणि १६७२ मध्ये भारतात आलेला फ्रेंच प्रवासी आबे करे (Abbe Carre) गुजरातमध्ये असताना संभाजीराजांच्या धैर्याचं आणि युद्धकौशल्याचं वर्णन करताना म्हणतो, "शिवाजीराजांनी आपल्या सैन्याचे विभाग करून शेजारच्या सर्व शत्रूंवर एकाच वेळी हल्ला चढविला आहे... शिवाजीराजांनी दहा हजार शूर अशा सैन्याचा विभाग आपल्या मुलाच्या(संभाजीच्या) ताब्यात दिला होता. हा युवराज लहान असला, तरी धैर्यशील आणि आपल्या पित्याच्या कीर्तीस साजेल असाच शूरवीर आहे. शिवाजी महाराजांसारख्या युद्धकुशल बापाबरोबर राहून तो युद्धकलेत तरबेज झालेला असून चांगल्या वयोवृद्ध सेनापतींचीही बरोबरी करील, इतका तो तयार आहे. तो मजबूत बांध्याचा असून अतिस्वरूपवान आहे. त्याचे देखणेपण हाच सैनिकांचे त्यांचेकडे आकर्षण वाढविणारा मोठा गुण आहे. सैनिकांचे त्याच्यावर प्रेम आहे आणि ते त्याला शिवाजीसारखाच मान देतात. फरक इतकाच की, ह्या सैनिकांनी संभाजीच्या हाताखाली लढण्यातच विशेष धन्यता वाटते. ते आपल्या कर्तबगारीने सारे श्रेय आपल्या छोट्या सेनापतीस देतात. कोणीही कर्तबगारी दाखविली, तर संभाजी त्यांचे कौतुक करतो. त्याचेसमोर एखाद्याने शौर्य दाखविले, तर संभाजी त्याला बक्षीस दिल्यावाचून राहात नाही. संभाजीला खंबायत आणि गुजरात प्रांतावरील राजांवर स्वारी करण्यास हुकूम



देण्यात आला. आपल्या वडिलांनी आपल्याला इतकी महत्त्वाची व मोठी कामगिरी सांगितलेली पाहून त्याला धन्यता वाटली आणि मोठ्या उत्साहाने कार्यप्रेरित होऊन तो आपल्या सैन्यानिशी विशेष पराक्रम करून दाखविण्यास उद्युक्त झाला. ज्यांच्यावर तो स्वारी करणार, तो त्याच्या नावाच्याच दराऱ्याने पळून गेले. त्यामुळे त्याला यश आणि कीर्ती मिळविणे सोपे गेले. त्याने थोड्या अवधीत बराचसा मुलूख कब्जात आणला. ह्या बालराजाची सर्वत्र इतकी स्तुती केली जाते की, त्याच्या बापालाही हेवा वाटत असेल.' (२-पृ. ४०-४१) (महाराजांना नाही पण काही सरकारकुनांना मात्र त्यांचा हेवा वाटत होता हे दिसून येतं.)

इ.स. १६७५ च्या एप्रिल महिन्यात शिवाजी महाराजांनी फोंड्याचा वेढा चालू केला. त्यातही पित्याच्या मदतीस संभाजीराजे तिथे गेले असावेत. यावरून गोव्यातील राजकारणात महाराजांना संभाजीराजांनी चांगली मदत केली होती, असं दिसतं. फोंडा किल्ला घेतल्यावर त्याच्याखाली येणारी ६० गावं सोडून देण्यास संभाजीराजांनी गोवेकर पोर्तुगीजांना कळवलं होतं. १६७५ मध्येच महाराजांनी आदिलशाही मुलुखावर स्वारी केली होती. त्यात संभाजीराजांना भाग घेतला होता. त्याचं वर्णन जॉन फ्रायर याने त्याच्या १६७८ ऑक्टोबरच्या पत्रात केलं आहे ते असं : 'मध्यंतरीच्या काळात आदिलशाहीतील सरदारांच्या बेबनावाचा फायदा घेऊन मन मानेल तिकडे शिवाजीराजांचे सैन्य दौड करीत आहे. त्याच्या सैन्यातील संभाजीच्या नेतृत्वाखालील तुकडी थेट गोवळकोंडा राज्यातल्या भागानगरपर्यंत गेली. शिवाजीराजांच्या मुलाने भागानगरमधील काही भाग लुटला व शहरात जाळपोळ केली. तोच बहलोलखान आडवा आल्यामुळे त्याला चुकवित दुसऱ्याच मार्गाने तो वेगाने परत फिरला. वाटेत संभाजीने हुबळी रायबाग आणि इतर बाजारपेठांवर छापे घालून त्या लुटल्या. ब्रिटिशांच्या कागदपत्रात संभाजीराजांना Warlike Prince म्हणजे सदैव युद्धसन्मुख युवराज म्हटल्याचं आढळून आलं आहे.'

शिवाजी महाराजांच्या गैरहजेरीत राज्यकारभाराचं शिक्षण घेत असताना संभाजीराजांना दरबारातील शिष्टाचाराचा अनुभव व परकीय दूताशी वागण्या-बोलण्याची संधी मिळाली. वयाच्या सोळाव्या वर्षीच त्यांचा इंग्रजांशी संबंध आला तो शिवाजी महाराजांशी मीठ व लाकूड यांच्या व्यापाराविषयी तह करण्यास टॉम निकल्स आला होता. तेव्हा टॉम निकल्सला सूचना देण्यात आली होती

की, शिवाजीची भेट न झाल्यास त्यांचा मुलगा किंवा जो कोणी अधिकारी असेल त्याला भेटून परत यावे. तथापि, लहान वयामुळे तह करण्याचे अधिकार अद्यापि संभाजीराजांस दिले गेले नसल्याने त्यांनी त्या इंग्रज अधिकाऱ्यास सन्मानाची वागणूक देऊन, महाराजांना तुमच्या आगमनाबद्दल कळवतो म्हणजे ते लवकर येतील, असं सांगून शिवाय गडावरील हवा तुम्हास मानवणार नाही तेव्हा आपण गडाखाली राहावं असा उपदेशपर सल्लाही दिला. ७-९-१६७५ रोजी सॅम्युअल ऑस्टिन ह्याने रायगडावर राजापूरच्या वखारीच्या लुटीबाबत कारवाईची मागणी करण्यासाठी शिवाजी महाराजांची भेट घेतली. तेव्हा या शिष्टाईचे वेळी संभाजीराजे शिवाजी महाराजांच्या बाजूला बसले होते व इतर अधिकारी उभे होते. महाराजांनी इंग्रजांची वखार लुटल्यानंतर ती बंद करून तेथील लोकांना सुरतकरांनी १६७७ च्या सुरुवातीस परत बोलावले आहे, हे कळताच महाराजांनी संभाजीराजांना इंग्रजांच्या तक्रारी मिटविण्याकरिता व ती वखार त्यांनी सोडू नये, म्हणून सांगण्याकरिता पाठवले होते. अशा रीतीने काही ना काही कारणाने संभाजीराजांचा इंग्रजांशी संबंध आला होता व त्यांच्याशी वाटाघाटी करण्याची संधी त्यांना मिळाली होती. ज्या ज्या वेळी इंग्रज वकील व शिवाजी महाराज यांच्यात बोलणी झाली, त्या त्या वेळी संभाजीराजे शिवाजी महाराजांजवळच बसले होते व ते शिवाजी महाराजांबरोबरच निघून जात असत, असं ऑक्सिंडन व फ्रायर सांगतात. त्यांच्याशिवाय मोरोपंत पिंगळे हेच तिथे असत. (१-पृ. ८७)

१६७४ ते ७७ या काळात दिवाणी कामाचेही शिक्षण संभाजीराजांना मिळाले होते. हे त्यांनी कर्यात मावळ येथील कुलकर्ण जानकी कोम रंगभट बिन बाळंभट ठकार हिची मिरासी व शंकराजी भोवर याच्या मुतालिकीचा कागद करून दिला होता यावरून दिसून येते.

जिजामाता शिवाजीराजांच्या मुलकी कारभाराच्या कुलमुखत्यार होत्या. त्यांच्याजवळ संभाजीराजे असत. तेथेच ते जिजामातेच्या सहवासात मुलकी कारभार सांभाळण्यास शिकले. पुढे जिजामाता वृद्ध झाल्यामुळे मराठी राज्याचा मुलकी कारभार संभाजीराजांनी पाहावा असे ठरले. त्याप्रमाणे २६ जाने. १६७१ ला हुकूम निघून तिथून १६७४ पर्यंत संभाजीराजांनी किचकट मुलकी कारभार यशस्वीपणे सांभाळला. अर्थात, जिजामातोश्रींची देखरेख होतीचा. (३-१५-१४५) संभाजी महाराजांच्या कारकिर्दीत मुलकी कारभार येसूबाईंच्या



स्वतंत्र शिक्क्याने चाले. त्यावर 'सखी राज्ञी सचिव' अशी बिरुदावली येसूबाईंनी लावून घेतली होती. (३-१५-१४९)

शिवाजी महाराजांच्या वतनाच्या स्वराज्यातील उद्योगातही संभाजीराजे काम करीत असत व दप्तरी कामातही भाग घेत असत. शिवाजी महाराजांच्या कारकिर्दीतच त्यांनी पाठविलेली दोन पत्र उपलब्ध आहेत. मात्र, या पत्रांवर अजरख्तखाने या मायन्याऐवजी 'मशुरुल' असा मायना असून त्यावर मोरोपंताची मुद्रा आहे. अशा पत्रांना राजकारभारात स्थान असते. ही दोन्ही पत्रे ता. ४/५/१६७५ रोजी अधिकारवाणीने लिहिली असून दोन्हीतली अनुक्रमे जुन्नर येथील सुभेदार आणि पुणे येथील सर हवालदार यांना तेथील इनामदारांकडून निष्कारण मिरासपदी वसून करण्यावरून जाब विचारला असून, यापुढे त्यांना तसनीस न देणेबद्दल बजावले आहे. ह्या दोन्ही हुकुमांची अंमलबजावणी झाल्याचेही त्यांनी पाहिले, ही पत्रे संभाजीराजांच्या पद्धतशीर व चोख कामाची ग्वाही आहे. (२-पृ. ४८)

शिवाजी महाराजांच्या कारकिर्दीत संभाजीराजांपुढे काही तंट्यांचे निकालही होत असत. १६७५ मध्ये गोपाल सेट सेट्या याच्या सेटेपणासंबंधी तंटा निर्माण झाला होता. त्याचा निकाल लागून गोपाल सेटच्या बाजूने लागला. या मजहरात संभाजीराजे होते. (२-पृ. ४७)

संभाजीराजे यांचा शास्त्रे व पुराणे यांचा अभ्यास असल्याने शिवाजी महाराजांनी त्यांना धार्मिक बाबींचेही अधिकार दिलेले असावेत, असे डॉ. कमल गोखले यांचे निदान आहे. (२-पृ. ४९)

कर्नाटक स्वारीवर निघण्यापूर्वी शिवाजी महाराजांनी दरबार भरविला होता, ते सिंहासनावर बसलेले असताना संभाजीराजे तेथे आले व त्यांनी महाराजांच्या पायावर डोकं ठेवले, तेव्हा महाराजांनी त्यांना जवळ बसण्याचा आग्रह केला, पण राजशिष्टाचार पाळणाऱ्या सुसंस्कृत संभाजीराजांनी तसे न करता विनम्रपणे आपली ठरलेली जागाच निवडली. यात संभाजीराजांना राजशिष्टाचार पाळण्याचा आग्रह व वडिलांचेप्रती असलेला आदर दिसून येतो.

थोरले महाराज कर्नाटक स्वारीवर निघाले असताना संभाजीराजेही त्यांच्याबरोबरच रायगडावरून बाहेर पडले व ता. १-११-१६७६ रोजी शृंगारपुरास जाऊन राहिले. शृंगारपुरास राहात असताना ते कसा वेळ घालवित असत याची माहिती अनुपुराणात मिळते. त्यात म्हटले आहे की, संभाजीराजे

रोज व्यायाम करीत असत. त्यांना व्यायामाची व मल्लखांबाची आवड होती असे दिसते. रायगडावर एक लोहस्तंभ आहे त्याला संभाजीराजांचा मल्लखांब म्हणतात. (काही अभ्यासकांच्या मते, मात्र तो लोहस्तंभ म्हणजे मल्लखांब नसून, उन्हामध्ये त्याची पडणारी सावली पाहून, वेळेचा अंदाज घेण्यासाठी वापरलेले ते उपकरण असावे.) शृंगारपूरच्या दुर्गम प्रदेशात त्यांनी धनुर्विद्येचा अभ्यास केला. त्यांनी तेथेच अष्टादश पुराणे क्रमाने ऐकली. त्यांनी कामंदकीचा व इतिहासाचा अभ्यासही केला. येथेच त्यांनी 'बुद्धभूषण' ग्रंथ लिहिला असावा. ते लोकांशी मृदूपणाने वागत असत. जे जे लोक त्यांना आश्रय मागत त्यांना ते आश्रय देत असत. शिवाजी महाराजांच्या मंत्र्यांनी त्रास दिलेली प्रजा शृंगारपूरला संभाजीराजांकडे जात असे व संभाजीराजे त्यांना आधार व दिलासा देत असत. (३-४२, पृ. ८) यावरून संभाजीराजांच्या सद्‌गुणांची, अभ्यासूवृत्तीची, त्यांच्या स्वभावातील मार्दवतेची व प्रजेविषयीच्या कळकळीची जाणीव होते.

संभाजीराजांना उग्र प्रकृती व क्रूर असं बखरकारांनी व आधीच्या काही इतिहासकारांनी रंगवलं आहे. ते प्रायः संभाजीराजांनी आण्णाजी दत्तो, बाळाजी आवजी, हिरोजी फर्जंद आदींना व विशेषतः त्यातील ब्राह्मणांना मृत्युदंडाची शिक्षा दिल्यामुळे. पण तो त्यांचा क्रूरपणा होऊ शकत नाही. प्रत्यक्ष राजांच्या खुनाचा कट जे करतात, त्यांना हीच शिक्षा योग्य होय व आजही तीच प्रथा प्रचलित आहे. त्यातही या कटवाल्यांनी प्रथम राजारामांना मंचकारोहण करून नंतर संभाजी महाराजांना अटक करण्याचा प्रयत्न केला, तेव्हा त्यांनी या कटवाल्यांना फक्त कैदेत टाकलं व स्वतःच्या मंचकारोहणप्रसंगी त्यांना मोठ्या मनाने मुक्त करून पुन्हा पूर्वीच्याच अधिकारावर नेमलं. संभाजीराजांनी असं करण्यात जो मनाचा विशालपणा दाखवला, त्याला इतिहासात तोड सापडणे कठीण.

याबाबतीत इतिहास संशोधक ॲडव्होकेट अनंत वि. दारवटकर म्हणतात, 'संभाजी महाराजांविरुद्ध सरकारकुनांनी केलेली कटकारस्थाने ही अत्यंत नीच वृत्तीची व विकृत मानसिकतेची असून क्षमा करण्यासारखी नाहीत. या सरकारकुनांनी महाराजांविरुद्ध कटकारस्थानांची मालिकाच तयार केल्याचं दिसतं. संभाजी महाराज सत्तेवर येण्यापासून पकडले जाईपर्यंत साधारण ७ ते ८ कटांची इतिहासात नोंद आहे. महाराजांनी त्यास अत्यंत यशस्वीपणे तोंड



दिल्याचं दिसतं. तरीसुद्धा असं वाटतं की, महाराजांनी राष्ट्रद्रोही कटवाल्यांना सुरुवातीला क्षमा करावयास नको होती. म्हणूनच की काय, काळ सोकावला, अंगावर आला व प्राणावर कोसळला.' (४३) ॲड. दारवटकरांचं हे मत कोणालाही पटण्यासारखं आहे. संभाजी महाराजांनी नुसतंच या कट करणाऱ्यांना माफ केलं नाही, तर पुन्हा त्यांच्या पहिल्याच जागांवर नेमणुका केल्या. हे जरा अतीच झालं.

संभाजी महाराजांच्या स्वभावात समजूतदारपणाचाही भाग होता. आपल्या हातून एखादी अनुचित गोष्ट घडली, तर आपली चूक मान्य करून ती सुधारण्याचा दिलदारपणाही ते दाखवत असत. बाळाजी आवजी चिटणिसांना देहांताची शिक्षा दिल्यावर जेव्हा येसूबाईंनी त्याबद्दल नापसंती दर्शवली व थोरल्या महाराजांना ते कसे प्रिय होते ते सांगितलं, तेव्हा प्रांजळपणे संभाजी महाराजांनी आपली चूक मान्य केली व त्याची भरपाई बाळाजी आवजींच्या दोन्ही लहान मुलांना – खंडो बल्लाळ व निळो बल्लाळ यांना परंपरेने चालत आलेली चिटणिसी बहाल केली व खुद्द येसूबाईंना त्यांच्याकडे लक्ष देण्यास सांगितलं.

शिवाजी महाराजांच्या देहावसानानंतर संभाजीराजांनी रायगडावर येण्याची घाई केली नाही. त्यांनी पन्हाळ्यावरूनच राज्यकारभार करावयास सुरुवात केली व दमाने ते रायगडावर आले. या घटना एकीकडे संभाजीराजांच्या कर्तृत्वावर असलेला जनतेचा व फौजेचा विश्वास सांगणाऱ्या, त्यांची लोकप्रियता दाखवणाऱ्या आहेत, तर दुसरीकडे त्यांचा दमदार धोरणीपणा दाखवणाऱ्या आहेत. चिडून जाऊन याला मार, त्याला कडेलोट कर, असा आक्रस्ताळेपणाही त्यांनी केला नाही.

थोरल्या महाराजांच्या मृत्यूनंतर त्यांनी कुटुंबप्रमुख या नात्याने आपली जबाबदारी व्यवस्थितरीत्या पार पाडली. कुटुंबातील कोणावरही राग धरला नाही. रायगडावर आल्यावर व थोरल्या महाराजांच्या मृत्यूची बातमी अधिकृतरीत्या कानावर आल्यावर त्यांनी पुढे धर्मशास्त्राप्रमाणे सुतक पाळलं. धाकटे बंधू राजाराम यांनाही त्यांनी प्रेमाने वागवलं. त्यांनी त्यांची तीन लग्नं वजनदार व प्रतिष्ठित मराठा घराण्यातील मुलींशी लावून दिली.

संभाजीराजांच्या स्वभावाचं दर्शन इंग्रज व डच यांच्या पत्रव्यवहारातूनही दिसून येतं. आपल्या १०-१-१६७७ च्या पत्रात सुरतकर इंग्रज, मुंबईकर

इंग्रजांना लिहितात की, संभाजीराजे समंजस दिसतात. (He appears to be of sufficient understanding.) हे सुरतकर इंग्रज त्यांच्या १८ ऑक्टो. १६८० च्या आपल्या एका पत्रात लिहितात की, संभाजींच्या सध्याच्या वर्तणुकीवरून ते बापाचा स्वभाव व प्रवृत्ती याहून निराळे आहेत. त्यांचा कारभार अधिक सुसंस्कृत किंवा दयाळू व नेमस्त आहे. ('Whose present proceedings seem to speak him to be of a contrary spirit and temper to his father by a much more moderate and humane Govt.')

डच लोकांच्या कोलंबो अहवालात मजकूर आहे की, 'आपल्या बापाच्याच तत्त्वाप्रमाणे संभाजी वागणारा आहे, असे लोक म्हणतात; परंतु त्याचा स्वभाव अधिक नरम आहे.' (१-पृ. १८३, १८४)

समकालीन कागदपत्रांत नेहमी संभाजीराजांच्या धूर्तपणाचा व थंडपणाचा उल्लेख येतो. उतावळे, रागीट व लहरी संभाजीराजे ही बखरकारांची निर्मिती आहे. (३-१५ पृ. १५0)

संभाजी महाराज सुविद्य होते, संस्कृत जाणत होते. एवढी माहिती साधारण सर्वांना आहे. पण ते उत्तम कवीही होते व त्यांनी चार ग्रंथ लिहिले आहेत, याची माहिती मात्र पुष्कळांना नसण्याची शक्यता आहे. त्यांनी १) बुधभूषण, २) नायिकाभेद, ३) नखशिख व ४) सातसतक असे चार ग्रंथ लिहिले असून पहिला संस्कृतमध्ये तर इतर तीन हिंदीमध्ये (व्रज भाषा) लिहिलेले आहेत. पहिला ग्रंथ राजनीतीवर असून नंतरचे दोन शृंगारप्रधान आहेत व शेवटचा अध्यात्मावर आहे. तो त्यांनी आपल्या आयुष्याच्या अखेरच्या दीड-दोन वर्षांत लिहिला असावा. त्यांनी घेतलेल्या काही साहित्यिक नावांमध्ये नृपशंभू असं एक नाव घेतलं होतं. या वेगवेगळ्या विषयांवरील त्यांचं लिखाण पाहून त्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या विविध छटा नजरेस येतात. त्यांच्या चरित्राकडे पूर्वग्रहदूषित दृष्टीने पाहणाऱ्यांनी त्यांच्या शृंगारप्रधान काव्याच्या आधारे त्यांना विलासी ठरवण्याचा प्रयत्न केला असण्याची शक्यता आहे. हे ग्रंथ त्यांनी आपल्या आयुष्यातील मनःस्तापाच्या व प्रचंड धामधुमीच्या काळात कसे लिहिले, याचंच आश्चर्य वाटावं अशी परिस्थिती आहे. हिंदी साहित्यातील प्रसिद्ध लेखक, समीक्षक व संशोधक कै. डॉ. कृष्ण दिवाकर म्हणतात, 'संभाजी की अधिकांश रचनाएँ शृंगारप्रधान है। इसका मतलब यह तो नहीं होता कि संभाजी केवल विलासीही थे और देहधर्म के दास थे। कर्तृत्वसंपन्न एवम् पराक्रमी व्यक्ति के जीवन में फुरसत के समय यदि शृंगार



तथा विलास आ भी जाता है तो वह दूषण नहीं, भूषण सिद्ध होता है। संभाजी की साहित्यिक कृतियों से ज्ञात है कि संभाजी में शृंगार तथा विलास की वृत्ति अवश्य थी। बाल्यावस्था से ही राजनीती के साथ ही साथ काव्यालंकार, शास्त्र, पुराण, संगीत आदि के अध्ययन से साहित्य के प्रति उनकी विशेष अभिरुचि बढी होगी। जीवन के पूर्वार्ध में ही उत्तर भारत एवम् मुगलों की छावनी में रहने के कारण वहाँ के विलासी एवम् ऐश्वर्यमय वातावरण का प्रभाव संभाजी पर होना असंभव भी नहीं था। संभाजी का विलास कायरों तथा भीरुओं का दुर्बल विलास न था, बल्कि एक पराक्रमी राजनीतिज्ञ एवम् कर्तव्यसंपन्न व्यक्ति का सबल विलास था। विलासी एवम् शृंगारिक प्रवृत्ति होने पर भी राजनीतिक क्षेत्र में संभाजी ने जो स्पृहणीय कार्य किया उससे स्पष्ट हो जाता है कि शंभूराज विलासी वृत्ती के दास कभी नहीं बने थे। उलटे जीवन की संध्या में उनकी प्रवृत्ति धर्म तथा अध्यात्म की ओर उन्मुख दिखाई देती है। संभवतः इसी वृत्ती ने उन्हे मृत्यु के समय भी स्थितप्रज्ञ बनाया था।' (३,१९- पृ. ४६५)

संभाजी महाराजांना आयुष्य लाभलं ते फक्त बत्तीस वर्षांचं. त्यात त्यांनी केवळ तिसाव्या वर्षी 'सातसतक' नावाचा जो अध्यात्मवादी ग्रंथ लिहिण्यास घेतला, तो त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची उंची वाढवणारा आहे, असं डॉ. जयसिंगराव पवार म्हणतात, ते अगदी सार्थ आहे, यात शंका नाही. त्यातील आपल्या काव्यपंक्तीत संभाजी महाराज म्हणतात, 'छत्र, हत्ती, चवऱ्या आणि अगणित घोडे वगैरे वैभव असतानाही मनात अहंकार उत्पन्न झाला नाही. खानपान आणि उंची वस्त्रे याकडे लक्ष न दिल्याने काही लोकांनी निंदा केली. त्यात सुखच मानून ती सहन केली. जे तुम्हास दूषणे देत होते, ते अज्ञ आणि असमंजस होते. त्यांना जे जसे करायचे आहे ते करू द्या. शंभूराजा परमेश्वराला सांगतात, गोपाला ऐक, आम्ही आपली सर्व जबाबदारी तुझ्यावर सोपवून राहिलो आहोत.' संभाजी महाराजांची विरागी वृत्ती व निरहंकारी स्वभाव या ओळींतून दिसून येतो.

औरंगजेबाचा एक चरित्रकार ईश्वरदास नागर म्हणतो की, संभाजीराजा एवढा गर्विष्ट (आमच्या दृष्टीने स्वाभिमानी) होता की, (शेवटी) त्याची एवढी दुर्दशा झाली तरी त्याने बादशहास ताजीम देण्यासाठी म्हणून यत्किंचितही मान लवविली नाही. इखलास खान व हमीमुद्दीन खान यांनी त्यांना पुष्कळ समजावलं, पण त्याचा काही उपयोग झाला नाही. त्यांच्या डोळ्यांत सळई फिरवून त्यांना

आंधळे करण्यात आलं. त्या दिवसापासून गर्विष्ठ आणि स्वाभिमानी संभाजीने अन्नसेवन करण्याचं सोडलं. (३-२०, पृ. १०३)

संभाजी महाराज अत्यंत बाणेदार स्वभावाचे होते. जेव्हा त्यांना पकडून बादशहासमोर आणण्यात आलं. तेव्हा त्यांचं वर्तन बाणेदारपणाचंच राहिलं. मराठ्यांचा हा राजा औरंगजेबाकडे ताठ मानेने पाहात राहिला. संभाजी महाराजांचा हा निर्धार आणि बेडरपणा मराठ्यांच्या मनावरून कधीच पुसला जाणार नाही.

संभाजी महाराजांवर व्यभिचार (स्त्रीविषयक आसक्ती) व अपेयपानाचं (मद्यपानाचं) जबरदस्त व्यसन असल्याचा आरोप जवळजवळ सर्व बखरी करतात. तथापि, तत्कालीन पोर्तुगीज पत्रव्यवहार, अखबार आणि मराठी पत्रव्यवहारात यासंबंधी उल्लेख आढळत नाही. संभाजी महाराजांना भेटण्यासाठी डिसेंबर १६८२ मध्ये इंग्रज अधिकारी स्मिथ, १६८४ मध्ये इंग्रज वकील कॅ. गॅरी, थॉमस विल्किन्स, १६८७ च्या सप्टेंबर महिन्यात जॉर्ज वेल्डन, रॉबर्ट ग्रॅहॅम हे वकील रायगडला गेलेले होते. तहाच्या वाटाघाटीसाठी त्यांचा अनेक दिवस तेथे मुक्काम होता. १६८० मध्ये डच वकील रेसिडेंट लेफेबेर राजांना पन्हाळ्याला भेटला होता. १६८५ मध्ये पोर्तुगीज वकिलात राजांना रायगडावर भेटली. त्यात फै आंतोनियु व सहाव जुझेफ आणि इतर अनेक माणसं होती. या परकीयांपैकी कोणीही संभाजीराजांच्या व्यसनाधीनतेविषयी कोणत्याही रीतीने आपल्या प्रमुखांना कळवलेलं दिसत नाही. शत्रूपक्षातील उणीदुणी टिपून त्यांची नोंद करून, जमेल तर त्या दोषांपासून लाभ उठवण्यात वकिलातीचे लोक तत्पर असतात. हे ध्यानात घेतलं म्हणजे संभाजीराजांवर घेण्यात येणारा व्यसनाधीनतेचा आरोप खोटा ठरतो. संभाजीराजानंतरच्या इतिहासात मात्र दारू वगैरे मागितल्याचे उल्लेख सापडतात. (२, पृ. ४७९, ४८०) अखबारत-इ-दरबार-इ-मुअल्ला हा फारशी बातमीपत्रांचा संग्रह आहे. त्यात औरंगजेबाच्या काळापासून ते पेशवाईच्या अखेरपर्यंत वार्तापत्रं आहेत. त्यातील संभाजीकालीन बातमीपत्रात औरंगजेबाच्या मुलांनी आणि सरदारांनी लिहिलेल्या दैनंदिन हकिकती आहेत. त्यातही संभाजीराजांच्या मद्यसेवनाचा किंवा व्यभिचारी वागणुकीचा उल्लेख कुठेही आलेला नाही. याबाबत थोडा अधिक मजकूर संभाजीराजांच्या विरोधात कटकारस्थाने या प्रकरणात आलाच आहे.

संभाजी महाराज संगमेश्वराला कैद झाले, त्याप्रसंगी ते विलासात आणि दारूबाजीत मग्न होते, असं त्यांचे टीकाकार म्हणतात. अस्सल साधने मात्र



सांगतात की, राजांच्या संगमेश्वराच्या छोट्या मुक्कामात अनेक माणसं आपली गाऱ्हाणी, तक्रारी राजांच्या कानावर घालण्यासाठी येत होती. संभाजी महाराज त्यांचं ऐकत होते. याच मुक्कामात कोतवळूजहून आलेला देसाई त्यांना भेटला व संभाजी महाराजांनी न्यायनिवाडा केल्यावर शिर्क्यांकडील मोकासा काढून घेऊन त्यांची सरदेशमुखी सरकारात जप्त केल्याची कागदपत्रं घेऊन कोतवळूजला परतला. ते ज्या दिवशी कैद झाले, त्या दिवशी मराठेशाहीतील प्रसिद्ध बांधकामतज्ज्ञ यादव हेही आपल्या कऱ्हाडच्या देशमुखीबद्दलचं जुनं गाऱ्हाणं सांगण्यासाठी आले होते. त्यांनी संभाजी महाराजांना जुना इतिहास सांगितला. महाराजांनी तो ऐकला. कागदपत्रं पाहिली व यादवांच्या बाजूने निकाल दिला. कारकुनाने तो लिहून घेतला. पुढच्या पेरवीचा हुकूम बाहेर पडण्यापूर्वीच मोगलांचा हल्ला झाला व महाराज कैद झाले. राज्यावर बसल्यापासून शेवटचा अंत होईपर्यंत तो उमद्या, दुर्दैवी जवानमर्द राजाला व्यसनासाठी वेळ होता कुठे? व्यसने ऐदी, खुशालचेंडू माणसांना लागतात. संभाजी महाराजांसारख्या ध्येयापाठीमागे अहर्निश धडपड करणाऱ्या कर्मवीराला लागत नाहीत. (३-१८-पृ. ४१०) विशेष म्हणजे संभाजी महाराजांनी आपलं 'सातसतक' नावाचं शेवटचं हिंदी काव्य लिहिण्यास १६८८ मध्ये सुरुवात केली होती. त्याची पूर्तताही त्यांनी आपल्या या संगमेश्वरच्या मुक्कामातच केली. (३-१९ पृ. १९७). संभाजीराजांचं हे काव्य दर्शवतं की, या ३२ वर्षांच्या तरुण वयातही त्यांचं मन लौकिक ऐश्वर्याची उबग येऊन अध्यात्माकडे वळलं होतं आणि अशा मनःस्थितीत हे संगमेश्वरला भोग विलासात दंग होण्याची शक्यता नाही. मोगलांच्या प्रसिद्ध इतिहासकार व मराठ्यांचा कडवा विरोधक महंमद हाशिम खाफीखान याने मुळात आपल्या वृत्तान्तात म्हटलं आहे, '(त्यावेळी) गफलतीच्या दारूच्या नशेत संभाजी महाराज होते.' महाराज दारूच्या नशेत होते, असं त्याने म्हटलेलं नाही. गफलत हीच जणू दारू, त्याच्या नशेत ते होते म्हणजे ते निष्काळजी व बेसावध अवस्थेत होते, असं त्याला म्हणावयाचं असावं, पण अर्थाचा अनर्थ करून हा मद्यधुंदीचा आरोप महाराजांवर झालेला दिसतो. (३-८-पृ. ११३)

पण संभाजी महाराजांचा एकूण पिंड, वयाच्या तिशीपर्यंत तरी त्यांच्या वडिलासारखा अगदी साधू पुरुषांचा नसावा. ते कदाचित त्यांचे आजोबा शहाजीराजे यांच्या वळणावर थोडेफार गेले असावेत. त्यांची प्रेमप्रकरणंही

असावीत. या तरुण, देखण्या, राजबिंड्या व धैर्यशौर्यादी गुणांनी युक्त असणाऱ्या राजपुत्रावर आसक्त होणाऱ्या अनेक तरुणी असल्यास आश्चर्य नाही. त्यांची 'नायिकाभेद' व 'नखशिख' ही काव्यंही शृंगाररसाची आहेत. आपल्या शेवटच्या 'सातसतक' या काव्यात त्यांनी स्वतःच कबुली दिली आहे की, 'लहानपणी मी कल्पनेच्या दुनियेत रंगून गेलो. तरुणपणी युवतींच्या प्रेमात बुडालो. आता सारे रंग फिके होऊ लागले आहेत. अनेक रंगात रंगलेलं माझं मन आता सावळ्या श्रीकृष्णाच्या रंगात रंगलेलं आहे.' त्यांनी कधीमधी मद्यसेवन केलंही असेल, पण यापैकी कोणत्याच गोष्टीत त्यांनी मर्यादातिक्रम केल्याचा पुरावा नाही व या गोष्टी त्यांच्या कर्तव्यनिष्ठेच्या व कार्यकर्तृत्वाच्या कधीही आड आल्या नाहीत.

थोरल्या महाराजांनी श्रमपरिपूर्वक निर्मिलेले सार्वभौम हिंदवी स्वराज्य, संभाजी महाराजांनी आपल्या व्यसनापायी विध्वंसून टाकलं, असा एक गंभीर स्वरूपाचा बखरकारांचा आरोप आहे. हा आरोप कसा धांदात खोटा आहे व त्या मताचा प्रसार कसा झाला, हे रामचंद्र अमात्य यांच्या ता. १७-९-१७०७ रोजी लिहिलेल्या पत्रातील मजकुरावरून लक्षात येतं. वास्तविक संभाजी महाराजांनी ९ वर्षे औरंगजेब व इतर स्वराज्याच्या शत्रूंशी अहोरात्र महान शौर्यशाली लढत देऊन ते नुसतं रक्षिलं नाही, तर ते समृद्ध स्थितीत मागे ठेवून त्यात वाढही कशी केली, तो मजकूर इतरत्र आलाच आहे. पण नंतरच्या केवळ लेखनकामासाठी असणाऱ्या त्यांच्या हिंदू सनातनी द्वेष्ट्यांना त्याचं काय होय? शिवकाली निळोपंत अमात्यांच्या मृत्यूनंतर, मंत्रिपदं वंशपरपरेने चालत असतानासुद्धा शिवाजी महाराजांनी निळोपंताचं अमात्यपद त्यांचे वडील पुत्र नारोपंत व रामचंद्रपंत यापैकी कोणालाही न देता ते रघुनाथपंत हणमंते यांस दिलं होतं. कारण त्या जागेसाठी महाराजांना ते पात्र वाटले नाहीत, हे उघड आहे. पुढे संभाजी महाराजांनी आपल्या पूर्व संबंधास स्मरून रामचंद्रपंतास सुरनिशी दिली होती; परंतु ती त्याच्या गैर व शेळपट कारभारामुळे संभाजी महाराजांनी नंतर काढून घेऊन, त्यांच्या हाताखालील शंकराजी नारायण यास ते पद दिले. त्यामुळे अपमानित होऊन रामचंद्रपंत राजद्रोही गटात सामील झाला होता. तथापि, अकार्यक्षम रामचंद्रपंतास पुढे राजारामकाळी अमात्यपद प्राप्त झालं. त्याने ताराबाईंच्या शिवाजी दुसरा यांच्या अंमलात ता. १७-९-१७०७ रोजी धाकट्या शिवाजीराजांना लिहिलेल्या पत्रातील मजकूर उल्लेखनीय आहे.



त्यात तो म्हणतो....'राजश्री शाहू राजे ताम्राच्या निर्बंधातून निघाले आहेत म्हणून हुजूर वर्तमान आले. यैशास हे राज्य थोरल्या कैलासवासी स्वामींनी बहुता श्रमे मिळवून सर्वांगे संपूर्ण केले होते. ते राजश्री संभाजी काका यांनी विध्वंसून टाकले. आपणही अपायी पडले. याउपरी कैलासवासी स्वामी (राजाराम महाराज) राज्याधिकारी झाले. त्यांनी स्वपराक्रमे करून नूतनच राज्य संपादिले. स्वामींनी त्यांचे संरक्षण करून ताम्राचा पराभव केला. राज्याची अभिवृद्धी होत चालली. दुसरी गोष्ट हे राज्य थोरल्या कैलासवासी स्वामींनी तीर्थरूप कैलासवासी स्वामीस द्यावेसे केले होते. ऐसे असता त्यास या राज्यासी संबंध काही नाही....' यावरून हे स्पष्ट होतं की, संभाजी महाराजांनी राज्याचा विध्वंस केला, असा खोटा प्रचार करण्यामागे व थोरल्या महाराजांनी हे राज्य संभाजीराजांऐवजी राजारामास देऊ केलं होतं. याही असत्य प्रचारामागे खलपुरुष रामचंद्रपंत अमात्य व तत्कालीन नाकर्ते मंत्रिमंडळच होतं व त्याचा परिणाम बखरकार व इतरांवर झाला. (२७ - पृ. २६ व ३०)

इतिहासतज्ज्ञ श्री. गो. नी. दांडेकरांनी संभाजी महाराजांच्या तेजस्वी व्यक्तिमत्त्वाचा एक खास पैलू सांगताना म्हटलं आहे की, संभाजीराजांत रजपूत बाणा पूर्णपणे प्रकटला होता. पाचपेच ठावे नसणारा, सरळ स्वभावाचा, निकराच्या क्षणी केसरी वस्त्रं परिधान करून वज्रनिश्चयाने जोहाराच्या आगीत उडी घेणारा असा हा राजा होता. त्यांचं मरण म्हणजे एका शूर, निधड्या छातीच्या साहसी रजपूत योद्धाचा आत्मयज्ञ होता. पोर्तुगीज व्हिसेरईचा पाठलाग करताना त्यांनी आपला अबलख घोडा खाडीच्या चढत्या पाण्यात घुसवला. खंडो बल्लाळाने घोड्याचा लगाम धरून त्यास मागे खेचल्याने ते वाचले. शिवाजी महाराजांनी असलं दुस्साहस केलं नसतं (३-१० पृ. ४१५). तसंच संगमेश्वर मुक्कामी मोगलांनी त्यांना वेढलं असताना त्यांनी स्वतः त्यांच्याशी लढत बसण्यापेक्षा आपल्या लोकांना त्यांच्याशी तोंड देण्यास मागे ठेवून आपण स्वतः रायगडकडे निसटून जायला हवं होतं. त्यांच्याबरोबरचे काहीजण तसे निसटलेच. अगदी त्यांच्या जीवाभावाचा कवी कलश जरी दंडाला बाण लावून घोड्यावरून खाली आला, तरी त्यांनी त्यांच्यासाठी तेथे थांबायला नको होतं. शिवाजी महाराजांनी पाठलाग करण्यासाठी मागे लागलेल्या शत्रू सैन्यास रोखण्यासाठी बाजीप्रभू देशपांडे यांना पावनखिंडीत सोडून स्वतः विशाळगडाचा रस्ता धरला. तसंच संभाजीराजांकडून अपेक्षित होतं. आपल्याबरोबर असलेल्या म्हालोजी

घोरपडे यांना तिथे मुकाबल्यास ठेवून त्यांनी निघून जाणं अपेक्षित होतं. ते सुखरूप पळाले असते, तर तत्काळ सैन्य जमवून मुकर्रबखानास त्याच्या परतीच्या वाटेवर गाठून आपली अटक झालेली माणसं, ते सोडवू शकले असते. पण दुर्दैवाने असं झालं नाही. वैयक्तिकदृष्ट्या वीरश्रीचा संचार अंगी झाल्यावर कधीकधी मागचा पुढचा विचार न करता, परिणामांची पर्वा न करता, संकटाच्या खाईत स्वतःस झोकून द्यायची, राजास अनुचित असलेली संभाजीराजांची दुःसाहसी वृत्ती यातून दिसते.

संभाजी महाराजांच्या चरित्राचा असामान्य विशेष धैर्य हा गुण होता, हे सांगताना इतिहासाचे अभ्यासक, प्रा. श. श्री. पुराणिक म्हणतात, 'बालपणी औरंगजेबाची मल्लयुद्धाची आज्ञा संभाजीराजांनी ठोकरून लावली ते बालसुलभ, निसर्गसिद्ध धैर्य होते; अकबराला आश्रय देऊन औरंगजेबाला त्यांनी आव्हान दिले ते तारुण्यातील उद्दाम धैर्य होते, पुढे आठ वर्षे त्यांनी अनेक शत्रूंविरुद्ध प्राणपणाने झुंज दिली ते वीराचे धैर्य होते आणि अखेरच्या क्षणी, शस्त्र, सैन्य, राज्य एवढेच नव्हे, तर त्यांचे नेत्रसुद्धा त्यांच्यापासून हिरावून घेतल्यावर त्यांनी मृत्यूला तोंड दिले ते त्यांचे हुतात्म्याचे धैर्य होते.' (३-११, पृ. १८८)

श्री. बेंद्रे यांनी विस्ताराने संभाजी महाराजांच्या कारकिर्दीचा आढावा घेऊन शेवटी त्यांची स्वभाव वैशिष्ट्यं सांगताना म्हटलं आहे की, त्यांनी आपल्या कारकिर्दीचा क्षण अन् क्षण कर्तव्यनिष्ठेत घालवला. धैर्य, धाडस, चिकाटी, सावधपणा, दूरदृष्टी या गुणांचा संभाजीराजे आदर्श होते. धैर्याने त्यांनी मृत्यूला तोंड देऊन मराठ्यांना पुढच्या संग्रामाला तेज पुरवलं. ते ज्ञानजिज्ञासू, प्रेमळ, प्रजाहितदक्ष आणि मुलकी कारभाराचे तज्ज्ञ होते. (३-१५, पृ. १५२)

वेदमूर्ती गागाभट्टांनी 'समनयन' हा आपला ग्रंथ संभाजीराजांना अर्पण केला आहे. त्यात 'ज्यांच्या तळपणाऱ्या पराक्रमाने दिशा उजळून गेल्या आहेत, असे स्वयंभू संभाजीराजे.' असा ते त्यांच्याबद्दल उल्लेख करतात.

संभाजी महाराजांनी शिवछत्रपतींच्या कार्याचा वारसा, घरच्या व बाहेरच्या शत्रूंना तोंड देत, समर्थपणे चालवला आणि स्वराज्यासाठी आत्माहुती दिली. ताठ मानेने जगावं कसं, हे तर त्यांनी शिकवलंच, पण ताठ मानेने मरावं कसं, हेही त्यांनी दाखवून दिलं. अशी तेजोनिधी पिता-पुत्राची जोडी पुन्हा जगात होणं असंभव.





## २. संभाजीराजांच्या विरोधात कटकारस्थाने

संभाजीराजे-मराठी राज्याचे हे पहिले युवराज- आपला वारसदार, शिवाजी महाराजांनी अशाप्रकारे विद्या, कला, प्रशासन, युद्धनीती व राजनीती अशा सर्वच क्षेत्रांत निपुण बनवला असताना व त्यात त्यांनी केलेल्या प्रगतीचं पाश्चिमात्य प्रवासीही कौतुक करीत असताना त्यांच्या युवराज म्हणून असलेल्या स्वराज्याच्या गादीवरील हक्काविषयी शिवाजी महाराजांच्या हयातीतच काही सरकारकुनांशी का वितुष्ट यावं? खरं म्हणजे या सरकारकुनांनी युवराजांविरुद्ध काटकारस्थाने का सुरू करावीत? याचं उत्तर वरवर पाहता वाटतं तितकं साधं व सोपं नाही. जिजामाता हयात असेपर्यंत हा वाद उद्भवला नाही. त्यांच्या मृत्यूनंतरच (१७-६-१६७४) या वादास व कारस्थानास उघड सुरुवात झाली, असं निश्चितपणे म्हणता येईल. संभाजीराजे प्रत्यक्ष जिजामातेच्या देखरेखीखालीच वाढले असल्याने त्यांच्याविरुद्ध जिजामातेच्या हयातीत खोट्यानाट्या कागाळ्या करणं कोणासही शक्य नव्हतं व त्याचा उपयोगही झाला नसता. त्या देवलोक पावल्यावर मात्र तशी परिस्थिती राहिली नाही. त्या निवर्तल्यामुळे संभाजीराजांचं संरक्षणकवच जणू नष्ट झालं व एका अर्थाने हा आईविना युवराज उघडा पडला. जिजामातेच्या मृत्यूसमयी संभाजीराजे सतरा वर्षांचे होते व ते युवराज म्हणून संबोधित झाले होते. राजाची गादी मोठ्या मुलासच सर्वसाधारणपणे मिळते हे जगजाहीर आहे. त्यावेळी रामराजे केवळ चार वर्षांचे असल्याने त्यांच्या मातोश्री सोयराबाईसाहेब यांना यात काही खंत वा वैषम्य वाटण्याचा प्रश्नच नव्हता. शिवाय छत्रपतींचं चारित्र्य व व्यक्तिमत्त्वाचा दबदबा, तसंच जिजामातोश्रींचं आजवर घराण्यावर असलेलं करारी छत्र, याचाही काही परिणाम त्यांच्यावर संभवतो. संभाजीराजांचेही आपल्या सर्वच सावत्रमातांशी अतिशय आदराचे व जिव्हाळ्याचे संबंध होते. ते तेरा वर्षांचे होईपर्यंत एकमेव राजपुत्र असल्याने व त्यात अतिशय देखणे व लाघवी

असल्याने सर्वच मातांचे ते लाडके होते. मग त्यांच्यात आणि काही सरकारकुनांत का बनत नसावं? याचं उत्तर म्हटलं तर साधंसरळ आहे व म्हटलं तर तसं नाही. थोडक्यात म्हणता येईल की, सरकारकुनांना त्यांना राजपद मिळणं नको होतं. का नको होतं, तर त्यातील आण्णाजी दत्तो व प्रल्हाद निराजी यांचे गैरव्यवहार त्यांच्या निदर्शनास आले होते. ते (संभाजीराजे) शिकलेले व प्रतापी होते, स्वतंत्र बुद्धीने वागणारे होते व आपल्या कर्तबगार पित्याप्रमाणेच, त्यांच्या पावलावर पाऊल टाकून कणखरपणे राज्य करणार, अशी लक्षणं स्पष्ट दिसत होती. तसं पाहिलं तर प्रत्यक्ष शिवाजीराजांनाही वैदिक धर्म पद्धतीने राज्याभिषेक व्हावा, असं हिंदू धर्मीय कट्टरपंथीयांना कुठे वाटत होतं? त्यांचा त्यास विरोधच होता. (७-पृ. ४८०) राजांनी तो घडवून आणला ही गोष्ट वेगळी. शिवाजी महाराज हे समताधिष्ठित राज्यकारभाराचे पुरस्कर्ते होते. त्यामुळे आजवर वर्णवर्चस्वाचा पुरता लाभ घेणाऱ्या संकुचित वृत्तीच्या सनातन्यांना आपलं समाजातील स्थान डळमळीत होत असल्याचं दिसत होतं. शिवाय महाराजांना ते विरोध करू शकत नव्हते. कारण त्यांचं अफाट कर्तृत्व व सर्व वर्णियांना शिक्षा करण्याचे त्यांनी मिळवलेले सर्वाधिकार. आता ही व अशीच राज्यपद्धती व सत्ता जर संभाजीराजे पुढे चालवणार असतील, तर समाजातील आपलं वर्चस्व अबाधित राखण्यासाठी त्यांच्या भावी राजपदाला आताच खो घालणे इष्ट असा त्यांचा विचार असावा. मग यावर उपाय काय? उपाय हाच की, त्यांच्या गादीवरील हक्कास बाधा आणावयाची. त्यांच्या जागी बाल रामराजांना पुरस्कृत करावयाचे आणि त्यांच्या लहान वयाचा फायदा घेऊन त्यांना नामधारी बनवून आपणच खरी सत्ता भोगून समाजातील आपलं अत्युच्च स्थान पुनर्प्रस्थापित करावयाचं. हे साध्य करावयाचं झाल्यास संभाजीराजांविरुद्ध खोटे आरोप करावयाचे. त्यांचं चारित्र्यहनन करून त्यांना नीतीमान महाराजांच्या मनातून पार उतरवायचं व त्याचबरोबर सोयराबाई राणीसाहेबांच्या मनात संभाजीराजांबद्दल द्वेष जागवून स्वपुत्र राजारामराजे यांना गादी मिळावी, ही त्यांच्या मनात असलीच तर सुप्त असलेली इच्छा नुसतीच जागवायची नव्हे, तर फुलवायची. त्यासाठी मग संभाजीराजे राजारामांचा द्वेष करतात वगैरे गोष्टी त्यांच्या मनात भरवून द्यायच्या आणि याच मार्गाने आण्णाजी दत्तोंच्या पुढाकाराने कटवाल्यांचा पुढील प्रवास झालेला दिसतो. याबाबतीत संभाजीराजांचा स्वतःचा दृष्टिकोन व्यक्त करणारे उल्लेख त्यांच्या दानपत्रात आहेत. त्यांच्या मताप्रमाणे सर्व



अनर्थाचे मूळ शिवाजी महाराजांचे दुष्ट मंत्री होते. वस्तुतः सोयराबाईंचं मन स्फटिकाप्रमाणे निर्मळ होतं, पण या मंत्र्यांनी त्यांच्याविरुद्ध (संभाजीराजांविरुद्ध) त्यांचं मन कलुषित केलं. (३-१७, पृ ३३०)

शिवाजी महाराज कर्नाटक स्वारीहून एप्रिल-मे १६७८ च्या सुमारास परत आल्यावर त्यांच्याकडे मोरोपंतांनी संभाजीराजांविरुद्ध जी तक्रार केली, ती परमानंदांच्या म्हणण्याप्रमाणे अशी : 'मंत्री म्हणतात, महाराजांच्या या कुमाराला आम्ही महाराजांसारखाच नम्रपणे मान देतो; परंतु आम्ही जेव्हा जेव्हा मानवंदना करतो, तेव्हा तेव्हा पहा हे लबाड अमात्य आले. म्हणून हा आमचा उपहास करतो. प्रजाननांना मात्र पोटच्या पोराप्रमाणे पालन करतो. असा परिस्थितीत राजभाग बुडत असताना वसूल कसा होऊ शकेल? प्रजा केवळ अभय देऊन कर देत नाही. तिथे धाक पाहिजे, धाकदपटशा दाखवूनच कराची वसुली होऊ शकते.' (१-पृ. ९६) (येथे संभाजीराजांवर व्यभिचाराचा किंवा व्यसनीपणाचा कुठलाही आरोप नाही, हे लक्षात घ्यावे. तसेच तक्रारीतले पहिले शब्द 'मंत्री म्हणतात,' हेही महत्त्वाचे आहेत. यावरून हेच दिसते की, ही तक्रार मोरोपंतांची स्वतःची नसून त्यांनी ती मंत्रिगणातील इतर काहीजणातर्फे केली आहे.) आता यात तसे दोन आरोप आहेत. एक आरोप म्हणजे संभाजीराजे प्रजेस अभय देऊन राज्याचे कर बुडवतात. दुसरा आरोप असा की, ते अमात्यांचा उपमर्द करतात आणि याशिवाय त्यांचा आणखी एक आरोप असा होता की, त्यांचे दिलेरखान या मोगल सरदाराशी सूत जुळवणं चालू आहे. यातील पहिले दोन्ही आरोप फारसे गंभीर दिसत नाहीत. पहिला आरोप युवराज कारभाराकडे दुर्लक्ष करतात, असा किंवा त्यांच्या दुर्वर्तनाबद्दल नसून ते कारभाराकडे अधिक लक्ष देतात व सद्वर्तन याबद्दल आहे. (३-१५-१४६) मंत्रिगण रयतेला कर भरण्यासाठी त्रास देत असावेत, असाही अर्थ यातून ध्वनित होतो. शिवाजी महाराजांचंही रयतेवर प्रेम होतंच. त्यामुळेच त्यांना रयतेचा राजा असंही म्हणतात. त्यामुळे हा आरोप त्यांनी युवराजांच्या विरोधात गंभीरपणे घेण्याचं कारण दिसत नाही. युवराज अमात्यांचा उपमर्द करतात, हा दुसरा आरोप महाराजांना खचित आवडण्यासारखा नव्हता. पण त्यात ते स्वतः युवराजांना उपदेश करून त्यात सुधारणा घडवून आणण्यास पूर्ण समर्थ होते. त्यांनी त्याप्रमाणे संभाजीराजांशी वार्ताही केली असावी व त्यांचा पक्ष समजून घेतला असावा, असं महाराजांच्या नंतरच्या उद्गारांवरून दिसून येतं. महाराज

म्हणाले होते, 'संभाजी ज्येष्ठ व शिकलेला आहे. मी आणि इतर लोकांनी त्यांचा अपमान करू नये, अशी माझी इच्छा आहे. संभाजी प्रतापी आणि स्वतंत्र बुद्धीने वागणारा असल्याने ते मंत्र्यांना सहन होत नाही.' अनुपुराणातच असा उल्लेख आहे. (३-पृ.३९) यावरून अशी शक्यता वाटते की, काही मंत्र्यांच्या खासकरून आण्णाजी दत्तो व प्रल्हाद निराजीच्या अनिष्ट कारवाया युवराजांच्या नजरेस आल्याने ते त्यांच्या नजरेतून उतरले असावेत अथवा युवराजांच्या लहान वयामुळे काही मंत्र्यांकडून त्यांना म्हणावा तसा मान देण्यात टाळाटाळ होत असावी आणि याचा परिणाम युवराजांकडून मंत्र्यांशी अनुचित वागण्यात होत असावा. संभाजी स्वतंत्र बुद्धीने वागणारा आहे. असं महाराज म्हणतात. याचाच अर्थ ते मंत्रिगणांच्या हातातील बाहुलं बनून राज्यकारभार करणाऱ्यांपैकी नव्हते आणि इथेच माझ्या मते, प्रधानमंडळाला संभाजीराजे का नको होते व बालवयीन रामराजे यांचा पक्ष त्यांनी का घ्यावा, याचं उत्तर मिळतं.

संभाजीराजे व मंत्रिमंडळ यात निर्माण झालेल्या संघर्षाबाबत आपलं अभ्यासू मत मांडताना डॉ. जयसिंगराव पवार म्हणतात, 'सोयराबाईंची महत्त्वाकांक्षा या प्रधानांनी अधिक फुलवली असावी. कारण, ही मंडळी वयोवृद्ध राजकारणी व बुद्धिमान होती. त्यामानाने सोयराबाई परिपक्व बुद्धीची व दूरदृष्टीची स्त्री होती, असं वाटत नाही. राज्यातील प्रधान आपल्या बाजूस आहेत, हे पाहिल्यावर त्यांनाही आपल्या कारवाया करण्यास अधिक चितावणी मिळाली असावी. अशाप्रकारे कुटिल राजकारणी प्रधान व मत्सरग्रस्त राणी एकत्र आल्यावर दोहोंच्या समान प्रतिस्पर्ध्यास-संभाजीराजांस हतबल करण्यासाठी अनेक डावपेच लढवणं आवश्यक ठरलं. संभाजीराजांचं चारित्र्यहनन अशाच एका डावपेचाचा भाग असावा.'

'राजकारणातील सत्ता स्पर्धेत प्रतिपक्षाचं चारित्र्यहनन करून त्यास बदनाम करण्याची अनेक उदाहरणं आपणास अगदी अलीकडच्या इतिहासातसुद्धा सापडू शकतील. संभाजीराजांच्या चारित्र्याविषयी ज्या अनेक दंतकथा त्यांच्या हयातीत निर्माण झाल्या, त्याचा शोध या कुटिल राजकारणाच्या पार्श्वभूमीवर घेतला, तर मग खाफीखान, मनुची आदींच्या कानापर्यंत जाऊन पोहोचलेल्या संभाजीराजांच्या इष्काच्या कथा मुळातच कोणी निर्माण केल्या असतील, त्याचा अंदाज बांधता येतो.' (३-पृ.३९). एक गोष्ट निश्चित समजून घेण्यास



हरकत नाही की, हा कलह सुरू करण्याचं संभाजीराजांना काही कारण नव्हतं. कारण ते महाराजांचे ज्येष्ठ पुत्र होते. रूढीनुसार राज्याचे वारस ठरले होते व शिवाजी महाराजांनी त्यांना राजकारणात वारसासारखंच वागवलं होतं. तेव्हा या कलहाची सुरुवात प्रधानमंडळातील धुरीण आण्णाजी दत्तो व नंतर त्यांनी आपल्याकडे कावेबाजपणे वळवलेल्या संभाजीराजांच्या सावत्रमाता सोयराबाई यांच्यातर्फेच झाली, हे उघड आहे. प्रधानमंडळाने यात आपल्या विशिष्ट स्वार्थासाठी आपलं नाक खुपसलं नसतं, तर हा वाद एक तर झालाच नसता वा फार तर एक जुजबी गृहअसंतोष म्हणून राणी सोयराबाई, संभाजीराजे व थोरले महाराज यांच्यातच सीमित राहिला असता व त्यास कटकारस्थान, खूनखराब्याचे प्रयत्न, असं व्यापक व भयानक स्वरूप आलं नसतं.

तिसरा जो गंभीर आरोप होता, तो म्हणजे संभाजीराजे दिलेरखानाशी सूत जुळवत आहेत. त्याबद्दल एका वेगळ्या प्रकरणात ऊहापोह केला असल्याने इथे त्याची चिकित्सा करीत नाही. इथे एवढंच नमूद करता येईल की, संभाजीराजांनी दिलेरखानाशी जो पत्रव्यवहार केला. त्याची काहीही कारणं असोत. पण सरकारकुनांनी संभाजीराजांच्या विरोधात जे पाऊल उचललं होतं, त्याचं हे मूळ कारण नव्हतं.

संभाजीराजांना राज्याच्या सरकारकुनांचा विरोध होण्याचं नंतर आणखी एक कारण देण्यात आलं. ते म्हणजे संभाजीराजांनी उत्तर भारतीय तांत्रिक ब्राह्मण (कवी कलश) यास राजकारणात महत्त्व देऊन शाक्तपंथीय तांत्रिक गोष्टीस उत्तेजन दिलं आणि हे महाराष्ट्रातील वैदिक धर्माभिमानी ब्राह्मणांना मानवणारं नव्हतं, हे होय. पण तेही सरकारकुनांचा संभाजीराजांना विरोध होण्याचं मूळ कारण नव्हे. संभाजीराजांचा शाक्तपंथीयांशी संबंध आला. तो त्यांना थोरल्या महाराजांनी ऑक्टोबर १६७६ मध्ये दक्षिण स्वारीवर निघताना शृंगारपुरास ठेवलं तेव्हा. आणि त्यांना तेथे महाराजांनी ठेवण्याचं कारणच मुळी रायगडावर या दोन्ही पक्षांत आपल्या गैरहजेरीत कुरबुरी नकोत म्हणून. सरकारकुनांनी स्वार्थासाठी राजारामांचा पक्ष घेऊन संभाजीराजांना विरोध केला नसता व फक्त मराठी राज्याच्या रास्त हिताची काळजी वाहून संभाजीराजांचा विश्वास संपादन केला असता, तर थोरल्या महाराजांना युवराज यांना शृंगारपुरास ठेवण्याचं कारण नव्हतं व संभाजीराजांना कवी कलशास जवळ करण्याचं कारण नव्हतं; ज्यामुळे पुढे घडलेल्या कित्येक अनुचित घटना घडल्या

नसत्या. संभाजीराजांना सरकारकुनांचा मुळात विरोध होता तो सोयराबाई राणीसाहेबांच्या निमित्ताने बालरामराजांचा पक्ष घेऊन, राज्याचे सर्वाधिकार मिळवण्यास त्यांनी शोधलेल्या संधीतील ते एक मोठी अडचण होते, ही होय. ही अडचण दूर करण्यासाठी त्यांची जी कारस्थाने चालू होती तिचा मूळ उद्देश झाकण्यासाठी त्यांना ही नंतरची कारणं मिळत गेली व त्यांचाच त्यांनी जास्त बोभाटा केला, इतकंच.

संभाजीराजे हे सर्व दृष्टीने युगप्रवर्तक छत्रपती शिवाजी महाराजांचे सुयोग्य वारस असताना त्यांच्याविषयी सुमारे २७० वर्षे अनेक अपसमज का व कसे रूढ झाले? त्यास कारणीभूत कोण? याचा प्रथम आढावा घेऊ.

संभाजीराजांचं विकृत चरित्र रेखाटण्यात 'कृष्णाजी अनंत सभासद बखर' व 'मल्हार रामराव चिटणीस बखर' या दोन बखरी प्रामुख्याने कारणीभूत आहेत. यातील सभासद बखर ही संभाजी महाराजांच्या मृत्यूनंतर ७-८ वर्षांनीच लिहिली गेली असल्याने ती तत्कालीन या दृष्टीने अधिक महत्त्वाची मानतात. 'चिटणीस बखर' मात्र संभाजी महाराजांच्या हत्येनंतर तब्बल १२२ वर्षांनी लिहिली गेली आहे. या दोन्हीही बखरीतील संभाजी महाराजांच्या संबंधीचं लिखाण बऱ्याच अंशी कल्पित आणि विपर्यस्त आहे ते भिन्न भिन्न कारणांनी. सभासदाने आपली बखर राजाराम महाराजांचं वास्तव्य जिंजीत असताना, त्यांच्या दरबारच्या आश्रयाने पुरी केली. त्यामुळे संभाजी महाराजांची जमेल तशी नालस्ती व राजाराम महाराजांची मर्जी संपादण्यासाठी त्यांची स्तुती, प्रशस्ती हेच हेतू स्पष्ट होतात. राजारामांना छत्रपतीचा मान प्राप्त होण्यापूर्वीच किंवा संभाजी महाराजांच्या कैदेपूर्वीच मोगलांनी हिंदवी स्वराज्याचा सर्व प्रदेश आक्रमिला होता, अशा गैरसमजुतीच्या प्रचाराला रामचंद्रपंत जबाबदार आहेत असं स्पष्ट दिसून येंते, असे श्री. बेंद्रे यांनी नमूद केले आहे. ते असंही म्हणतात की, संभाजीराजांबद्दलचा अश्लील प्रचार रामचंद्रपंत आणि तत्कालीन नाकर्ते मंत्रिमंडळाचा होता आणि त्याचा परिणाम बखरकार व इतरांवर झाला. (२७-पृ.२७) मल्हार रामरावाचं लिखाण सर्वथा पूर्वग्रहदूषित दृष्टिकोनातून केलं गेलं आहे. याचं कारण म्हणजे मल्हार रामरावांचा खापर पणजोबा बाळाजी आवजी चिटणीस यास संभाजी महाराजांनी त्यांच्यावरील विषप्रयोगात आण्णाजी दत्तोस प्रत्यक्षपणे विरोध न करता, अप्रत्यक्षपणे मदत केल्याबद्दल हत्तीच्या पायी देऊन ठार मारलं त्याचा सूड हे आहे.



बखरीतून खरा इतिहास थोडाच आढळून येतो. याचं कारण त्यात बखरकाराने आपल्या कल्पनाशक्तीने बरंच काही लिखाण केलेलं असतं व ऐतिहासिक पुरुषांबाबतच्या त्यांच्या व्यक्तिगत राग-लोभाचा त्यात रंग उतरलेला असतो. त्या दृष्टीने या दोन्ही बखरकारांनी व विशेषतः मल्हार रामरावाने संभाजी महाराजांच्या बाबतीत फार विपर्यस्त व काल्पनिक लिखाण केलं आहे. याचं कारण अस्सल साधनांचा वापर करून सत्य तेच लिहिणे, ही दृष्टी त्यावेळी नव्हती. बखरी म्हणजे बऱ्याचशा काल्पनिक आणि सांकेतिक अशा ललित कृती होत्या. सत्याविष्कारापेक्षा वाङ्मयीन परिणामाकडे लेखकांची नजर असे. शेजवलकर नेहमी म्हणत असत, 'या परभानेच (मल्हार रामराव चिटणीस) हनुमान स्वामींच्या नावावर खपत असलेली रामदासस्वामींची बखरसुद्धा लिहिली असावी. कारण त्या बखरीत अद्भुतरम्यता आणि चमत्कार भरले आहेत.' (३-१८-४०९) बखरकार इतिहासाचा अपलाप कसा करीत असतात, याचं एक उदाहरण द्यायचं झाल्यास १८१८ मध्ये लिहिलेल्या शिवदिग्विजयकाराचं देता येईल. संभाजीराजांच्या मातोश्री सईबाई यांच्या मरणकाळचा प्रसंग. संभाजीराजांना भेटीसाठी तातडीचा निरोप गेला. ते येण्यापूर्वी सईबाईंनी आपल्या मनातील व्यथा महाराजांना बोलून दाखवली आणि प्रेमळ मातृहृदयाला अनुसरून संभाजीराजांना सांभाळून घेण्याविषयी महाराजांची विनवणी केली. त्या म्हणाल्या, 'संभाजी तुमचा आहे. मी त्याविषयी सांगावे असे नाही; परंतु तापिष्ट प्रकृतीपुढे उपाय काय? त्याचे ठायी जनाची अलोभता वागती. मी जाणते; परंतु पोटचा गोळा दैववान आहे, याकरिता सांभाळ नीट करावा. वरकडनिशी लोभ नाही, सर्व लक्ष स्वामींचे चरणविंदी आहे. सौभाग्य मृत्यू यावा हा आमचा धर्म.' तेवढ्यात संभाजीराजे तेथे येऊन पोहोचले व त्यांनी आईच्या चरणी मस्तक ठेवलं. पुढील वर्णन करताना बखरकार म्हणतात, 'तोंडावरून हात फिरवून कुरवाळीले आणि त्यास सांगितले की, आजवर मूर्खपणा केला, महाराजांचे आज्ञेत राहिला नाही म्हणून दूर ठेविले.... महाराजांची आज्ञा भंग करू नका. तुम्हास आता चांगले सांगणार महाराज व मातुश्रीवाचून कोण्ही नाही.' (३-३३ पृ. ४३४) आता या घटनेला प्रत्यक्ष इतिहासाचा कोणताही आधार नाही. कारण सईबाईच्या मृत्यूसमयी (सन १६५९) संभाजीराजे केवळ दोन वर्षांचे होते. पण बखरकाराच्या मनात संभाजीराजांबद्दल ते उग्र प्रकृती होते अशी जी छाप होती, त्याला अनुलक्षून हा अनैतिहासिक काल्पनिक

वृत्तान्त त्याने नोंदला आहे.

कृष्णाजी अनंत सभासद व मल्हार रामराव चिटणीस या दोघांच्याही बखरींवर विसंबून सुरुवातीला ग्रँट डफने १८२६ मध्ये 'The History of Marathas' हा त्रिखंडात्मक इतिहास लिहिला व १८२९ मध्ये त्याचा मराठी अनुवाद 'मराठ्यांची बखर' या नावाने कॅ. केपन डेव्हिड याने प्रसिद्ध केला व त्याच्या अनेक आवृत्या निघून तो महाराष्ट्रातच नव्हे, तर भारतभर सुमारे एक शतक प्रमाण मानला गेला. त्यानंतर न्या. रानडे यांनी 'Rise of Maratha Power' हा ग्रंथ १९०० मध्ये प्रकाशित केला. नंतर दोन वर्षांतच रिसायतकार गो. स. सरदेसाई यांनी आपल्या रियासतीचे पहिले दोन खंड १९०२ मध्ये प्रसिद्ध करून १९१५ मध्ये त्याची सुधारित आवृत्ती काढली. न्या. रानडे व रियासतकार या दोघांनी अनेक ठिकाणी ग्रँट डफच्या मतांचं खंडन केलं असलं, तरी मूलतः ते लिखाण त्याच्यापेक्षा वेगळं नाही. कारण मूळ संदर्भ सभासद व मल्हार रामराव यांच्या बखरीचाच त्यांनी घेतला आहे. रियासतकारांनी काही ठिकाणी संभाजी महाराजांच्या पराक्रमाचा गौरव केला आहे. पण अनेक पानांवर त्यांनी राजांच्या क्रौर्य, विलास, व्यसनाधीनता, दुर्वर्तन, लहरीपणा, अदूरदृष्टी, बेशिस्त, बेबंद प्रशासन इत्यादी दुर्गुणांचा प्रायः त्या दोन बखरींच्याच आधारे निर्देश केला आहे. या तिघा इतिहासकारांनी संभाजी महाराजांच्या कारकिर्दीसाठी खाफीखान, साकी मुस्तैदखान इत्यादींचे साधन ग्रंथ आधार म्हणून घेतले असले तरी त्यांचा मुख्य भर सभासद व मल्हार रामराव यांच्या बखरींचाच आहे व ऑर्म आणि मनुची यांचा आधार ग्रँट डफचं पुस्तक आहे. ऑर्मनंतरच्या युरोपियन इतिहासकारांनी ऑर्मचा इतिहास आधारभूत धरून संभाजीविषयी लेखन केल्याचे जर्मन इतिहासकार एम. सी. स्प्रेंगेल (सन १७८५), आँग्ल इतिहासकार एडवर्ड स्कॉट-वेअरिंग (सन १८१०) आणि मराठ्यांचा समग्र इतिहास लिहिणारा जेम्स कनिंग हॅम ग्रँट डप (सन १८२६) आदि इतिहासकारांनी संभाजीराजांबद्दल ऑर्मचाच आधार घेतला आहे. (३-१४-पृ. ११९)

आणि यानंतर वरील सर्व बखरकारांनी व त्यांच्या बखरींच्या आधारे लिहिणाऱ्या इतिहासकारांनी प्रसृत केलेली संभाजीराजांची मलीन प्रतिमा सर्व थरांतील जनमानसात रुजवली ती साहित्यिकांनी. इतिहास किंवा बखरी सामान्य जनता वाचत नाही. ते सिनेमा, नाटकं बघतात व त्यातून रंगवलेला संभाजीच त्यांना भावतो. संभाजी महाराजांच्या व्यक्तिमत्त्वाबद्दल आम मराठी समाजात



जबरदस्त आकर्षण आहे. त्यांचं देखणं राजबिंडं स्वरूप, बेडर स्वभाव, तरुण वय, त्यांचा पराक्रम, शौर्य, धाडस, मनाचा दिलदारपणा, स्वाभिमानी स्वभाव, धर्माभिमान यावर त्यांच्या मदिरा व मदिराक्षीच्या आहारी गेल्याच्या तथाकथित दुर्गुणांसह सर्वच माणसं प्रेम करीत आली. 'रम्याणां विकृतिरपी श्रियं तनोती' अशी एक संस्कृत उक्ती ('जे जे रम्य निसर्गसुंदर तया शोभाच दे विकृति' हे त्याचे माधव ज्युलियन यांनी केलेलं काव्यरूप भाषांतर) त्याचंच जणू हे उदाहरण. इंग्रजीमध्येही "A little ineptitude is a charming thing in a competent man." असा याच अर्थाचा वाक्प्रचार आहे. साहजिकच साहित्यिकांना संभाजींवर नाटकं लिहिण्यास व सिनेनिर्मात्यांना सिनेमे तयार करण्यास एक उत्तम माध्यम सापडलं व गेल्या शंभर वर्षांत त्यामुळे त्यांच्यावर अनेक नाटकं व सिनेमा निघाले. साहित्यिकांनी रंगवलेला संभाजी पराक्रमी आहे, दिलदार आहे, बाणेदार आहे, स्वाभिमानी आहे. शत्रूपुढे नतमस्तक न होणारा निर्भय राजा आहे. धर्मासाठी कुखंडी करणारा धर्मवीर आहे. (आणि हे सर्व खरं आहे.) पण त्याबरोबरच मदिरा व मदिराक्षीच्या नादात गुरफटून गेलेला प्रेमी, दुराचारी, व्यसनी, राज्याची हेळसांड करणारा, बेफिकीर व शिवरायांच्या नावास काळिमा लावणारा (हे मात्र सर्व अनैतिहासिक) असा संमिश्र आहे. आपल्या कलाकृतीच्या यशासाठी त्यांना असा संभाजी रंगवणं आावश्यक होतं व तसा बराचसा विकृत संभाजी बखरकारांनी आधीच त्यांच्यासमोर उभा केला होता. मग मल्हार रामरावांची काल्पनिक स्त्री गोदावरी नावाने वसंत कानेटकरांच्या नाटकात रंगवली होती. तुळसा हे पात्र आत्माराम मोरेश्वर पाठारे यांनी आपल्या संगीत नाटकासाठी १८९१ मध्ये निर्माण केलं. सिने-निर्मात्यांनी थोरातांची कमळा व मोहित्यांची मंजुळा ही काल्पनिक पात्रं संभाजींवरील चित्रपटांत रंगवली आणि असेच अनेक प्रकार झाले.

संभाजीराजांविषयी आपल्या बखरीत सभासदाने जे लिहिलं, त्याचा आशय साधारण असा आहे, 'त्याने थोर थोर ब्राह्मण मारले, मराठे लष्कराच्या व सरदारांच्या इज्जती घेतल्या. कैफ खाल्ला, गांजा ओढला, इश्कबाजी केली, द्रव्य उडवले, राज्य गमावले व दगा खाल्ला.' (सभासदाने हे सारे विचार भविष्य रूपाने शिवाजींच्या तोंडी घातलेले आहेत. म्हणून खाल्ला म्हणण्याऐवजी सभासद 'खाईल' म्हणतो. खरोखरी सभासदाला खाल्ला हेच अभिप्रेत आहे.) (३-१५-पृ.१५६)

मल्हार रामरावांनी संभाजी महाराजांच्या कारभाराचं जे वर्णन केलं, त्याचं सार साधारण असं आहे. 'संभाजीराजांच्या कारकिर्दीत कलुशा कबजीच्या नादाने राज्यातील पुरातन सेवकांची अप्रतिष्ठा झाली, वर्णविचार राहिला नाही, वाममार्गकर्मामुळे प्रजाजन त्रास पावले, प्रजा क्षुब्ध झाली, न्यायाची रीत राहिली नाही, देवाब्राह्मणांच्या ठायी निष्ठा राहिली नाही, कबजीच्या नादे राजांनी अनेकांची घरे बुडविली, अनेकांना नागविले, बुद्धिवंत व शूर लोक हतवीर्य झाले. पागा, हत्ती, सर्व कारखाने, फौज बेनिगेने सर्व बुडाली, कर्ती माणसे चहूकडे गेली; राजा वेडा झाला.' (३-१५-पृ.७४)

वरील दोन बखरकारांनी व्यक्तिगतरीत्या संभाजीराजांविषयी नेमकं काय म्हटलं आहे त्याला महत्त्व न देता, या दोघांच्या लिखाणाचा एकत्रित परिणाम जो वाचकांच्या मनावर ठसतो, तो साधारणपणे असा- 'वडिलांच्या हयातीत संभाजीराजांनी राज्यकारभाराकडे कधीच लक्ष दिले नाही. ख्याली-खुशाली, शिकार इत्यादी बाबींतच त्यांचे लक्ष गुंतून राहिले. हा पराक्रमी, शक्तिमान, रागीट, लहरी, रंगेल, पण उदार व इतरांच्या आहारी जाणारा असा होता. त्याचा स्वभाव विलासी असल्यामुळे अनैतिक व व्यभिचारिक या सदराखाली येणारी कृत्ये त्याच्याकडून नेहमी घडत. त्याच्या प्रधानांच्या मुलीपर्यंत त्याच्या विलासाची झळ लागलेली होती. त्याच्या दुर्वर्तनाने महाराज व्यथित झाले व त्यांनी त्यास शिक्षा करावयाचे ठरविल्यावर तो मोगलांना मिळाला. महाराजांनी त्यास युक्ती-प्रयुक्तीने परत आणले व पन्हाळ्यावर कैदेत ठेवले. आपल्या राज्याचे दोन भाग करून कर्नाटकाचे राज्य संभाजीस देण्यास महाराजांचा विचार त्यांस पसंत नव्हता. महाराजांच्या मृत्यूनंतर राजारामांचे मंचकारोहण करून मंत्रिमंडळाने त्यांना अटक करण्याचे ठरविले, पण संभाजींने तो डाव उलटविला व रायगडाचा ताबा घेतला. जुने मंत्रिमंडळ ठार केले. सावत्रमाता सोयराबाई यांना भिंतीत चिणून मारले. नालायक लोक हाताशी धरले. तंत्रविशारद कलशाच्या हाती राज्याची सूत्रे दिली व तो स्वतः व्यसनासक्त झाला. राज्यभर अव्यवहार, अनाचार, फितुरी माजली. या संधीचा फायदा घेऊन औरंगजेब मराठी राज्यावर चालून आला. संभाजींनी प्रतिकाराची तयारी केलीच नव्हती. कलुशावर विसंबून ते गाफील राहिले. कलुशाने मोगलांच्या सुभेदारीच्या आशेने त्यांना पकडून दिले. दारूच्या धुंदीत गाफील राहिल्याने राजे (संभाजी) पकडले गेले.' इत्यादी (३.१५-पृ.१४१)



आता सन १९१५ पर्यंत संभाजीराजांवर इतिहास लिहिणाऱ्या इतिहासकारांचा संभाजी म्हणजे तपशिलात रियासतकार गो. स. सरदेसाईंच्या इतिहासातील संभाजींची व्यक्तिरेखा बखरकारांपेक्षा वेगळी असली, तरी पिंडप्रकृतीने बखरकारांचाच संभाजी त्यांनी स्वीकारलेला दिसतो. सरदेसाईंचा हा संभाजी बखरकारांच्या संभाजीप्रमाणे गाफील, लहरी, विलासी, कर्ती माणसं गमावणारा, आलेल्या संधीचा फायदा न घेणारा व कलुशाच्या आहारी जाऊन सर्वस्व हरणारा असा उरला आहे. फरक साधारण एवढाच दाखवता येईल की, यांच्या संभाजीने राजकारणाचा भरपूर अनुभव घेतला, मनसबदार म्हणून मोगलांकडे असताना त्यांच्या सहवासाने तो छांदिष्ट व विषयी बनू लागला. त्याने महाराजांच्या मृत्यूनंतर रायगडावर आल्या आल्या आण्णाजी दत्तो वगैरे राजद्रोह्यांना ठार न मारता नुसते कैदेतच ठेवलं, आपल्या मंचकारोहणप्रसंगी त्यांना सोडूनही देऊन पूर्वीच्याच जागांवर त्यांच्या नेमणुका केल्या. मात्र, पुन्हा त्यांनी विषप्रयोगाने त्यांना (संभाजीराजांना) ठार मारण्याचा प्रयत्न केला, तेव्हाच सर्वांना त्यांनी ठार मारलं. कवी कलश हा शेवटपर्यंत त्यांच्याशी प्रामाणिक होता. तो बखरकार म्हणतात त्याप्रमाणे मोगलांचा हेर नसून त्याने राजांबरोबरच आपलं मरण पत्करलं. थोरल्या महाराजांनी मरणसमयी राज्य कोणास द्यावं हे ठरवलं नव्हतं, असा थोडा वेगळा मजकूर आहे. (३-१५-१४२)

संभाजीराजांवर बखरकारांनी व बेंद्रे यांच्या आधीच्या इतिहासकारांनी अनेक आरोप केले आहेत. त्यातील एक गंभीर आरोप म्हणजे त्यांचा तथाकथित बाहेरख्यालीपणा व प्रेमप्रकरणं. तेव्हा त्याबद्दल आधी विस्ताराने ऊहापोह करतो म्हणजे त्यास वस्तुस्थितीचा आधार नसून सर्व कसे कपोलकल्पित आहे, हे दिसून येईल. त्यांच्यावर झालेल्या इतर आरोपांबाबत वेगळं काही लिहिण्याची मला गरज वाटत नाही. कारण या पुस्तकातील इतर प्रकरणं वाचकांनी वाचल्यास, त्यातील खोटेपणा सिद्ध होऊन सत्य परिस्थितीचा अंदाज त्यांना आपोआपच येण्यासारखा आहे.

संभाजीराजांची प्रतिमा स्त्रीलंपट व दुराचारी अशी बनवली गेली. ती प्रथमतः मल्हार रामरावांच्या बखरीतील एका वृत्तान्ताने. त्यात त्याने प्रसंग दिलेला आहे तो असा, 'कोण्हे एके दिवशी हळदकुंकू समारंभ, शीतला गौरी, यास सर्व सुवासिनी स्त्रिया राजवाड्यात येणार त्यात कोण्ही रूपवान स्त्री आली. तिजला महालात नेऊन बलात्कार-अविचार जाला हे वृत्त महाराजांसही समजले. ते

समयी बहुत तिरस्कार येऊन बोलिले जे, 'राज्याचे अधिकारी हे, अगम्यागमन श्रेष्ठ वर्णाचे ठायी जाले, सर्व प्रजा हे राजाचे कुटुंब आप्तसमान, हे पुत्र जाले तरी काय करायचे? त्याचा त्याग करीन, शिक्षा करीन ऐसे आग्रह करून बोलिले. ही बातमी संभाजी महाराज यांस समजली. त्याजवरून दोन घोडियांवरी आपण व स्त्री ऐसे बसोन, पाच पंचवीस माणसे मावळे आपले खासगीची घेऊन रात्रीसच निघोन पाचवडास असता तेथून गेले. ते वेळे दिलेरखान औरंगाबादेस होते त्यांजपाही गेले.' (२-पृ. ६३)

या संबंधीच असावा असा थोडा वेगळा मजकूर 'बुसातिन्-उस्-सलातिन' (विजापूरच्या आदिलशाहीचा इतिहास) मध्ये आला आहे. त्यात म्हटलं आहे. 'सिवाजी कित्येक कामाबद्दल संभाजीसी त्रासून कंटाळला होता. या दिवसात शहरनवीस (सुरनीस) याचे कन्येवर संभाजी फार आषक होता; म्हणजे लुब्ध झाला होता... येणेकरून संभाजीविसी मनात आणिले की, संभाजीस हरएक बाहान्याने पकडून जिवे मारावा किंवा कैद कारावा. संभाजी याणी हा सिवाजीचा इरादा ओलखून संशयांकित जहाला. आपण दिलेरखानाकडे निघोन जावे असा निश्चय केला.' त्याने पुढे संभाजी प्रत्यक्ष दिलेरखानाकडे गेला असं नमूद केलं आहे. (२-६३)

वरील दोन्ही मजकुरांशी संलग्न वाटावा असा आणखी वेगळा मजकूर शेजवलकरांनी आपल्या शिवचरित्राच्या 'शिवाजी-संभाजी संबंध' या प्रकरणात दिला आहे. त्यात ते म्हणतात की, संभाजीराजांच्या दुर्वर्तनाचा पहिला दाखला म्हणून सन १६७५ च्या अखेरीस शिवाजी महाराजांवर झालेल्या विषप्रयोगाचा देता येईल. ते लिहितात, 'प्रसंग सन १६७५ च्या अखेरीस झालेल्या शिवाजींचा दीर्घ आजार व त्यातून त्यांच्या मृत्यूची उठलेली चौफेर बातमी हा आहे. इंग्रजांना कळले की, शिवाजींना त्यांच्या मुलानेच विष घातले, कारण त्याला कळले की बापाने रायगडच्या पहारेकऱ्यांना संभाजी रात्री किल्ल्याखाली उतरण्याची आपली खोड न सोडील, तर त्याला बेशक तटावरून लोटून द्यावे, असे फर्माविले होते. संभाजी रात्री शिवाजींच्या प्रमुख ब्राह्मणांपैकी एकाच्या मुलीला भेटण्यासाठी किल्ल्याखाली उतरत असे व तिच्याशी त्याचा अनैतिक संबंध होता.' (७-पृ.१४२) यात संभाजीराजांच्या गैर वागण्याचा उल्लेख असला, महाराजांचा त्याबाबतीतील त्यांना शिक्षा देण्याच्या हेतूचा वृत्तान्त असला, तरी त्याबद्दल ते दिलेरखानाकडे गेल्याचा



उल्लेख नाही. उलट त्यामुळे त्यांनी खुद्द वडिलांवरच विषप्रयोग केल्याचं म्हटलं आहे. शेजवलकरांनी इंग्रजी बातमीपत्रावरून हा उल्लेख केला असला, तरी इंग्रजांचेच बातमीपत्र नंतर खुलासा करते की, हा विषप्रयोग संभाजीने केला नसून एका न्हाव्याने केल्याचं स्पष्ट झालं आहे. त्यावेळी शिवाजी महाराज जिवंत राहिल्यानेही इंग्रजांचं पत्र अस्सल असलं, तरी त्यातील माहिती अस्सल नाही, हे स्पष्ट होतं. (३-पृ.३४)

खुद्द मल्हार रामराव ज्याने आपल्या बखरीत या तथाकथित घटनेची प्रथम वाच्यता केली, ती मूळ बखरच मुळी त्यांनी संभाजी महाराजांच्या मृत्यूनंतर तब्बल १२२ वर्षांनी लिहिली. 'बुसाहिन-उस्-सलातिन' हा ग्रंथही महंमद झुबेरी या लेखकाने १८२४ साली म्हणजे मल्हार रामराव यांच्या बखरीनंतरही १४/१५ वर्षांनी लिहिला. तोपर्यंत या घटनांचा कुठेही उल्लेख नाही. तेव्हा इतक्या उत्तरकालीन ग्रंथांतील कथा काल्पनिक असण्याचीच जास्त शक्यता आहे. (३-पृ.३५) संभाजीराजे दिलेरखानाकडे गेले, ते महाराज त्यांना शिक्षा करतील म्हणून नव्हे, तर महाराजांवर रूसून गेले, असं आधीच्या ग्रंथात म्हणजे 'सभासद बखरी'त व 'जेधे शकावली'त नमूद आहे. फ्रेंच गव्हर्नर फ्रान्सिस मार्टिन व सुरतकर इंग्रजही तो वडिलांवर नाखूष होऊन दिलेरकडे गेला म्हणतात. (२-६२) ९१ कलमी बखरीतही एवढा व असाच उल्लेख आहे. याशिवाय संभाजीराजे रायगडावरून दिलेरकडे गेले, असं मल्हार रामराव म्हणतो तर ते प्रत्यक्षात शृंगारपुराहून त्याच्याकडे (मधे सज्जनगडावर थांबून) गेले. शिवाय संभाजीराजे ऑक्टोबर १६७६ मध्ये महाराजांबरोबरच रायगडावरून बाहेर पडले ते १३ डिसेंबर १६७८ रोजी दिलेरखानाकडे जाईपर्यंत दोन वर्षे ते रायगडावर मुळी नव्हतेच. ते त्यानंतर रायगडावर गेले. ते थोरल्या महाराजांच्या मृत्यूनंतरच १८ जून १६८० रोजी तब्बल ३ वर्षे ८ महिन्यांनी. म्हणजे तथाकथित प्रसंग रायगडावर ज्यावेळी घडला म्हणतात त्यावेळी संभाजीराजे रायगडावर मुळी नव्हतेच. संभाजीराजांना शिवाजी महाराज त्यांच्या चुकीबद्दल ठार मारणार होते, असं 'बुसातिन-उस्-सलातिन' आणि 'चिटणीस बखरीत' म्हटलेलं असलं, तरी ते दिलेरखानाकडून परत आल्यानंतर महाराजांनी त्यांना सामोपचाराने, प्रेमाने, घरोब्याने, आपुलकीने वागवल्याचं त्यांनी व्यंकोजींना स्वतःच लिहिलेल्या पत्रात कळवलं आहे. शिवाजी महाराज असल्या अनैतिक वर्तणुकीच्या बाबतीत इतके कडक होते की, त्यांनी हा मल्हार रामरावांनी लिहिलेला मजकूर

खरा असता, तर स्वतःचा मुलगा जरी त्यात गुंतला असला, तरी त्याच्या अक्षम्य गुन्ह्याबद्दल त्यास देहान्त शासन वा इतर कडक शिक्षा करावयासही मागे पुढे पाहिले नसते. (२-पृ.६४) आणि हेही खरे की, नुसत्या बाजारगप्पा ऐकून ते कडेलोटाची शिक्षा देणारे कधीच नव्हते. ते न्यायप्रिय होते. त्यांनी आरोपीताची बाजू ऐकून, खरं खोटं आजमावूनच निकाल दिला असता.

थोरले महाराज दक्षिण स्वारीवर निघण्यापूर्वी (ऑक्टो.१६७६) थोडे आधी त्यांनी दरबार भरवला होता. त्यावेळी त्यांनी संभाजीराजांना काही उपदेश केला होता. (त्याचा उल्लेख 'दिलेरखानाकडे संभाजीराजे' या प्रकरणात केला आहे.) त्यात त्यांनी 'तुझे गुण मोठे आहेत' असं संभाजीराजांबाबत म्हटल्याचं नमूद आहे. मग संभाजीराजांच्या तथाकथित रूपवान स्त्रीवरील वाड्यातील अत्याचाराची घटना, जी आधी घडल्याचं मल्हार रामराव सांगतात व महाराज त्याबद्दल संभाजीराजांना शिक्षा करणार म्हणून ते दिलेरखानाकडे गेले, असं ते म्हणतात. त्याचा मेळ कसा बसवणार? तसंच महाराज दक्षिण स्वारीवरून परत आल्यावर जेव्हा रायगडी दाखल झाले, तेव्हा मोरोपंतांनी संभाजीराजांविरुद्ध महाराजांकडे जी तक्रार केली, त्यातही या असल्या त्यांच्या तथाकथित गैर वागण्याचा उल्लेख नाही. डॉ. कमल गोखले म्हणतात की, १६७१ साली संभाजीराजांना कारभार सांगितल्यापासून ते १६७७ च्या जानेवारीमध्ये ते इंग्रजांकडे कामासाठी जाईपर्यंत संभाजीराजांच्या युद्धाच्या आघाडीवरील हालचालीत किंवा राज्यकारभारातील कामकाजात त्यांनी कुठेही गैरवर्तणूक किंवा गैरकारभार केलेला दिसत नाही. त्यांच्यावर सोपवलेली कामगिरी ते व्यवस्थित रीतीने पार पाडताना दिसतात. (२-पृ.५१) (३-४२-पृ.५)

तत्कालीन लेखक वस्तुस्थिती सांगताना शिवाजी महाराज व संभाजीराजे यांच्यामधील असंतोषाचं कारण देतात व काही विशेषतः सतराव्या शतकातील बखरकार, संभाजीराजे राजियांवर (थोरल्या महाराजांवर) रूसून गेले हेच कारण देतात; परंतु उत्तरकालीन लेखक अशा प्रसंगाने उठणाऱ्या बाजारगप्पांवर विश्वसून, संभाजीराजांनी 'थोर ब्राह्मणाच्या' मुलीशी बदकर्म केलं, त्यामुळे शिवाजी महाराज त्यांस ठार करणार हे समजून ते पळून गेले, असं लिहितात. अर्थात, असल्या कथाख्यानी लेखनावर विश्वास ठेवण्याइतकी ती पात्र नाहीत. (१-पृ.१०५/१०६) स्त्रीसंबंधित चारित्र्याला फार महत्त्व आहे. चारित्र्याने सैल असलेल्या व्यक्ती जनमानसात स्थान मिळवू शकत नाहीत. शिवाजी महाराज स्वतः



अत्यंत चारित्र्यवान होते व ते स्त्रीशील-रक्षणाबद्दल अत्यंत आग्रही होते. तेव्हा संभाजीराजांना गादी मिळू नये याकरिता व त्यासाठी संभाजीराजे महाराजांच्या मनातून उतरावेतच, या हेतूने या असल्या गैरवर्तणुकीच्या अफवा संभाजीराजांचे विरोधक व राजारामांचे पुरस्कर्ते सरकारकून मंडळी व सोयराबाई यांनी उठवल्या असाव्यात असं वाटतं. गादी मिळवण्यासाठी व सत्ता भोगण्यासाठी माणसं कोणत्या थराला जातात याची इतिहासात अनेक उदाहरणं आहेत. उमाजी पंतांच्याद्वारे सोयराबाईने संभाजीला व्यसनाधीन बनवण्याचा प्रयत्न केल्याची गोष्ट 'प्रभुरत्नमाला' या ग्रंथात दिलेली आहे. (२-पृ. ६४) तद्वतच नंतर राजाराम महाराजांना व्यसनासक्त करून व नामधारी बनवून आपण सत्ता भोगण्याचा प्रकार प्रल्हाद निराजीने केला. त्याचा उल्लेख नंतर येईलच.

युवराज संभाजीराजांचं चारित्र्यहनन करणाऱ्या, जनमानसात रूढ असलेल्या त्यांच्या नायिका म्हणजे तुळसा, गोदावरी व कमळा. यापैकी तुळसा हे पात्र संभाजींवरील आपल्या संगीत नाटकासाठी आत्माराम मोरेश्वर पाठारे यांनी १८९१ मध्ये निर्माण केलं, ही माहिती आधी आलीच आहे. गोदावरीची कथासुद्धा वर नमूद आहे. तिची म्हणून जी समाधी रायगड परिसरात दाखवली जाते, ती प्रत्यक्षात सवाई माधवराव पेशवे यांच्या यशोदाबाई या स्त्रीची आहे. थोरातांच्या कमळेची म्हणून जी समाधी पन्हाळ्याच्या पायथ्याशी पर्यटकांना आजही दाखवली जाते, ती प्रत्यक्षात यशवंतराव थोरात व त्यांच्या पत्नीची (गोडाबाई) समाधी आहे. यशवंतराव थोरात हे करवीरकर संभाजीराजे यांच्यातर्फे सातारकर शाहूंच्या सैन्याशी पन्हाळ्याच्या पायथ्याशी लढा देत असताना छातीत भाला लागून मरण पावले. तेथे त्यांची पत्नी गोडाबाई अग्निप्रवेश करून सती गेल्या. त्या दोघांची संयुक्त समाधी थोरात घराण्यातील लोकांनी त्या जागी उभारली व तिच्या गाभाऱ्यात पती-पत्नीचे स्मारक म्हणून एक स्त्री-पुरुषाची पाषाणमूर्ती स्थापन केली. ही मूर्ती ढाल-तलवार आदी शस्त्रांनी सज्ज दाखवली आहे. पन्हाळ्याचे इतिहास संशोधक मु. गो. गुळवणी यांनी हा शोध घेतला आहे. (३-३०-पृ.३०६) गुळवणी यांना माझे बंधू कॅप्टन प्रतापसिंह हे समक्ष भेटले असतानाही त्यांनी हीच हकीकत सांगितली. त्यावेळी त्यांनी आणखी एक हकीकत सांगितली तीही इतिहास संशोधकांच्या माहितीसाठी थोडं विषयांतर करून इथे सांगतो. ते म्हणाले की, बाजीप्रभू देशपांडे यांनी शिवाजीराजे विशाळगडावर सुखरूप पोहोचावेत म्हणून पावनखिंडीत शत्रूला अडवताना

जेव्हा देह ठेवला, तेव्हा त्यांच्या शवाचं पुढे काय झालं, याचा शोध त्यांनी (गुळवणी यांनी) घेतला. तेव्हा त्यांना माहिती मिळाली की, खुद्द शिवाजी महाराजांनी बाजीप्रभूंचं निष्प्राण शरीर विशाळगडावर आणवून तिथे त्यांची समाधी बांधून घेतली. बाजीप्रभूंचे बंधूही यावेळी त्यांच्याबरोबर होते व तेही तिथेच शत्रूशी लढताना त्यावेळी शहीद झाल्याने त्यांचंही शव महाराजांनी बाजीप्रभूंच्या शवाबरोबर विशाळगडावर आणवून त्यास अग्नी दिल्याचं गुळवणींनी त्यावेळी सांगितलं.

गोदावरी व कमळा यांना लोककथेत स्थान असलं, तरी त्यांना ऐतिहासिक आधार मात्र नाही. याप्रमाणे सर्व आढावा घेऊन डॉ. जयसिंगराव पवार यांनी निष्कर्ष काढला आहे की, रायगडावरील गृहकलहाची कारणं इतिहासकार बराच काळ समजत होते, त्याप्रमाणे संभाजीराजांच्या दुर्वर्तनात नसून, ती राणी सोयराबाई व प्रधान यांच्या महत्त्वाकांक्षेत व स्वार्थामध्ये होती. (३-पृ.३६)

आता युवराज संभाजीराजे व महाराजांचं प्रधान मंडळ यांच्यातील बिघडलेल्या संबंधांची कारणमीमांसा करण्याआधी शिवछत्रपतींचं प्रधान मंडळ व इतर कारभारी यांच्या कारभारावर, त्यावेळच्या धार्मिक व सामाजिक परिस्थितीचे भान ठेवून, नजर फिरवणं संयुक्तिक ठरेल. बखरी व त्यांच्या आधाराने लिहिले गेलेले ऐतिहासिक ग्रंथ, शिवाजी महाराजांचे सर्वच सरकारकून प्रथमपासून संभाजीराजांच्या काळापर्यंत हयात होते व त्यांचा नायनाट संभाजीराजांनी केला, असा आभास निर्माण करतात. खरी परिस्थिती अशी होती की, शहाजीराजांनी शिवरायांबरोबर पाठवलेल्या कारभाऱ्यांपैकी जवळपास सर्वजण वयोमानाप्रमाणे १६६३ पूर्वीच मरण पावले होते. त्यांच्या मरणामुळे रिकाम्या झालेल्या जागांवर शिवरायांनी ज्यांची नेमणूक केली होती, त्यापैकी निळो सोनदेव, रघुनाथ पंडितराव, त्रिंबकजी सोनदेव आणि सेनापती प्रतापराव गुजर, शिवरायांच्या राज्याभिषेकापूर्वीच निवर्तले होते. शिवाजी महाराजांच्या मृत्यूसमयी तर निराजी रावजी व दत्ताजी त्रिंबक यांनीही इहलोक सोडला असल्याने त्यांच्याजागी वंशपरंपरेने आलेले सर्वच अननुभवी होते व त्यांच्यात मोरोपंत, आण्णाजी दत्तो व सेनापती हंबीरराव मोहिते हेच काय ते जाणते व अनुभवी होते. अष्टप्रधान सोडून इतर जुन्या जाणत्या कर्तृत्ववान, निकटवर्ती कारभाऱ्यांतील रघुनाथ बल्लाळ कोरडे, बाबाजी नाईक पुंडे हेही मरण पावल्याने राहुजी सोमनाथच फक्त हयात होते. हंबीरराव मोहिते जरी अगदी शिवाजी महाराजांच्या



राज्याभिषेकापूर्वी नेमले गेले होते, तरी त्यांची नेमणूक वारसदारीवर नसून, गुणांवर झालेली होती आणि सेनाधिकारी नेमताना महाराज हीच पद्धत अवलंबत असत. (१-पृ. १२८)

शिवाजीराजांच्या राज्यकारभारास प्रथम पुणे-इंदापूर भागात सुरुवात झाली. तेथे साहजिकच त्याकाळी लेखन व्यवहार जाणणाऱ्या ब्राह्मण व्यक्तींच्या नेमणुका झाल्या. ही मंडळी लेखक वर्गाची वाढती गरज प्रामुख्याने आपल्या आप्त-इष्टांना हाताखाली घेऊन भागवू लागली. त्यामुळे कारभार काही कुटुंबांच्या हातात गेला व नियंत्रणात ढिलाई निर्माण झाली. (१-पृ.१३७) (३५-पृ.१६०) खालच्या थरातील कारभारात ही परिस्थिती तर वरिष्ठ पातळीवर काम करणाऱ्या मोरोपंत सोडून इतर सरकारकुनांची कथा फ्रायरने, आण्णाजी दत्तोवर रोख धरून वर्णन केल्याप्रमाणे वेगळीच होती. फ्रायर म्हणतो, 'विशेष महत्त्वाच्या व भरवशाच्या अधिकारावर शिवाजी फक्त ब्राह्मण नेमतो. फार तर त्यांचेसारखे लेखक नेमतो. ही फार लबाड जात आहे... खरे सांगायचे तर लोकांच्या कल्याणापेक्षा स्वार्थासाठी (हे) झटत असतात. ते लोकांच्या चांगल्याकरिता किंवा सामान्य न्यायदानासाठी जणूकाय नेमलेले नसतात. ते खासगत फायदा कसा होईल, इकडे लक्ष घालीत असतात. ते लोक कसलीही निकृष्ट व वाईट माणसं आपल्या नोकरीत ठेवतात. व्यापाऱ्यांना व्यापारासाठी बोलावून आणतात आणि त्यांना जकातीवरून त्रास देऊ लागतात व लुबाडतात. इतकी धडपड ते आपल्या धन्याकरिता करतात असेही नाही. केवळ आपला स्वार्थ कसा साधता येईल, एवढाच काय तो त्यांच्यापुढे उद्देश असतो; परंतु ते वरवर धन्याच्या हितासाठीच सारखे डोळ्यांत तेल घालून कारभार पाहात आहोत असे जितक्या प्रकाराने धन्यास दाखविता येईल तितक्या प्रकाराने दाखवित असतात.' (१-पृ.१३०) आण्णाजी दत्तोच्या गैरशिस्त, जुलमी व भ्रष्ट कारभाराबद्दल फ्रायरने जे वर म्हटलं आहे, तसेच शेरे त्याच्याबद्दल राजापूरकर व मुंबईकर इंग्रजांच्या पत्रातही ठिकठिकाणी आढळतात. (१-पृ.१३३) १६८१ च्या मे महिन्यात संभाजी महाराजांचं डिचोली इथे काही दिवस वास्तव्य होतं. ही संधी साधून गोव्याच्या व्हिसेरेईने त्यांना एक पत्र पाठवून त्यांच्या अधिकाऱ्यांविषयी त्यांच्याकडे तक्रार केली. सदरहू पत्रात व्हिसेरेई म्हणतो, 'आपला डिचोलीचा सुभेदार हा चोर आणि जुलमी आहे. तो आपल्या प्रजेचा छळ तर करतोच पण... त्याच्या छळास कंटाळून आमच्या राज्यात येऊन राहिलेले देसाई आता परत तिकडे जाण्यास तयार

नाहीत... आपल्या अधिकाऱ्यांकडून होणारी दुष्कृत्ये आपणास माहीत नसावी, असे मला वाटते. आता मी आपणास कळवितो की, ह्या प्रश्नात आपण लक्ष घालावयाची वेळ आली आहे....' त्यावेळचा डिचोलीचा सुभेदार मोरो दादाजी हा आण्णाजी दत्तोच्या मर्जीतील असल्याने मग्रुरीने वागत होता. संभाजीराजांनी येसाजी गंभीर या मुत्सद्यास डिचोलीस धाडून मोरो दादाजीवरील आरोपांची चौकशी केली व आरोप सिद्ध होताच त्यास नोकरीतून अर्धचंद्र देण्यात आला व त्या जागी जिवाजी विनायक याची डिचोलीचा सुभेदार म्हणून नेमणूक करण्यात आली. (३-९, पृ.२१०) याचा अर्थ, नुसते इंग्रजच नव्हे, तर पोर्तुगीजांचीसुद्धा मराठी सुभेदारांविरुद्ध गैरशिस्त व जुलमी कारभाराबाबत तक्रारी असत. राज्यातील सरकारकून व त्यांचे मुनीम रयतेला हैराण करीत होते, असं इतरांप्रमाणे कवींद्र परमानंदही लिहितात. (१-पृ.१३६) कारवारकडील व्यापारीवर्गाच्या पत्रांचाही या आरोपास आधार मिळतो.

महाराजांच्या सैन्यव्यवस्थेबाबत बोलताना मात्र फ्रायरने म्हटले आहे की, त्यांची निवड वंशपरंपरा नसून केवळ कर्तबगारीवर होत असल्याने, मेहनत व जीवावर उदार होऊन सतत धडपडत राहणे हेच त्यांना करावे लागते. श्री. बेंद्रे म्हणतात की, शिवाजी महाराजांच्या सर्व ब्राह्मण मंत्र्यांत मोरोपंत हा एकटाच काय तो उच्च ध्येयनिष्ठेने कार्य करणारा प्रधानमंत्री होता. त्यांनी शेवटपर्यंत जबाबदारीने श्रमसायास करून कल्याण-भिवंडी व उत्तरेस दमण-खानदेशपर्यंत राज्याचा विस्तार केला. त्यांचा इंग्रज, पोर्तुगीज, मोगली सरदार; जव्हार व रामनगरचे राजे यांच्याशी संबंध आला. त्यांचे मुलुख त्यांनी घेतले; परंतु या भागातील रयत किंवा राजे यांनी मोरोपंतांनी त्यास दिलेल्या वागणुकीबद्दल कधीही विरुद्ध अवाक्षर काढले नाही. त्यांच्याबरोबर मंत्रिपदावर आरूढ झालेल्या इतर ब्राह्मण मंत्र्यांत निळोपंत मुजुमदार व आण्णाजी दत्तो हे दोघेच महत्त्वाच्या जागी होते; परंतु या दोघांची वृत्तीच प्रथमपासून कोती होती. त्या दोघांनाही मोरोपंताबद्दल असूया वाटत होती व आपापसातही ते एकमेकांचा द्वेष करीत असत. शिवाजी महाराजांनी जेव्हा निळोपंतास पुरंदर परत घेण्यास पाठवले तेव्हा त्यांनी तो घेतला, पण आपण पुढाकार न घेता केसोपंतांवर जबाबदारी टाकून तो घेतला. त्यात केसोपंत मरण पावले. त्याचप्रमाणे आण्णाजी दत्तोसही जेव्हा महाराजांनी पन्हाळा घेण्यास पाठवले तेव्हा आपण मागे राहून सर्व कार्य त्यांनी इतरांकडून करून घेतले. पुढे त्यांना फोंड्यावर पाठवले तेव्हा त्यांनी



जबरदस्त मार खाल्ला व खुद्द शिवाजीराजांना खासा जाऊन अब्रू राखावी लागली. महाराजांनी या दोघांची स्वाऱ्यांतील लापरवाही व कुचराई अशा रीतीने जोखल्यावर त्यांना त्यांनी पुन्हा कधी स्वतंत्रपणे स्वारीवर पाठवले नाही, होता होईल तो घरीच सुभ्यावर ठेवले. महाराजांनी त्यांच्याबाबतीत हा जो निर्णय घेतला त्याचे वाईट वाटून घेऊन निळोपंतांनी महाराजांना एक अर्ज केला. त्यास महाराजांनी जे उत्तर दिलं, त्यावरून निळोपंतांना मोरोपंताच्या उत्कर्षाबद्दल वाटणारी असूया, स्वतःच्या युद्धकौशल्यातील कमतरतेची महाराजांनी त्यांना करून दिलेली जाणीव व 'अनाजीपंताचे सांभाळी न करावी.' या महाराजांच्या उद्गारावरून, महाराजांचा आण्णाजी दत्तोवरील गैरविश्वास स्पष्ट कळून येतो. (१-पृ.१३२, १३३)

फ्रायर व कारवार बाजूकडील व्यापारीवर्गाच्या पत्रांचा आधार घेऊन श्री. बेंद्रे पुढे म्हणतात की, न्यायाधीश, डबीर व पंडितराव यांचा वास्तविक लोकांशी संबंध येत नाही व येऊ नये; परंतु मुख्य न्यायाधीश निराजी रावजी व त्यानंतरचा त्यांच्या जागेवर आलेला त्यांचा पुत्र प्रल्हाद निराजी यांना इंग्रज त्यांचे प्रोक्युरेटर (एजंट) समजत असत व त्यांनी त्यांच्यासाठी सरकारात केलेल्या कामाबद्दल त्यांना बक्षिसांच्या रूपाने लाच देत असत. पुढे राजारामकाली जिंजीला प्रल्हाद निराजीने एक लाख रुपये लाच घेऊन, खंडो बल्लाळ वगैरेंच्या मनाविरुद्ध राजारामांकडून एक मान्याचे ठिकाण इंग्रजांस दिले व त्यांनी ते मोगलांस दिले. त्यामुळे खंडो बल्लाळादी लोकांच्या सांगण्याप्रमाणे पंधरा दिवसांत राजाराम महाराजांना जिंजीतून पळ काढणे भाग पडले. हे सांगणारा पत्रव्यवहार 'मद्रास रेकॉर्डस्'मध्ये छापला गेला आहे. (१-पृ.७६०) प्रल्हाद निराजी हा अत्यंत बिलंदर व पाताळयंत्री माणूस दिसतो. आण्णाजी दत्तोच्या संभाजीराजांच्या विरोधातल्या कटात सामील होऊन पन्हाळ्यास जात असता सेनापती हंबीररावांनी आण्णाजी दत्तो व मोरोपंत यांस अटक केल्याचे पाहून त्याने आपला नूर पालटला व संभाजीराजांची बाजू घेऊन याने आपली सुटका करून घेतली. १६८८ साली संभाजीराजांनी त्यास पत्नी येसूबाईंकडून रायगडी पुन्हा अटक करवली. कारण ते पन्हाळ्यास गेले असताना रायगडच्या ब्राह्मण मंत्र्यांनी मोगली सरदारांसमवेत त्यांना (संभाजीराजांना) पकडून देण्याचा कट केला होता, याची माहिती त्यांना मिळाली होती आणि त्यास प्रल्हाद निराजी जबाबदार होता. (२७-पृ.२८)

संभाजीराजांच्या वधानंतर मात्र तो पुन्हा सुटला. जिंजीस असताना त्याने राजाराम महाराजांना निरनिराळी व्यसने लावून ताब्यात घेतले होते. त्याने राजाराम महाराजांना गांजा व खुशाली, चैनीची चटक लावली. पहिल्या तीन महिन्यांतच त्याने त्यांचे ३/४ बायकांशी विवाह जमवले, नर्तकींचे तांडे त्यांच्यापुढे सेवेस हजर केले. येणेप्रमाणे राजाराम महाराजांशी जवळीक साधून, त्याने पंतप्रधान नीळकंठ मोरेश्वर यास डावलून स्वतःसाठी प्रतिनिधीपद घेतले. (२७-पृ. ६१) राजाराम महाराज देशी आल्यावर, देशी लोकांनी प्रल्हादपंतांवर किटाळे उभी केली तेव्हा त्याने पंढरपुरास जाऊन आत्महत्या केली. (२७-पृ.५०५) अर्थात, यात राजाराम महाराजांकडेही दोष जातोच, पण आश्चर्य वाटते ते त्याचे की, शेजवलकरांसारखे मान्यवर इतिहासकार आण्णाजी दत्तो, प्रल्हाद निराजी अशा सरकारकुनांना देखील मोरोपंतांच्या पंक्तीत बसवून सरसकट सर्व सरकारकुनांना करड्या व करारी स्वभावाचे म्हणतात तेव्हा. (७, पृ. १४९)

शिवाजी महाराजांना आपल्या काही मंत्र्यांच्या गैरवर्तणुकीची दखल नव्हती, असे नाही. राजकारण व लढाया यात सतत गुंतून पडावे लागत असूनही व त्यासाठी महिनोन् महिने राजधानीबाहेर राहावे लागत असूनही त्यांचे राज्यकारभारात चौफेर लक्ष असे व सर्व प्रकारच्या नजरेस येणाऱ्या गैरप्रकारांना आळा घालण्यासाठी ते तत्परतेने उपाय योजित असत. आपल्या आणि मोरोपंताच्या लुटीची यादी बरोबर मिळते, पण आण्णाजी दत्तो व दत्ताजीपंत वाकेनिसांची मिळत नाही, हे त्यांच्या लक्षात आले होते. आण्णाजी दत्तोस स्वतंत्रपणे स्वारीवर न पाठवण्याचे त्यांनी ठरवले, त्यास हेही एक कारण असावे. (१-पृ.१३७)

सर्वच मंत्री युद्धकार्यात वाकबगार नाहीत, याची प्रचिती येताच शिवाजी महाराजांनी जरी सर्व मंत्र्यांच्या कार्यक्रमात युद्धविषयक प्रत्यक्ष कामाचा भाग समाविष्ट केलेला होता, तरी सर्वच मंत्र्यांकडे तसे युद्धकार्य न सोपवता व्यक्तिगत तयारी पाहून १/२ मंत्र्यांकडेच जरुरीप्रमाणे ते काम सोपवले. मोरोपंतानी आपली कर्तबगारी चांगलीच दृष्टोपत्तीस आणून दिली होती. त्यामुळे लुटीतील ठराविक भाग त्यांना जादा मिळू लागला, म्हणूनही निळोपंत अमात्यांना मोरोपंतांचा हेवा वाटू लागला. त्यांनी तशी महाराजांकडे तक्रारही केली. त्यांच्या स्वार्थासाठी चाललेल्या खटपटीस पायबंद घालण्यासाठी महाराजांनी त्यांना लुटीतला काही भाग घरबसल्याच द्यायचे कबूल केले, पण युद्धावर त्यांची नेमणूक



करून नुकसान पदरी पाडून घ्यायचे टाळले. लढायातील यशापेक्षा लुटीतील फायदा आपल्या वाट्यास येत नाही, यासाठीच या मंत्र्यांनी व इतर अधिकाऱ्यांनी नाराज होऊन ही चळवळ केली होती. सत्ता आणि स्वार्थ यांनी भारावलेली ही मंडळी शिवाजी महाराजांच्या कडक शासन पद्धतीमुळे जरा संयम राखून होती; परंतु महाराजांच्या मृत्यूने त्यांस अवसर मिळताच त्यांनी केवळ सत्ता व स्वार्थ यासाठी संभाजीराजांच्या विरुद्ध जाऊन त्यांच्या नेतृत्वास दूर राखण्याचा प्रयत्न केला. संभाजीराजे वडिलांसारखेच शूर असल्याने त्यांनी त्यांच्या उठाठेवीस सहज काही काळ दडपून टाकले. (२७-पृ. ४)

शिवाजी महाराज वंशपरंपरेच्या वतनाविरुद्ध होते. सरदेशमुखीची वतने त्यांनी वेळ मिळताच जप्त करून देशमुखांना आपल्या नोकरीत घेतले होते. पण सुभेदार लाचलुचपत घेऊन ही वतने चालू ठेवत व त्याबद्दल शिवाजी महाराजांना राग येई. तेव्हा एका प्रकरणात (५ जुलै १६७९) त्यांनी सुभेदारास खडसावून लिहिले, 'स्वामी धाकटपणापासून या देशात आहेत. मिरासदार कोण, गैर मिरासदार कोण, हे जाणताती व माणसाचे माणूस वलखतात. याउपरी मिरासदारांचे कथले नसते नवे करिसील म्हणजे पावशील.' (१-पृ. १३६)

संभाजीराजे शृंगारपुरास असताना त्यांच्याकडे राज्यातील सुभेदार व इतर कारभारी रयतेला सारा वसुलीसाठी हैराण करतात, अशा काही तक्रारी गेल्या होत्या हे स्पष्ट दिसते. कारण त्यात त्यांनी करमाफी दिल्यामुळे राज्याची करवसुली होण्यात अडथळे निर्माण होतात, अशी मोरोपंतांनीच महाराजांचेकडे तक्रार केली होती. प्रमाणाबाहेर छळवणूक झाल्यासच तक्रारी होतात. सारा वसुली करताना दुष्काळ, शत्रू सैन्याने उभ्या पिकाची, घरादाराची केलेली जाळपोळ, नासधूस या त्याकाळी नेहमी घडत असलेल्या गोष्टी होत्या. त्याचाही विचार न करता जबरदस्तीने करवसुली झाल्यास रयत गांजणारच. तेव्हा करवसुलीत धाक हवा, हे खरे असले तरी त्यात माणुसकीही हवीच आणि हेच उमगून महाराजांनी अनेक पावले उचलली. त्यांनी मनसबदारी पद्धत बंद केली. आपल्या सैन्यास हुकूम दिले की, त्यांनी उभ्या पिकास नुकसान पोहोचवू नये, लागेल तो माल नगदी पैसे देऊन घ्यावा इत्यादी. तसेच सुभेदारांना एक लाख लारीजपर्यंत खर्च करण्याचे अधिकार देऊन, तमाम कुणबियांना मेल गोळा करावा, ज्यास जे लागेल ते द्यावे, कोणाकडे बियाणासाठी

धान्य असेल ते द्यावे. बैल, अवजारे द्यावी व 'अमुचा तमाम कुणबी तया
होईल तैसे करोन चालवावे, उसुल घेताना दामदुपटीने घेवो नये; त्यास जैसे
साध्य होईल तैसाच घेवावा.' अशा प्रकारचे हुकूम दिल्याचे शिवचरि
वाचलेल्या सर्वांनाच माहीत आहे.

महाराजांच्या राज्यक्षेत्रात वाढ होऊ लागली, तसे त्यांनी केवळ ब्राह्मण
लेखकवर्ग न नेमता, कारभारातील ढिलाईस आळा बसावा म्हणून व राजकारणात
स्वामीनिष्ठा व सचोटी राखता यावी या उद्देशाने, त्यांच्या बरोबरीने नवीन प्रदेशात
दुसरा लेखक वर्ग म्हणजे कायस्थ प्रभू व शेणवी यांना कारभारात घेण्याचे ठरवले.
शेणवी मंडळी अल्पसंख्याक, ती जास्त करून पोर्तुगीज कारभारात सामावले
गेली व पुढे आपल्या युरोपीय भाषाज्ञानामुळे इंग्रजांकडे गेली. सभासदांच्या
नोंदीप्रमाणे, 'गडावरील लोक हवालदार व सरनोबत मराठे जातिवंत ठेवावे...
सबनीस ब्राह्मण हुजुरातील ओळखीचे ठेवावे...व कारखानीस प्रभू ठेवावे, असे
एकास एक प्रतिमेळ ठेवावे... नवी पद्धत घातली.' मराठी साम्राज्याच्या छोट्या
बखरीतही अशीच माहिती आली आहे. (१-पृ.१३८)

एवढेच नव्हे तर कर्तृत्ववान माणसांची तूट भरून काढण्यासाठी महाराजांनी
वंशपरंपरा नेमणुकींना फाटा द्यायला सुरुवात केली व निळोपंतांच्या वंशजाला
डावलून रघुनाथपंत हणमंते यांना मजमूचा कारभार दिला; परंतु त्यांना कर्नाटकात
ठेवणे भाग पडले. वाकेनिसाचे जागी दत्ताजींच्या पुत्राला दूर करून जनार्दनपंत
हणमंते यांची योजना केली; परंतु ते कारभार हाती घेत नाहीत, तोच खुद्द
महाराजांनाच देवाज्ञा झाली. (१, पृ. १२८)

या नोकरवर्गाच्या मिश्रणामुळे शिवाजी महाराजांना कारभारातील सचोटी
व निष्ठा जरी वाढविता आली, तरी त्याचबरोबर दोन्ही जमातीत नोकरी व बहुमान
यासाठी लागलेली चुरस ही या जमातींतील परस्पर द्वेष व बेदिली वाढण्यास
कारणीभूत झाली. अर्थात, परस्परांच्या उत्कर्षाविरुद्ध एकमेक प्रयत्न करू
लागले. पुढे ब्राह्मण वर्ग श्रेष्ठ, त्यांना मराठे व कायस्थ यांचे हाताखाली नोकरी
करण्यास लावणे धर्मबाह्य म्हणून बूट निघाला. वाद सांगू लागले. तेव्हा
महाराजांनी, 'ब्राह्मणांपासून नीच सेवा घेऊ नये.' याजकरिता कारखान्यातील
ब्राह्मण दूर करून परभू कारकून ठेवले. यावर मोरोपंत बोलिले की, 'कारखान्याचे
हुद्दे मातब्बर, हुजूर कारखान्यांना इतबार नाही, लोकांवर टाकल्यास बदनक्षा
होईल.' तेव्हा महाराजांनी उत्तर दिले की, 'ज्या जागी ब्राह्मणांचा इतबार होता,



त्या जागा आमच्या हातात आल्या . राजपुरी हपशी याने परभूच स्वाधीन
ठेवली आहे. ते अद्यापि साध्य होत नाही, याजवर इतबार असावा. मग
निळोपंत व मोरोपंत मनात खोचून उगेच राहिले.' 'एक्याण्णव कलमी बखरी'त
अशाच एका प्रयत्नाचे चित्रण केले आहे. तो प्रसंग असा: 'मुलुकास कौल
दिला आणि मालवण व नवगिरी कोट व रत्नागिरी व सुवर्णदुर्ग बांधावयास
काम चालू लागले... आवजीपंतास (आवजी बल्लाळ) पागा बांधावयास
सांगितले... किल्ल्याची किंमत... पाहून इमारतीची कामे वगैरे पाहू लागले.
तेव्हा मोरोपंत व निळोपंतांनी अर्ज केला की, इमारतीस पैका बहुत खर्च येतो.
किल्ले बहुत झाले, महाराज आता किल्ले बांधतात याचे कारण काय? हे
ऐकोन महाराज बोलले, 'तुम्ही बहोत शाहणे सावध आहात; परंतु याचा
विचार करून बोलला नाही. जो किल्ला बांधतो तो काय निमित्य म्हणाल तरी
दाखवा: जैसा कुळंबी शेताला माळा घालून शेत राखतो, असे किल्ले राज्यास
रक्षण आहेत. तारवांस खिळे मारून बळकट करितात तशी राज्यास बळकटी
किल्ल्यांची आहे....'' एकोन पंत खजिली होऊन तोंड झाकून घरास गेले की
महाराजांनी आपल्या बुद्धीस दोष लाविला. (१-पृ.१३९) मोरोपंतांना हे
समजत नव्हते असे नाही; परंतु कामच राहिले तर आवजीचा उत्कर्ष होणार
नाही ही इच्छा. पुढे सारांश सांगताना श्री.बेंद्रे म्हणतात, 'ही दोन्ही जमातींतील
(एका बाजूस ब्राह्मण व दुसरीकडे कायस्थ व मराठे हे ब्राह्मणेतर) तेढ विशेषत:
नोकरीच्या टंचाईमुळे किंवा कार्यकर्तृत्वास अवसर राहिला नाही म्हणून वाढली
नव्हती, तर त्यात मुख्य कारण म्हणजे सुभेदार, सरकारकून व अधिकारी
यांच्या स्वैराचारास व स्वार्थाला धक्का बसत होता, हे होय.' श्री. बेंद्रे पुढे
असेही म्हणतात की, मंत्र्या-मंत्र्यांत अंतस्थ कलहाचे बीज धरून राहिले होते.
तसंच ते ब्राह्मण अधिकारी वर्ग किंबहुना सरकारकून एका बाजूस व मराठे
आणि कायस्थ दुसऱ्या बाजूस यांच्यात अधिक जोमाने पोसले जात होते.
याचा परिणाम म्हणजे सरकारकून व सैन्य यांच्यात एकमेकांवरील विश्वास व
आदर नाहीसा झाला होता. या दुहीच्या अनिष्ट परिणामांची जाणीव शिवाजी
महाराज सर्व जमातींना त्यांच्या कल्याणार्थ करून देत होते हे रघुनाथराव
पंडितरावांचे २३ नोव्हें. १६६९ चे पत्रावरून दिसून येते. त्यात महाराज
म्हणतात, 'ब्राह्मणांचेतर्फे खळबळ होती... यास्तव समस्त पंडित मंडळी...
शिवाजीराजे यांनी मेळवून, ज्याचा जो धर्म त्याचा त्यांनी करावा, त्यात बखेडा

करू नये. धर्मस्थापनेकरीता आमचे साहस. त्यात अधर्माचा दोष न यावा...' यावरून स्पष्ट होते. मोरोपंत व इतर ब्राह्मण यांचा प्रतिस्पर्धी बाळाजी आवजी चिटणीस यांच्या मुलाच्या मुंजीपासून या बेदिलीस सूतोवाच झाल्याने महाराजांना वरील पत्रक काढावे लागले. तरीही खळबळ थांबली नाही, म्हणून १८ ऑगस्ट १६७२ रोजी गागाभट्टी कायस्थ धर्मप्रदीप ग्रंथ आणला.

(राज्याभिषेकापूर्वी शिवाजीराजांना राज्यकारभार पाहताना एक मोठी अडचण होती. त्याचा विचार करून त्यांच्या कारभारातील उणे-दुणे काढावे लागेल. ही अडचण म्हणजे ब्राह्मण गुन्हेगारांच्या शासनाबाबतचे त्यांचे परावलंबित्व. ब्राह्मणांनी वाद उपस्थित केल्यास, ब्रह्मवृंदास जमवून किंवा काशीस्थ ब्राह्मणांकडून त्यांना ते सोडवावे लागत-तत्संबंधीची आज्ञा पंडितरावांच्या नावाने काढावी लागे. सारांश, शिवाजीराजांना धार्मिक बाबतीत सत्ता नव्हती. ही अडचण अर्थात त्यांचा राज्याभिषेक होईपर्यंत होती. एकदा राज्याभिषेक झाल्यावर मात्र शिवाजी महाराज गुन्हेगार ब्राह्मणांना कडक शासन करू शकत होते. (७-पृ.४८०) धर्माच्या नावाखाली राज्यकारभारात अनेक अडचणी निर्माण करणाऱ्या हिंदू सनातन्यांना शिक्षा करता यावी, हाही महाराजांनी वैदिक पद्धतीने राज्याभिषेक करून घेण्यामागे एक विचार होता व त्यांना तो अधिकार प्राप्त होऊ नये, म्हणून हिंदू कट्टरपंथीयांचा त्यांच्या राज्याभिषेकास विरोध होता व त्यात त्यांनी महाराजांच्या वैयक्तिक आचारधर्मातील वैगुण्यावरून काही तांत्रिक अडचणी उभ्या केल्या; परंतु राजांच्या मनात भरलेल्या गोष्टीस विरोध करणे व त्याचबरोबर गागाभट्ट व अनंत भट्ट यांच्याशी तोंड देणेही तितकेच दुर्घट व अनर्थावह होते हे जाणून त्यांनी मिळते घेण्याचा प्रयत्न केला, पण त्यांचा आंतरिक विरोध मावळला नव्हता. (७-पृ.४८०))

संत रामदास हे शिवरायांचे समकालीनच. त्यांचे काही श्लोक व वचने पाहिल्यास त्यावेळचे ब्राह्मण वर्गाचे समाजातील प्रस्थ व वृत्ती यांचे आकलन व्हावे. (पहा 'दासबोध', दशक ५, समास १ मधील श्लोक क्र. ६, १०, १२, १५, १६ आदी.)

शिवाजी महाराजांचा स्वभावच असा होता की, राज्यकारभार सुरळीत चालावा म्हणून प्रधानांपैकी किंवा अधिकाऱ्यांपैकी कोणी दुखावला गेला असेल, तर त्याची समजूत काढून त्याला आपल्या मर्जीत ठेवण्याचे तंत्र ते अवलंबित असत. त्यामुळे वर वर्णिलेल्या धार्मिक स्थितीमुळे ब्राह्मण



सरकारकुनांना आपण शासनातीत आहोत असेच वाटत असल्यास नवल नाही. आपला राज्याभिषेक होऊन धार्मिक सत्ता मिळेपर्यंत महाराज थोडे ब्रह्मनिष्ठ होते, असे म्हणण्यासही वाव आहे. ८ सप्टेंबर १६७१ च्या त्यांच्या पत्रातील बापूजी नलवडा याच्यासंबंधीचा शेरा तेच दाखवितो. पण एकदा राज्याभिषेकानंतर त्यांना धार्मिक सत्ताही जेव्हा प्राप्त झाली तेव्हा त्यांचे धोरण बदलले आणि जातीविरोधातून व वर्णश्रेष्ठत्वाच्या दंभातून निळोपंत व मोरोपंत यांनी मराठे व कायस्थ यांच्या हाताखाली ब्राह्मणांनी कसे काम करावे, म्हणून प्रश्न काढला व आवजी पंतांस दुर्ग बांधण्याचे काम दिल्यावर त्यांनी महाराजांनाच काही शिकविण्याचे गैरवाजवी धारिष्ट्य स्वतःच्या क्षुद्र जातीविरोधातून दाखवण्याचा प्रयत्न केला. तेव्हा राज्याभिषेकानंतर ता. १८ जानेवारी १६७५ रोजी प्रभावळीच्या सुभेदारास लिहिलेल्या पत्रात महाराज रोखठोक लिहितात: 'मोरोपंत पेशवे याणी वराता सुबे मजकुरावरी दिधल्या. त्यास तुम्ही काही पावले नाही म्हणोन... त्यावरून अजब वाटलं की, ऐसे नादान थोडे असतील.. एवढी हरामखोरी तुम्ही कराल.. ब्राह्मण म्हणून कोण मुलाहिजा करू पाहतो... गनीम जालेस ऐसे जाणून बरा नतीजा तुम्हास पावेल.' (१-पृ.१४०) शेवटी मृत्यूपूर्वी तीन वर्षे अगोदर (२८ जाने.१६७७) त्यांनी जाहीरनामा काढून सर्व महाराष्ट्रास गंभीर परिस्थितीची जाणीव दिली ती अशी- 'हिंदू जातीत अनादि-परंपरागत धर्मशास्त्रांप्रमाणे धर्म चालत आले असता अलीकडे (यवनामुळे चालेनासे झाले)... पुन्हा शास्त्रीपंडित व मुत्सद्दी व कारकून यांस आज्ञा होऊन ज्ञातिविवेक व स्कंद पुराणांतर्गत श्याद्रीखंड आदि महान ग्रंथी निर्णय सर्व ज्ञातिविसी जाहले आहेत. ते सर्व ग्रंथांनुमते व जसे ज्याचे धर्म अनादि चालत आले त्याप्रमाणे निरवेध चालावे. अगर ज्या ज्या ज्ञातीस वेदकर्माचा अधिकार असून येवनी जाहल्यामुळे अथवा ब्राह्मणांनी काही द्वेषबुद्धीने शास्त्रानुरूप कर्मे न चालविता मलीन जाहली असतील, ती त्या ज्ञातीचे मंडळींनी पुरी पाहून ज्याची त्याची नीट वहिवाट आचरणे. ज्या जातीत जशी परंपरा चालत आली त्याप्रमाणे चालवावी. जो कोणी द्वेषबुद्धीने, द्रव्यलोभास्तव ब्राह्मण शास्त्रविरहित नवीन तंटे करून खलेल करीत याविसी त्या ज्ञातीवाले यांनी सरकारात अर्ज करावा म्हणजे शास्त्राचे समते व रूढीपरंपरा व ग्रंथ पाहून निरंतर निरमेच्छपणे धर्मस्थापना कोणाचा उजुर न धरिता परनिष्ठ जेव्हाचे तेव्हाच त्वरित बंदोबस्त होईल. हल्ली यवन उत्तर देशीहून येत आहे. तरी सर्व ज्ञातीने एकदिल राहून

कस्त मेहनत सेवा करून शत्रू पराभवाने न्यावा यात कल्याण तुमचे सरकारचे ईश्वर करील.' (१-पृ. १४१)

गेली शेकडो वर्षे वैदिक कट्टरपंथीयांच्या धार्मिक अधिकारात अशा तऱ्हेने राज्यकर्त्यांकडून ढवळाढवळ होण्याचा प्रसंग घडला नव्हता. क्वचित जेव्हा जेव्हा असं घडलं, त्या त्या वेळी त्याचं पारिपत्य झालं. शिवाजी महाराजांना त्यांच्या राज्याभिषेकानंतर मिळालेल्या धार्मिक अधिकारानुसार त्यांनी अशी जाहीर पत्रकं एकामागून एकामागून एक काढण्यास सुरुवात केल्यानंतर कर्मठ सनातन्यांत निश्चितपणे मोठी खळबळ माजली असणार व त्यांच्या धार्मिक सत्तेला व समाजातील स्थानाला ते मोठं आव्हान वाटलं असणार. महाराजांनी नुसती राज्यक्रांतीच नव्हे, तर सामाजिक क्रांतीही केली होती. त्यांनी हिंदू धर्मातील अस्पृश्यतेचा कलंक दूर केला. चातुर्वर्ण्य व्यवस्थेतील वर्णानुसार कर्म ही चौकट खिळखिळी केली व तथाकथित अतिशूद्रांकडूनही क्षत्रिय कर्मे करून घेतली. धर्मपरिवर्तन व समुद्र पर्यटन या हिंदू धर्मात निषिद्ध मानलेल्या गोष्टी धाब्यावर बसवल्या व धर्म परिवर्तनं घडवून आणली. तसंच स्वतःचं आरमारही उभारलं, हिंदू धर्मशास्त्रानुसार ब्रह्महत्या व महापाप असताना जरूर तेथे तशी हत्या करण्यासही त्यांनी मागेपुढे पाहिलं नाही. धर्मास मान्य नसताना आपल्या सेनापतीला मंत्रिमंडळात स्थान दिलं व धर्माज्ञेनुसार, राजावर नियंत्रण ठेवण्यासाठी ब्राह्मण वर्णातील कोणालाही पुरोधा म्हणून आपल्यावर नेमलं नाही. अशा समाजव्यवस्थेसाठी जरूर असलेल्या अनेक सुधारणा त्यांनी त्या काळच्या प्रचंड धार्मिक दडपण असलेल्या काळातही घडवून आणल्या. इतिहास संशोधक शेजवलकर, डॉ. जयसिंगराव पवार आदींनी हे मान्य केलं आहे. (७-पृ.५३७, ३६-पृ.३३) संभाजीराजे यांना साधारण १६७० पासून राज्यकारभारातील धडे देण्यास थोरल्या महाराजांनी सुरुवात केल्यापासून ते अगदी मन लावून हिरीरीने सर्व गोष्टी आत्मसात करीत होते. त्यादरम्यान सरकारकुनांच्या विरुद्धच्या तक्रारी त्यांच्या (संभाजीराजांच्या) कानावर येतच होत्या व जरूर तिथे ते त्यांचं निराकरणही करीत होते, जे सरकारकुनांना आवडत नसावं. शिवाय सरकारकुनांमधील अंतःस्थ लाथाळी, त्यांचा भ्रष्टाचार, त्यांचा वर्णवर्चस्वाचा दंभ असणारी वागणूक व प्रसंगी थोरल्या महाराजांनाही आपल्या जातीविरोधातून काही गोष्ट करण्यास अथवा न करण्यास सुचवण्याचं त्यांना होत असलेलं गैरवाजवी धारिष्ट्य पाहून त्या केवळ वयाने ज्येष्ठ



असलेल्या सरकारकुनांबद्दल (त्यास अर्थात मोरोपंत हा अपवाद) सरळ स्वभावाच्या, आत एक व बाहेर दुसरंच, हे न खपणाऱ्या कवी मनाच्या युवराज संभाजीराजांच्या मनात निश्चितच तिरस्काराची भावना निर्माण झालेली दिसते, जी त्यांच्या सरकारकुनांबरोबरच्या वागण्यावरून स्पष्ट होत होती. संभाजीराजांनी आपल्या बारा वर्षांच्या वयातच प्रथम पंचहजारीचा व नंतर सप्तहजारीच्या सुभेदारीचा अनुभव तीन-चार वर्षे घेतला होता. अशा तऱ्हेने त्यांचा बालपणीचा काळ इतर नैमित्तिक व राजकीय शिक्षणाबरोबरच प्रत्यक्ष अनुभवाचा लाभ घेण्यातही गेला होता. हा काळ संघर्षाचा असल्याने त्यांच्या कानावर येणाऱ्या शिवाजी महाराजांच्या अनेक हालचाली व यशापयश यांचा त्यांच्या मनावर सारखा संस्कार होत राहिला. मुघली दरबारातील सरदारांच्या तरतम हुद्यांचा व त्यांना प्राप्त झालेल्या कमी-अधिक मानमरातबाचाही त्यांच्या संवेदनशील बालमनावर परिणाम झाला. त्यामुळे संभाजीराजांचा आत्मविश्वास दृढ होऊ लागला. तसंच त्याबरोबर त्यांना स्वयंनिर्णयाने कारभार आटोपण्याचं वळणही आपोआप लागू लागलं. हीच संभाजीराजांची वृत्ती कारभाऱ्यांना जाचक वाटू लागली असल्यास नवल नाही. शिवाजी महाराजांनी स्वसामर्थ्याने मिळवलेल्या राज्याचा युवराज व राज्याबाहेरही मोगली दरबारासारख्या साम्राज्यात मिळालेल्या मानमरातबाचा धनी या भूमिकेत ज्यांच्या आयुष्याच्या बालपणास सुरुवात झाली व ज्यांनी शिक्षण घेऊन युद्धविद्येत कौशल्य व शास्त्र आणि राजविद्येत पारंगता प्राप्त केली होती त्या संभाजीराजांनी आपलं वर्तन अधिकारपूर्ण व खंबीर राखू लागणं अगदी साहजिकच व संयुक्तिकही होतं. नेहमीचा अनुभव असा की, वडिलांच्या वेळचे काही नोकर, त्यांच्या बालपुत्रादिकांवर त्यांना अगदीच अनभिज्ञ समजून, योग्य तोल सांभाळून वागत नाहीत. त्यात आणि वरिष्ठ वर्णदंभाचा पीळ त्यांच्या वागणुकीत असला, तर मग बघायलाच नको. संभाजीराजांना हा वरचढपणा खपणारा नव्हता. संभाजीराजांना कारभार मिळेपर्यंत बालयुवराज म्हणून महाराजांना खूश करण्यासाठी कौतुक करणारे वयस्कर मंत्री, बाल युवराज त्यांच्याविरुद्ध तक्रारी ऐकून, गैर वाटणाऱ्या गोष्टींचे निराकरण करू लागल्यावर त्यांना अपमान वाटू लागला. त्यातूनही बालयुवराज जर चौकस, कर्तृत्ववान, प्रजेस प्रिय असून वडिलांची कारकीर्द तशीच न्यायनिष्ठूरपणे व स्वतंत्र बुद्धीने पुढे चालवणार असं दिसू लागल्यावर आपल्या स्वार्थासाठी व आपल्या गैरव्यवहारावर पांघरुण घालण्यासाठी अशा ध्येयशून्य व भ्रष्ट

मंत्र्यांनी व त्यांच्या बगलबच्च्यांनी त्यांची निंदानालस्ती करण्याचा मार्ग अवलंबणे जगरहाटीस धरून आहे. त्यातच संभाजीराजांच्या सावत्रमातेचा मुलाचा पक्ष घेऊन त्यांनाही आपल्या कारस्थानात गोवण्याची संधी त्यांनी साधल्यामुळे त्यांच्या अशा संभाजीविरोधास प्रभावी पाठबळ मिळालं.

युवराज संभाजीराजांच्या विरोधात प्रधान मंडळातील धुरिणांनी सोयराबाई राणीसाहेबांचा पक्ष का धरावा, याची कारणं थोडक्यात खालीलप्रमाणे देता येतील-

१) संभाजीराजे हे वडिलांप्रमाणेच कर्तव्य कठोर होते, शूर होते, स्वतंत्र बुद्धीने वागणारे होते, प्रजाहितदक्ष होते. सामान्य माणसाची त्यांना कणव होती. चारित्र्य, कुवत, कामावरील श्रद्धा, सचोटी व प्रत्यक्ष योगदान याखेरीज केवळ ब्राह्मण म्हणून प्रतीत होणारं वर्णवर्चस्व न मानण्याकडे त्यांचा कल होता. ही गोष्ट प्रधान मंडळातील आण्णाजी दत्तो, प्रल्हाद निराजींसारख्या भ्रष्टाचारी, वर्णवर्चस्वाचा दंभ असणाऱ्या, कोत्या बुद्धीच्या कर्मठ व पुराणमतवादी मंत्र्यांना मानवणारी नव्हती. पाँडेचरीचा फ्रेंच गव्हर्नर मार्टिन म्हणतो की, संभाजीराजा हा कायदेशीररीत्या राज्याचा मालक असता, तो ब्राह्मणाचा शत्रू आहे असा बोलबाला झाल्यामुळे आणि बहुसंख्य प्रधान ब्राह्मण असल्यामुळे त्याला छत्रपती मानण्यास ते नाखूश आहेत. (३-१४-१२०)

२) केवळ ९-१० वर्षांच्या राजपुत्र राजाराम याला गादी मिळवून दिली तर राजमाता, त्यांना दिलेल्या सहाय्यामुळे उपकृत राहतीलच, पुढे त्यांच्यावरच उलटवलेल्या महाराजांवरील विषप्रयोगाच्या आरोपामुळे त्यांना दबावाखाली ठेवता येईल आणि त्याबरोबरच बालराजास नामधारी बाहुलं करून व जमल्यास व्यसनाधीन बनवून (जे त्यांनी पुढे केलंच) सर्व सत्ता प्रत्यक्ष ब्राह्मणांच्या हातात घेता येईल. त्यांच्यावर इतर कोणीही सत्ताधिशाचं धार्मिक व सामाजिक नियंत्रण राहणार नाही. त्यामुळे सध्या ब्राह्मणांना जी अवकळा येऊ पाहात आहे, ती दूर होईल व त्यांना पुन्हा ऊर्जितावस्था प्राप्त होईल. रामदासांनी म्हटलंच आहे ना, 'राज्य गेले म्लेंचि क्षेत्री। गुरुत्व केले कुपात्री। आपण अरत्री ना परत्री। काहीच नाही।।' शिवाजी महाराजांना धार्मिक अधिकार मिळाल्याने त्यांची सत्ता ब्राह्मणांवरही चालते. संभाजीराजे महाराजासारखेच तयार झाले आहेत. तेव्हा ही सत्तेची साखळी भंग करायची झाल्यास संभाजीराजांकडे सत्ता न जाता ती बालराजारामाकडे गेली तरच पुढे यथावकाश ही साखळी तोडता येईल,



असाही सरकारकुनांचा अंतःस्थ हेतू असावा. कारण पुढे पेशवाईत सातारच्या प्रतापसिंह महाराजांवर आपलं क्षत्रियत्व पुन्हा सिद्ध करून घेऊन मगच राज्याभिषेक करवून घेण्याची पाळी आणवली गेली व आधी एका छत्रपतींचं मौजीबंधन तर नाना फडणविसाने पुराणोक्त मंत्रांनी करवून आपले पितर स्वर्गाला पोहोचल्याचा आनंद व्यक्त केला होता. अर्थात, सोयराबाई व हिरोजी फर्जंदसारखे जे लोक सरकारकुनांना मिळाले, त्यांना त्यांच्या अंतःस्थ हेतूंची कल्पना नसणार.

३) संभाजी महाराज दिलेरखानाला मिळाले, हा जसा त्यांना नंतर मुद्दा मिळाला, तसाच आणखी एक मुद्दा नंतर मिळाला. तो म्हणजे संभाजीराजे शाक्तपंथाचे अनुयायी बनल्याने राज्यात आजवर असलेलं वैदिक धर्माचं वर्चस्व धोक्यात येत होतं, ते दूर करता येईल.

४) राज्यात परप्रांती कवी कलश याला स्थानिक ब्राह्मणांच्यावर संभाजी महाराजांनी स्थान दिल्याने तोही राग होताच.

एखाद्या गुन्ह्याचा तपास करताना जसा तपासी अंमलदार संशयितांची गुन्हापूर्व वर्तणूक (Previous Conduct) व गुन्हापश्चात वागणूक (Subsequent Conduct) तपासून पाहून आपला संशय पक्का करतो, तद्वतच संभाजीराजे यांच्या बाबतीत खुनाचे प्रयत्न व इतर जी कारस्थाने झाली, त्यांचा बोध केवळ तत्कालीन कारणांवरून न घेता संशयित वर्गांची पूर्व व पश्चात आढळून आलेली धार्मिक प्रवृत्ती, सामाजिक हितसंबंध व त्याबाबतीत इतिहासात दृग्गोचार झालेली परंपरा इत्यादी घटकांचा आढावा घेऊनच आरोप करावा लागेल. माझ्या मनोगतामध्ये दत्तो वामन पोतदार, शिवाजी सावंत व डॉ. साळुंखे यांचे जे विचार मी नमूद केले आहेत, त्यांचा अर्थ हाच आहे. त्या दृष्टीने आढावा घेतला असता असं दिसून येतं की, सनातनी वैदिक धर्म वर्चस्वाला जेव्हा जेव्हा धक्का बसण्यासारखी परिस्थिती निर्माण झाली, तेव्हा तेव्हा त्यास जबाबदार असणाऱ्या व्यक्तींवर हल्ला, त्यांचा छळ, त्यांची नालस्ती, त्यांचं साहित्य बाद करून, नाश करून वा ते प्रक्षिप्त करून खोटा इतिहास प्रसृत करणं. इतकंच नव्हे तर त्यांना जगातून नाहीसं करण्यापर्यंत हिंदू मूलतत्त्ववाद्यांची मजल गेल्याचे प्राचीन काळापासून इतिहासात अनेक दाखले दिसून येतात. (६-पृ.११) त्यांनी चार्वाकाला जिवंत जाळलं. वेन राजाने यज्ञांवर बंदी घातली म्हणून त्याला ठार मारलं, निमी राजाची हत्या केली. हे

लोक आपला वैदिक धर्म बुडवीत आहेत, असा त्यांच्यावर आरोप होता. (वैदिक धर्मातील विषमता नाहीशी करून समाजात समता प्रस्थापित करणे म्हणजे सनातनी धर्म बुडवणे). चक्रधरस्वामींनी १२६३ मध्ये महानुभाव पंथाची स्थापना केली व हिंदू धर्मातील वेद, चातुर्वर्ण्य, व्रतविधी, अस्पृश्यता, जातिप्रथा, स्त्रिया व शूद्र यांची गुलामगिरी व पुरोहित वर्गवर्चस्व वगैरे वैगुण्यांवर हल्ला चढवला म्हणून प्रतिगामी व रूढीप्रिय सनातनी धर्ममार्तंड खवळले व महदाश्रम व ब्रह्मसान नावाच्या सनातनी कट्टरपंथीयांनी चक्रधरांना प्रथम विषमिश्रित सुपारी व नंतर विष घातलेला विडा देऊन मारण्याचा प्रयत्न केला. तथापि, त्यातून ते वाचल्याने शेवटी यादवांचे प्रधानमंत्री हेमाद्री पंडित यांनी मारेकरी पाठवून चक्रधरस्वामींच्या १२७४ मध्ये सरळ खूनच केला व सनातनी, विषमवादी म्हणून अन्यायी धर्माच्या विरोधातील शक्ती निकामी केली. संत तुकारामांनी वेद, यज्ञादी कर्मकांड, वर्णव्यवस्था इत्यादी सनातनी मूल्यांवर आपल्या धारदार वाणीने तिखट आघात केल्यावर त्यांचाही खूनच झाला, असा निष्कर्ष अभ्यासकांनी काढला आहे. अलीकडच्या काळात महात्मा फुल्यांच्यावरसुद्धा मारेकरी घालण्यात आलेच व महात्मा गांधींचा तर खूनच झाला. (५-२८०) गांधीजी समाजातील बहुसंख्याकांमध्ये जागृती निर्माण करू पाहात होते, त्याला येत असलेल्या यशाचंच प्रतिबिंब गोडसेच्या उत्तेजित होण्यातून स्पष्ट दिसतं, असं प्रसिद्ध समाजशास्त्रज्ञ आशिष नंदी त्यांच्या Final Encounter-the Politics of Assassination of Gandhi या ग्रंथात म्हणतात. काहीजण प्रचार करतात त्याप्रमाणे गांधीजींचा खून कोणत्याही राजकीय कारणासाठी झालेला नसून त्यांनी जे बहुजनांचं उत्थापन आरंभलं होतं, त्यामुळेच झाल्याचा जगन फडणीस यांनीही आपल्या पुस्तकात दाखवून दिलं आहे. (६)

गांधीजींच्या खुनाच्या थोडेच दिवस आधी ता. १४ जानेवारी १९४८ रोजी 'प्रतापसिंह छत्रपती आणि रंगो बापूजी' या आपल्या पुस्तकातील आत्मनिवेदन पुरे करताना प्रबोधनकार ठाकरे यांनी म्हटलं आहे, 'चालू घडीला हिंदुत्वनिष्ठांच्या मुखवट्याखाली चाललेल्या या लोकांच्या उघड-गुप्त खटपटी ब्राह्मणी सत्तेच्या प्रस्थापनेसाठीच आहेत.' (४४-पृ.१२४) हा शेरा गांधी हत्येमागील हेतू स्पष्ट करतो. छत्रपती शिवाजी व संभाजी महाराज यांच्या जीवनांताबद्दल मी जे विचार मांडले आहेत, त्यासंदर्भात पूर्व व पश्चात इतिहासाचे सूक्ष्म अवलोकनात कर्मठ,



हिंदुत्ववादी, धर्ममार्तंडांचा, धर्म व समाजसुधारकांच्या बाबतीतील कार्यपद्धतीचा जो एक दीर्घ व सातत्यपूर्ण अंतरस्रोत दिसून येतो त्याचे स्वरूप स्पष्ट व्हावे यासाठी एवढा परामर्श घ्यावा लागला.

शिवाजी महाराजांच्या आयुष्यातील शेवटचा राजकीय महत्त्वाचा अंक सुरू झाला, तो संभाजीराजे दिलेरखानकडून परतून पन्हाळ्यास आल्यानंतर. त्यावेळी महाराज जालन्याच्या बाजूला स्वारीवर होते. त्यांना संभाजीराजे परत आल्याचं कळल्यावर ते तत्काळ ता. १३-१-१६८० रोजी पन्हाळ्याला गेले. तिथे पिता-पुत्रांची पूर्ण एकांतात स्वराज्यसंवर्धनाबाबत चर्चा होऊन एकमेकांच्या समजुतीने धोरणं निश्चित ठरली. संभाजीराजे दिलेरखानला हूल देऊन निसटून स्वराज्यात आल्याने तो (दिलेरखान) चांगलाच धुसफुसत होता. तो संभाजीराजांवर पन्हाळ्याला चालून येण्याची शक्यता जाणून महाराजांनी संभाजीराजांना पन्हाळा-प्रभावली-दाभोळचा सरसुभा सांगून त्यांच्या जवळ जनार्दनपंत हणमंते यांना डबीर किंवा सुमंताचं सरकारकूनपद देऊन ठेवलं व संताजी घोरपडे यांचे वडील म्हालोजी घोरपडे यांना ५०० स्वारांनिशी नेमून ते रायगडावर परतले. संभाजीराजांना पन्हाळ्यावर नजरकैदेत ठेवले होते, असे जे काही बखरकार सांगतात, ते सारासार चुकीचं आहे. परतताना महाराजांनी शंभुराजांना सांगितलं की, धाकटा पुत्र राजाराम यांचं लग्न लावून येतो व मग राज्यकारभाराचा अधिक विचार करू. तुम्ही वडीलपुत्र आहात, सर्वप्रकारे भरवसा तुमचा. नेसरीच्या लढाईत मारल्या गेलेल्या सरसेनापती प्रतापराव गुजर यांची कन्या जानकीबाई यांच्याशी राजारामांचा विवाह ठरल्याप्रमाणे ता.१५ मार्च १६८० रोजी झाला. त्याच सुमारास महाराजांनी जी एक गोष्ट केली, ती अतिशय सूचक आहे. त्यांनी त्यांच्या कोल्हापुराकडील दक्षिण प्रांताचा सरसुभा दत्तोजीपंत वाकेनिस मरण पावले होते, त्याजागी आण्णाजी दत्तोची नेमणूक करून राजधानीतील कलहाचं मूळ दूर केलं. (१-पृ.१५२) त्यामुळे आण्णाजी दत्तो हतबल झाला. संभाजीराजे मोगलांकडे जाण्याने त्याला जो आनंद झाला होता व त्याच्या अंतःकलहाला प्रोत्साहन मिळालं होतं, ते संभाजीराजांच्या परत स्वराज्यात येण्याने पूर्ण मावळल्याने तो आधीच खचला होता. (१ पृ. १५१) त्यात भर म्हणजे संभाजीराजांना मोगलास मिळाल्याबद्दल महाराज काही शिक्षा करतील, ही आशाही फलद्रूप झाली नाही. त्यातच हा बदलीचा हुकूम. यावरून स्पष्ट होतं की, संभाजीराजांची पन्हाळ्यावर महाराजांशी चर्चा

झाल्यावर दोघांच्याही मनातलं भावी धोरण ठरवलं गेलं असणार. त्यामुळे आपला खटाटोप व्यर्थ ठरून आपण महाराजांच्या विश्वासास पूर्णपणे अपात्र ठरलो आहोत, याची जाणीव आण्णाजी दत्तोस झाली असणार. तसंच संभाजीराजांवर महाराजांचा पूर्ण विश्वास प्रतीत झाल्याने त्यांनाच महाराज आपला वारस ठरवणार, अशी आण्णाजी दत्तोची खात्री झाली असावी. राजारामांच्या विवाहानंतर आठ दिवसांतच महाराजांची प्रकृती एकाएकी बिघडली व बारा दिवसांनी ३ एप्रिल १६८० रोजी भरदुपारी हा तेजोनिधी अस्तास गेला. त्यांच्या निधनाच्या वेळी त्यांच्या खास जबाबदार सेवकांपैकी मोरोपंत पिंगळे मुल्हेरला, सरनोबत हंबीरराव मोहिते कऱ्हाड-तळबीडला व महाराजांच्या मनातून उतरलेला आण्णाजी दत्तो, खरोखरीच्या कामगिरीसाठी किंवा मुद्दाम संशयाबाहेर राहावं म्हणून चौलला गेले होते. महाराजांच्या मृत्यूसमयी राहुजी सोमनाथ, बाळाजी आवजी व प्रल्हाद निराजी ही ज्येष्ठ पण पुढे कटात सापडलेली मंडळी मात्र त्यांच्याजवळ होती. मरणाच्या वेळी महाराजांचं वय फक्त ५३ वर्षांचं होतं. त्यांची प्रकृती राजारामाचं लग्न होईपर्यंत उत्तम होती. त्यानंतर ८ दिवसांनी ती बिघडल्यावर १२ दिवसांत त्यांची जीवनज्योत मावळणं, त्यांच्या मरणानंतर गडाचे सर्व दरवाजे बंद करून त्यांच्या मृत्यूची बातमी बाहेर फुटू नये, याची कडेकोट व्यवस्था करणं, फार दूर नसलेल्या पन्हाळ्यावर असणाऱ्या, महाराजांच्या ज्येष्ठ पुत्रासही याबाबतीत अंधारात ठेवून उलट त्यांच्या अटकेचा हुकूम सोडणं, ज्येष्ठ पुत्राच्या अपरोक्ष, समंत्र राज्याभिषेक घेणाऱ्या जनताप्रिय राजाच्या अचेतन देहास मंत्राविना भडाग्नीने दहन करण्याची गडबड करणं, राजारामाचं घाईगर्दीत मंचकारोहण करणं आणि स्वतः आण्णाजी दत्तो, मोरोपंत, प्रल्हाद निराजी आदींनी ससैन्य संभाजीराजांच्या अटकेसाठी निघून वाटेत सरसेनापतीला आपणास मिळण्यास सांगणं, हे सर्व व्यवहार स्पष्ट दर्शवितात की, त्यांना महाराजांच्या मृत्यूबाबत काही खास गुपित दडवून ठेवायचं असावं. त्यातच हूलही उठली किंवा उठवली गेली की, महाराजांना त्यांच्या दुसऱ्या बायकोने म्हणजे राजारामांच्या मातोश्री सोयराबाई यांनी विष देऊन मारलं. दाघ रजिस्टर (डच कागदपत्र) व शिवदिग्विजय आणि चिटणीस बखरीत स्पष्टच तसा उल्लेख आहे. (२-पृ.८४) मे-सप्टेंबरच्या अहवालात गोवळकोंड्याची बातमी की, 'शिवाजीराजांना त्याच्या दुसऱ्या बायकोकडून विषप्रयोग झाला असावा.' (१-पृ.१८४) 'मराठी साम्राज्याची



छोटी बखर' याचा लेखक मात्र म्हणतो की, हे (शिवाजींच्या मृत्यूचे) वर्तमान सोयराबाईस-राजारामाच्या मातेस कोणी सांगितले की, महाराज कैलासवासी झाले. संभाजीराजे यांस राज्य द्यायचा करार पन्हाळीयास केला म्हणून निमित्त कारण होऊन महाराजांशी अपाय झाला म्हणून तिने मनात वाईट आणले. (१-पृ.१७६) याचा अर्थच असा निघतो की, राज्य संभाजीराजांना द्यायचा निर्णय महाराजांनी पन्हाळ्यास घेतल्याने त्यांच्या जिवास अपाय झाला म्हणजे अर्थातच, त्यांचा मृत्यू घडवून आणला, अशा परिस्थितीत सोयराबाई यांच्यापेक्षा राहुजी सोमनाथ यानेच, आण्णाजी दत्तोशी आधी ठरल्याप्रमाणे महाराजांचा घात करण्याची अधिक शक्यता आहे. संभाजीराजे गडावर नाहीत, सेनापती कऱ्हाड भागात सोयराबाई ओरडू शकत नाहीत. कारण संभाजीऐवजी राजारामांस रायगडची गादी मिळावी म्हणून त्या आण्णाजी दत्तो आदी कारस्थानी मंडळीस आधीपासूनच सामील- म्हणजे त्यांचा हेतू साध्य करण्याचं कार्य या कारस्थानी मंडळींनी आपल्या स्वार्थी हेतूंसाठी आपणहूनच आपल्या अंगावर घेतलं होतं (आणि त्यात त्यांची मजल महाराजांचं जीवन विश्वासघाताने संपवण्यापर्यंत ही कारस्थानी मंडळी नेतील, याची त्यांनी कल्पनाही केली नसावी.) आणि अनायासे महाराज आजारी पडल्याने हीच संधी त्यांचा निकाल लावूनच आपला हेतू साधण्यास योग्य असल्याचा विचार करून त्यांनी हे घडवून आणणं अगदी शक्य आहे. महाराजांना त्यांच्या आजारपणात औषधोपचार करणारा वैद्य सामील करून घेतल्यास त्याच्या हाती औषधाबरोबर विषाची पुडी देऊन हे साधणं कठीण नव्हतं. विषप्रयोगाने नको असलेल्या व्यक्तीची हत्या घडवून आणणं ही त्यांची पद्धतच होती. (Modus Operandi) हे त्यांनी पुढे संभाजी महाराजांवर केलेल्या विषप्रयोगावरून स्पष्ट दिसून येते. ज्येष्ठ संशोधक व समीक्षक कॉ.शरद पाटील यांनीही स्पष्टच म्हटलं आहे की, शिवाजी महाराज व संभाजी महाराज हे ब्राह्मण्यवादाच्या अत्याचाराचे बळी आहेत. (लो.स.ता.२३/१०/१९९९) महाराज अंत पावल्यावर, राज्याची विभागणी होऊन त्यातील मराठी राज्याचा भाग राजारामास द्यावा, अशी जणू महाराजांचीच अंतिम इच्छा होती, असं दर्शवून संभाजीस दूर ठेवून रायगडावर राजारामांस गादी मिळवून देता येईल, ही सरकारकुनांच्या कारस्थानाची आखणी होती. छोट्या बखरीतील वरील निर्दिष्ट बातमीवरून सोयराबाईंचा हात प्रत्यक्ष महाराजांचा घात करण्यात नव्हता, हेच दिसून येतं. मात्र, त्या या कारस्थानांच्या

एवढ्या कचाटीत सापडल्या होत्या की, कारस्थान्यांनी घडवून आणलेल्या ख… प्रत्यक्ष नवऱ्याच्या खुनाबद्दल त्यांना काही बोलताही येणं शक्य नव्हतं. … कारस्थानी, सोयराबाईंचा हेतू पार पाडण्यासाठी त्यांना साहाय्य करीत नव्हते, तर आपलीच कारस्थानं यशस्वी होण्यासाठी सोयराबाईंच्या नावाचं साहाय्य घेत होते म्हणून त्यांनी इथपर्यंत मजल मारली. सोयराबाई महाराणी होत्याच … महाराजांना जीवे मारून आपला हेतू साध्य करावा, इथपर्यंत त्यांची मजल जाईल, असं वाटत नाही. महाराज जिवंत राहिले, तर त्यांच्याच हातून आज ना उद्या आपल्या मुलास यथावकाश काहीही मिळवता येईल, हेही त्या जाणत होत्याच. कटवाल्या सरकारकुनांना व त्यांच्या कच्छपी लागलेल्यांना मात्र ही शेवटची संधी होती आणि त्यांनी ती साधली, असाच निष्कर्ष निघतो. कटवाल्यांचे पुढचे सर्वच आडाखे सेनापती हंबीरराव मोहिते व संभाजीराजे यांनी धुळीस मिळवले, ही गोष्ट वेगळी.

याबाबतीत १८ ऑक्टोबरच्या सुरतकर इंग्रज व तत्कालीन इंग्रज प्रवासी जॉन फ्रायरच्या हकीकतीवरून श्री. बेंद्रे निष्कर्ष काढतात तो असा, 'या तत्कालीन पत्रव्यवहारावरून संभाजी विरुद्ध सर्व बनाव आण्णाजी दत्तोचा होता, हे स्पष्ट दिसते. त्यात मोरोपंतही मनापासून सामील नव्हते व सोयराबाईंचा संबंध तर नव्हताच. अशा परिस्थितीत राज्याच्या वाटणीची भाषा शिवाजींच्या तोंडी बखरकारांनी जरी घातली असली, तरी या कल्पनेचा जन्म या पत्रव्यवहारकाली खात्रीने झालेला नव्हता.' तुलनेने सधन व बिनधोक राज्य अनुभवी, वयात आलेल्या, युद्धकौशल्यपटू संभाजीस व संकटग्रस्त रायगडचे राज्य अल्पवयीन, दुबळ्या राजारामास ही वाटणी शिवाजीराजे सुचवतील, हे शक्यच दिसत नाही, असं प्रा. नरहर कुरुंदकरही म्हणतात. (३-१५-पृ.१४६) श्री. बेंद्रेही म्हणतात की, निर्धोक राज्य संभाजीराजांचे संकटापत्तींच्या जबड्यात पडत असलेले राज्य बाल राजारामांच्या नावाने एका विधवेस हा हिंदवी राज्यावर निखारे ठेवण्याचा विचार शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर खास त्यांच्यावर लादण्यात आला. (१ पृ.१९६) छोटी बखर सांगते की, आण्णाजीपंत शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर आठ दिवसांनी आले. मोरोपंत त्यानंतर रायगडावर येऊन पोहोचले. अगदी मृत्यूसमयी महाराजांजवळ अष्टप्रधानांतील फक्त प्रल्हाद निराजीच होता. त्याशिवाय बाळाजी आवजी चिटणीस व राहुजी सोमनाथ हेच काय ते कर्ते पुरुष जवळ होते. बाकी सर्व अननुभवी प्रधानपुत्र व लहान मंडळीच होती.



यावरून शिवाजी महाराजांना आपला आजार इतका विकोपाला जाईल अशी कल्पना नसावी. (कदाचित ते बेशुद्धावस्थेतही गेले असावेत.) नाहीतर कर्ती माणसं वेळीच बोलावून निरवानीरव करता आली असती. नेहमीच्या रिवाजाप्रमाणे उत्तरीय कार्यक्रम ७/८ व्या दिवसांपासून सुरू झाले व १३ व्या दिवशी म्हणजे १५ एप्रिलला संपले. परमानंद म्हणतात की, नंतर हजर असलेल्यांपैकी मंत्र्यांनी १६ एप्रिलला सोयराबाईंची भेट घेतली व त्यांची समजूत घालून सांगितले की, आम्ही तुमच्या पुत्राला राज्याभिषेक करून तुम्हालाच वीरराज्ञी करू व आम्ही राजकारण हाकू. असं सांगताना सोयराबाईंना शिवाजींच्या मृत्यूबाबत त्यांच्यावर आलेल्या आळाची किंवा आरोपाचीही त्यांना जाणीव करून देऊन त्यांच्या मनावर दडपण आणलं. (१-१८६) आता हा मजकूर हेच दाखवतो की, आपला पुत्र राजाराम यांस गादी मिळावी या त्यांच्या इच्छेपायी, महाराज हयात असताना त्यांच्यापाशी आग्रह धरण्यापलीकडे सोयराबाईंनी स्वतः काही केलं नसावं. एकदा त्यांची ही इच्छा (मुळातच आपली) पूर्ण करण्यासाठी प्रयत्न करण्याचे आश्वासन आण्णाजी दत्तो वगैरेंनी दिल्यावर बाकी सर्व पुढचा प्रकार म्हणजे संभाजीराजांचं चारित्र्यहनन, त्यांच्या खुनाचे प्रयत्न वगैरे हे या कुमंत्र्यांचंच कारस्थान होतं. सोयराबाई जर या मंत्र्यांच्या सर्व कारस्थानांत मुख्य भाग बजावत असत्या, तर या प्रधानांना त्यांची भेट घेऊन, 'आम्ही तुमच्या पुत्राला गादीवर बसवू, तुम्हालाच वीरराज्ञी करू व आम्ही राजकारण हाकू.' वगैरे सांगण्याचं काही कारण उरत नव्हतं. तसंच खरोखरीच सोयराबाईंची कटाचा एक भाग म्हणून स्वतःच महाराजांवर विषप्रयोग केला असं समजलं, तर मग त्यांना भेटून, 'तुमच्यावर याबाबतीत आळ घेतला जातो.' असं या मंत्र्यांनी त्यांना सुनवून त्यांच्यावर दबाव आणण्याचं कारण नव्हतं. एतदर्थम् या कटवाल्या प्रधानांनीच बहुधा राहुजी सोमनाथामार्फत जाणीवपूर्वक महाराजांवर विषप्रयोग घडवून आणला व आपलं कार्य साधून झाल्यावर त्याचं दडपण मात्र सोयराबाई राणींवर सोपवलं. आपल्या मुलाला गादी मिळावी, या आपल्या मातृसुलभ इच्छेपायी आपणहून साहाय्यास आलेल्या प्रधान मंडळातील या व्यक्ती इतक्या टोकाची भूमिका बजावतील याची कल्पनाही त्यांना आधी आली नसणार. श्री. बेंद्रे म्हणतात की, सोयराबाईंनी विष घालून शिवाजींस मारले, या कंडीत फारसं तथ्य असेलसं वाटत नाही.' (१-पृ.१८७)

महाराजांच्या मृत्यूसमयी राहुजी सोमनाथ हा सरकारी कामावरील सुभेदार गडावर होता. कर्नाटक स्वारीवर जाताना याच राहुजीस महाराजांनी रायगडावर आपला प्रतिनिधी म्हणून ठेवलं होतं. महाराजांच्या मृत्यूची बातमी बाहेर फुटू नये म्हणून रायगडाचे दरवाजे बंद करण्याची काळजी त्याने घेतली. अशा संशयित प्रकारामुळे अंत्यदर्शनालाही मुकलेल्या मंडळींना काही खून प्रकाराचा रास्त संशय आला असला तर नवल नाही. विशेषतः अशुचापासून मुक्त होताच राजाराम यांचं मंचकारोहण झालं, या बाबीमुळे सोयराबाईंचा संशय लोकांस येणं साहजिक होतं. राहुजी सोमनाथ याचं परमानंदांनी 'राहुप्रतिनिधीं राहुरित्याहुर्यं विचक्षणः। अविशत्व विवेकस्तवसादित सज्जनः।' असं केलेलं वर्णनही लक्षात घेणं जरूर आहे. (१-पृ.१८७) राहुजी सोमनाथ क्रूर, स्वार्थी व पाताळयंत्री होता, असा त्याचा अर्थ काहींनी घेतला आहे. खरोखरीच सोयराबाईंचा हात या प्रकरणात असता तर त्यांनी आपल्या भावाला म्हणजे सरनोबत हंबीररावांना प्रथमपासून आपल्या कटात घेतलं असतं. हंबीरराव संभाजीराजांना बिनविरोध अगदी सहजपणे मिळाले. यामुळे संभाजीराजांना सोयराबाईंनी शिवाजी महाराजांना मारलं, या कंडीत फारसं तथ्य वाटले नसावं. आण्णाजी दत्तोने मात्र आपल्या स्वार्थासाठी ती कंडी उठवणं व नंतर बाऊ करून, सोयराबाईंना भेडसावण्याचा प्रयत्न करून आपुलं बाहुलं करण्याचा प्रयत्न करणं शक्य होतं. सारांश, त्यांना काही भय दाखवून व त्यांना प्राप्त होणाऱ्या राज्ञीपणाचं आमिष पुढे करून मंत्र्यांनी आपला अभिप्राय सांगितला की, राजाराम यांना वसंतपंचमीनंतर अभिषेक करू आणि तसं झालं म्हणजे तुम्ही आमच्या राज्ञी व्हाल. (१-पृ.१८६/१८७) पुढे बेंद्रे म्हणतात की, सोयराबाईंच्या मनात राज्यलोभाविषयी आकांक्षा बळावत असली, तरी त्याचबरोबर ही मंत्र्यांची मसलत सिद्धीस न गेली तर आपली काय दशा होईल, याचंही भेसूर चित्र त्यांच्यासमोर येणं साहजिक होतं... शिवाजीराजांनी छत्रपतीपद धारण केल्याने दिल्लींद्र त्यांच्यावर क्रुद्ध झाला होता आणि औरंगजेबाने हा सल दूर करण्यासाठी मराठी राज्यावर खासा स्वारी करण्याची तयारी चालवली होती... अशा परिस्थितीत मंत्र्यांच्या संभाजीविरुद्धच्या कारवाईस संमती देणं त्यांना जड गेलं असल्यास नवल नाही. सोयराबाईंची संमती मिळो न मिळो, आण्णाजीने राजाराम यांचं मंचकारोहण करण्याचं, आपला सहकारी राहुजी सोमनाथशी मसलत करून ठरवलं होतं. (१-पृ.१८८) बहुधा मोरोपंत राजधानीला



परतण्यापूर्वीच आण्णाजीने अक्षयतृतीयेच्या मुहुर्तावर राजाराम यांचं मंचकारोहण करवलं. ज्या अर्थी या मंचकारोहणाचं कार्यकर्तृत्व मोरोपंतांकडे न देता आण्णाजीकडेच जोडतात, त्याअर्थी या कटाचा सूत्रधार आण्णाजी दत्तोच होता, यात शंका नाही. उलट मोरोपंत संभाजीराजांचाच पुरस्कार करीत असल्याने तत्कालीन उल्लेख आहेत. मोरोपंत दूर त्र्यंबकेश्वरच्या बाजूला असल्याने त्यांना बातमी मिळून रायगडावर येण्यास कालावधी लागणं अपरिहार्य होतं.... त्यामुळे राहुजी सोमनाथ व आण्णाजी दत्तो यांनी केलेली सैन्याची वगैरे तयारी पाहून आपण दुर्बलावस्थेत सापडल्याची मोरोपंतांना जशी जाणीव झाली, तशीच सोयराबाई की संभाजी हा निर्णय घेण्याबाबत त्यांची मती कुंठीत झाली. म्हणूनच शकावलीतील नोंदीप्रमाणे आण्णाजीला, संभाजीराजांना कैद करण्याचा तह मोरोपंतांशी करता आला. एकूण सोयराबाईंसारखेच मोरोपंतही आपल्या सर्वस्वाचा नाश होईल, या भीतीने आण्णाजीच्या कटात अडकले गेले. मोरोपंत शेवटपर्यंत या कटाच्या विरुद्ध असावेत; परंतु हंबीररावांचा राजकारणी संदिग्ध संदेश आल्यावर त्यांचा मनसुबा सोयराबाईंकडेच आहे, असं समजून त्यांनी राजारामांची बाजू घेतली. (१-१८८-१८९) परमानंदांच्या म्हणण्याप्रमाणे, दिल्लींद्राचे संकट ओढवत आहे. त्यावेळी बालराजा नको आहे, असाच जनतेचा सूर होता व आसपासच्या लोकांनी सरकारकुनांची सत्ता मानण्याचे नाकारले होते. (१-१९०/१९१) परमानंदांच्या संस्कृत काव्याचा उल्लेख करून त्याचा सारांश सांगताना श्री. बेंद्रे म्हणतात की, कुमंत्र्यांनीच सोयराबाईंच्या मनात, संभाजीराजे तुझ्या मुलाचा द्वेष करतात, असं खोटंच भरवून दिलं. (१-१९२) आण्णाजी व मोरोपंत यांच्या राजद्रोही वर्तनाचं सूत्र चरित्र लेखक (बखरकार) सोयराबाईंच्याकडे नेतात; परंतु त्यात तथ्य नाही, असं स्पष्ट करताना श्री. बेंद्रे म्हणतात की, आण्णाजीने प्रल्हादपंतादि लोकांना जसे संकटात घातले, तसेच त्यांनाही आपल्या कटात अडकवले. त्यांना हंबीररावांचा सल्ला घेण्यासही संधी दिली नाही... शिवाजी महाराजांचे आप्त, मराठा मंडळ व ब्राह्मण आणि प्रभू कारकुनांनी संभाजींना राजा समजावं आणि चुकूनही तलवार उचलण्याचा प्रसंग न येताच या कुमंत्र्यांना नाक घासून क्षमेची याचना करावी लागावी, यात राष्ट्रीय राजकारण किंवा सापत्नभावाचा पुरस्कार नसून तो केवल वैयक्तिक स्वार्थांकरिता केलेला स्वामीद्रोह होता, हे स्पष्ट आहे. संभाजीराजांनी राजारामांशी दुष्टावा केला नाही. थोर सरदार येसाजी

दाभाडे राजारामांच्या खास तैनातीसाठी दिले, राजारामांची आणखी तीन लग्ने आणि तीही राज्यातील शक्तिमान सेनापती व सोयराबाईंचे भाऊ यांच्या आणि राजे घाटगे यांच्या मुलींशी करून दिली. सोयराबाई राणीसाहेबांनाही त्यांनी सौम्यपणे वागवलं, येसूबाईंनी, रायगडाला वेढा पडला असताना, राजाराम यांना राज्य राखण्यासाठी बाहेर काढून पाठवलं. या सर्व गोष्टी मुळात गृहकलह नव्हता, हे सिद्ध करतात. एवढं सांगून श्री. बेंद्रे पुढे म्हणतात की, सापत्नभावाचे भूत आण्णाजी व मोरोपंत यांनी आपल्या बचावार्थ पहिली गुर्मी उतरल्यानंतर उभे केले. (१-पृ. २०१)

काही लेखकांनी शिवाजी महाराजांची उत्तरक्रिया भडाग्नीने केल्याचं व त्याला सोयराबाई जबाबदार असल्याचं म्हटलं आहे. पण हे खरं वाटत नाही. कारण हिंदूंच्या पद्धतीप्रमाणे बायका अंत्यविधीस म्हणजे शवास अग्नी देताना हजर राहात नाहीत. तेव्हा हा विधी ब्राह्मणांकडून समंत्र करून घेतला, की मंत्रांविना याची त्यांना जाण होण्याचं कारणच नाही. तो समंत्रच झाला असावा, अशीही त्यांची समजूत असण्याची शक्यता आहे. जो काही आणि जसा महाराजांचा अंत्यविधी उरकण्यात आला त्यास राहुजी सोमनाथच जबाबदार दिसतो. महाराजांना अपाय झाला असल्यास अंत्यविधी घाईगडबडीतच उरकणं प्राप्त होतं. महाराजांना अपाय झाला व तो राहुजी सोमनाथ, आण्णाजी दत्तो इत्यादिकांनी केला, असा संशय दाखवल्यावर प्रश्न असा उपस्थित होईल की, मग संभाजीराजांनी त्यांना शिक्षा का केली नाही? त्याचं उत्तर कदाचित असं देता येईल की, महाराजांचा मृतदेह हा जो मुख्य पुरावा, तोच अग्निसंस्कारामुळे नष्ट झाला होता. शिवाय त्यात प्रत्यक्ष राजमाता सोयराबाई यांना संशय दाखवण्याची कारवाई कारस्थानी मंत्रिमंडळानी केली होती आणि राजमातेच्या प्रत्यक्ष बंधूचं- सेनापती हंबीरराव मोहित्यांचं -मोलाचं साहाय्य संभाजीराजांना मिळालेलं असल्याने, राजमातेस यात गुंतवून प्रकरण वाढवण्याचं त्यांनी टाळलं असावं.

श्री. बेंद्रे म्हणतात की, 'दिल्लींद्राचे संकट नसते तर बालराजाला घेऊन सोयराबाईंच्या हाती राज्य राखणं या अधर्मी मंत्र्यांना शक्य होते. इतकेच नव्हे तर हे दुर्मंत्री यवनांना बोलावून हे सह्याद्रीचे हिंदवी स्वराज्य आपल्या स्वार्थासाठी बुडवतील, असा तत्कालीन समज दिसतो. (नाहीतरी संभाजी महाराजांच्या वधानंतर, सरकारकुनांनी स्वराज्यातील २८ किल्ले मोगलांना देऊन त्यांचे



मांडलिकत्व स्वीकारण्याची तयारी ठेवलीच होती व आधीही संभाजी महाराजांच्या खुनाच्या बदल्यात स्वराज्याचा मोठा हिस्सा अकबरास द्यायला ते तयार होतेच.) तेव्हा हंबीररावांनी संभाजीराजांना ससैन्य मिळून, हिंदी स्वराज्यातील आपत्ती दूर करणे आवश्यक होते आणि सेनापती, ब्राह्मण कारकून, प्रजा सर्व एक होऊन स्वार्थी सरकारकुनांना वेळीच पायबंद घालण्यास तयार झाले, हेच तत्कालीन परिस्थितीचा वास्तवतेने बोध करून देणारे मुख्य साधन होय. (१-पृ.१९२) श्री. शेजवलकर म्हणतात की, शिवाजी महाराजांच्या हाताखाली तयार झालेल्या व त्यांचे हेतू पूर्ण समजलेल्या करड्या (?) स्वभावाच्या राज्यकारभाऱ्यांच्या अमलाखाली आपला व्यक्तिसंकोच करून राहण्यापेक्षा संभाजीराजांसारख्या ढिल्या, भोळसर व उदार राजांच्या हाताखाली राहण्यास मिळाले, तर ते मराठे शिलेदारांना मनापासून हवे होते व म्हणून हंबीरराव, आनंदराव, मानाजी मोरे प्रभृती लष्करातील बड्या अधिकाऱ्यांनी शिवाजी महाराजांच्या मृत्यूमुळे अकस्मात प्राप्त झालेली मोकळे होण्याची संधी संभाजीराजांना मिळून साधण्याचा निश्चय केला. (७-पृ.१४९) शेजवलकराचं हे प्रतिपादन मुळीत पटण्यासारखं नाही. औरंगजेबाची प्रचंड सेना दक्षिणेत चालून येणार आहे, हे स्पष्ट दिसून येत असताना सेनापती हंबीरराव व इतर लष्करी अधिकाऱ्यांना War-like Prince म्हणून ज्यांना पाश्चात्यांनी नावाजलं, त्या संभाजीराजांच्याच हातात सत्ता यावी, असं वाटल्यास नवल नाही. अशा वेळी ९-१० वर्षांच्या रामराजांचा पक्ष घेण्यात सरकारकुनांची चूक होत आहे, असंच त्यांना वाटलं. तसंच रामराजांना केवळ नामधारी करून सर्व सत्ता आपल्याच म्हणजे ब्राह्मणाच्या हातात घेण्याचा हा सरकारकुनांचा राजकीय डाव आहे, हेही त्यांनी ओळखलं आणि म्हणूनच त्यांनी संभाजीराजांना पाठपुरावा करून सरकारकुनांचा डाव उधळून लावला. खरं पाहता हंबीररावांनी सरकारकुनांचा मनसुबा हाणून पाडला, हा जसा शिवरायांनी पेरलेल्या स्वातंत्र्यप्रेमाचा पुरावा आहे. तसा भावी राजा म्हणून प्रजा निःसंशय संभाजीराजांना मानत होती, याचा दाखला आहे. हंबीररावांच्या रूपाने उभा महाराष्ट्र संभाजीराजांना या व कारभार हाती घ्या असंच जणू म्हणत होता.

कट करणाऱ्या मंत्र्यांनी जो बूट काढला की, शिवाजी महाराजांनी मरताना राज्याची विभागणी सुचवून कर्नाटकातील निर्वेध राज्य संभाजीराजांचे व संकटापत्तींच्या जबड्यात पडत असलेले महाराष्ट्र देशीचे राज्य राजारामास असे

सुचवले हे धादांत खोटे असून तो या कपटी मंत्र्यांचा स्वार्थाने भरलेला [illegible] होता व तो त्यांनी आपला कार्यभाग साधण्यासाठी शोधला होता, असं श्री. बेंद्रे अनेक उदाहरणं देऊन स्पष्ट करतात. (१-पृ.१९५/९६) 'खुद्द महाराजांची इच्छा तशी होती.' अशी हूल उठवल्याशिवाय संभाजीराजे, लष्कर व [illegible] अशा विभागणीस मान्यता देणार नाहीत, हे जाणूनच मंत्र्यांनी हा डाव टाकला होता. हंबीररावांनी तो ओळखलाच, पण प्रल्हादपंतांचाही त्यावर विश्वास नव्हता, असं श्री. बेंद्रे ठासून प्रतिपादन करतात. (१-पृ.१९८/९९) शिवाजी महाराजांनी राजारामास मऱ्हाट देशीचे राज्य द्यावेसे केले होते, याला थोडा [illegible] आधार नाही. उलट संभाजीराजे दिलेरखानाकडून परत आल्यानंतर पहिल्या [illegible] भेटीत शिवाजी महाराजांनी त्यांना पन्हाळा प्रांताची मोठी आणि महत्त्वाची सुभेदारी सांगितली आणि आण्णाजीपंतांना कारवारकडे पाठविले. शिवाय आपले वीस हजार स्वार संभाजीराजांच्या ताब्यात देऊन त्यांना बऱ्हाणपूर व औरंगाबादेवर जाऊन त्यांनी खाशाने मोगलांविरुद्ध जी स्वारी केली होती, तो पुढे चालवण्याची आज्ञा केली. (२७-पृ.२७) मरणापूर्वी शिवाजी महाराजांनी एक अधिकृत आज्ञापत्र प्रधानांसाठी मागे ठेवले होतं, असं केवळ रायरीच्या बखरीत (इंग्रजी भाषांतर) नमूद आहे. (२-पृ.७४) पण ती बखर पेशवाईच्या उत्तरार्धातील लिहिली गेली असल्याने तिला महत्त्व देण्याचं कारण नाही. श्री. शेजवलकर मात्र म्हणतात की, संभाजींनी राज्य मिळवताना ज्या लोकांना ठार मारले त्यांचा अपराध एवढाच की, त्यांनी शिवाजींच्या हुकमाची अंमलबजावणी करण्याचा प्रयत्न केला. (७-पृ.१५०) शेजवलकरांचे हेही मत पटण्यासारखं नाही. कारण राज्याची वाटणी व्हावी, ही शिवाजी महाराजांनी मरतेवेळी प्रदर्शित केलेली इच्छा नसून, कटवाल्या सरकारकुनांनी राजारामाला बिनविरोध गादीवर बसवता यावं, यासाठी जनतेला फसवण्यासाठी रचलेलं कुभांड होतं. समजा, तशी इच्छा महाराजांनी प्रकट केली होती, असं वादाकरिता गृहीत धरलं तरी, मग सरकारकुनांचा डाव संभाजीराजांनी उधळून लावल्यावर व स्वतःस मंचकारोहण व राज्यारोहण करून घेतल्यावर त्यांना विष घालून ठार मारावं, असा तर महाराजांचा उद्देश नव्हता ना? मग त्यांनी तसे प्रयत्न का केले? महाराजांनी स्वकष्टाने उभं केलेल्या स्वतंत्र सार्वभौम राज्याचा मोठा भाग औरंगजेब-पुत्र अकबर यास देऊनही हे आपलं स्वप्नं साकारण्याचा प्रयत्न कटवाल्यांनी केला होता, हे पुढे येईलच. की महाराजांनीच तसं करण्यास



त्यांच्या तथाकथित करड्या स्वभावाच्या सरकारकुनांना सांगून ठेवलं होतं? एवढंच नव्हे, तर संभाजीराजांना पकडून देण्यासाठीही या सरकारकुनांनी मोगलांना माहिती पुरवली होती, याचा पुरावा पुढे येईलच. कोणत्याही परिस्थितीत सरकारकुनांना सांभाळून घेण्याचा शेजवलकरांचा हा वृथा उद्योग वाटतो, अशी त्यांची क्षमा मागून म्हणावंसं वाटतं. डॉ. जयसिंगराव पवारही म्हणतात की, सभासद म्हणतो त्याप्रमाणे पन्हाळा भेटीत राज्य विभाजनाचा प्रस्ताव पुन्हा एकदा महाराजांनी आपल्या पुत्रासमोर मांडला असेल, असं वाटत नाही. आपल्या पुत्राचे आपण, घरोब्याचे रीतीने जैसे समाधान करावे तैसे केले या छोट्याशा वाक्यात पिता-पुत्राचे मतभेद, बेबनाव संपला व उभयपक्षी दिलजमाई झाली, असाच आशय आहे. (३-पृ.४९)

शिवाजी महाराजांचा रायगडावर अंत झाल्यावर इंग्रजांनी रायगडावर संपर्क न ठेवता पन्हाळ्यावर असणाऱ्या संभाजीराजांशीच कारभारविषयक बोलणी केली व पोर्तुगीजांनीही, त्यांचे मराठ्यांशी लढाईचे पवित्रे घडत असतानासुद्धा आपल्या हालचाली थांबवून २८ एप्रिलला शिवाजी महाराजांच्या मृत्यूबद्दलचा दुखवटा पत्राने संभाजीराजांसच कळवून दोन्ही राज्यातील स्नेहसंबंध कायम राहावेत, अशी इच्छा प्रकट केली होती. संभाजीराजांनी सर्व सुभेदार व हवालदार वगैरेंना पन्हाळ्यावर भेटण्यास बोलावल्यामुळे लोक सारखे पन्हाळ्याकडेच जात होते. मोरोपंत व आण्णाजी यांना नवीन सैन्य आगाऊ वेतन देऊन ठेवावं लागलं. याचा अर्थच मुळी असा निघतो की, रायगड व आसपासच्या लोकांनी सरकारकुनांची सत्ता मानण्याचं नाकारलं होतं किंवा त्यांचं स्वतःचं सैन्य नव्हतं. (१-पृ.१९१) त्यामुळेच एकूण बखरकार सांगतात त्याचप्रमाणे पन्हाळ्यावरून घाईगर्दीने प्रयाण न करता किंवा रायगडावर धुंदल न करता संभाजीराजे शांतपणे पन्हाळ्यावरच राहून राज्यकारभार पाहू लागले. त्यांनी मोरोपंत-आण्णाजींच्या हालचालींना मुळीच मोजलं नाही. कटातील मंडळींनी नावं आली आहेत ती आण्णाजी दत्तो, मोरोपंत, प्रल्हाद निराजी व राहुजी सोमनाथ अशी चारच आहेत. तथापि, हंबीररावांची साथ न मिळाल्याने शेवटी प्रल्हाद निराजी ढेपाळला व त्याने अशा परिस्थितीत विरोध न करता, संभाजीराजांच्या कलाने घ्यावं असं सुचवलं. पण त्याचा हा सल्ला मोरोपंत प्रभृतीस मानवला नाही. विधिलिखित जे काही व्हावयाचं असेल ते होईल, असं बोलून त्यांनी संभाजीराजांना पकडण्यासाठी वा मारण्यासाठी पन्हाळ्याची

वाट धरलीच. तसं करण्याशिवाय त्यांना गत्यंतरही नव्हतं. कारण संभाजीराजे हाती लागल्याशिवाय कटाचा जो मुख्य उद्देश की, राज्य ताब्यात घ्यायचं तो साध्य होणं शक्य नव्हतं. मराठी राज्याची उपराजधानी जी पन्हाळगड तिथून संभाजीराजांचा कारभार चालू लागला तर रायगड व त्यावरील कटाचे सूत्रधारांना वाळीत पडण्याशिवाय दुसरं भविष्य नव्हतं. वाटेत सरसेनापती हंबीरराव मोहिते हे त्यांच्या अपेक्षेप्रमाणे त्यांना सामील न होता उलट त्यांनी मोरोपंत पिंगळे व आण्णाजी दत्तो यांनाच अटक करून बंदोबस्ताने पन्हाळ्यावर संभाजीराजांच्या समोर हजर केलं. ही बातमी रायगडावर पोहोचताच, तिथे असलेल्या सैन्याने सोयराबाई, राजाराम व त्यांच्या पक्षाचे सर्व लोक कैद केले. प्रल्हाद निराजी व राहुजी सोमनाथही अटक झाले. त्यानंतर १८ जून १६८० पर्यंत म्हणजे थोरल्या महाराजांच्या मृत्यूनंतर अडीच महिने संभाजीराजे पन्हाळगडावरून हललेच नाहीत. यात संभाजीराजांचा धोरणीपणा, शांतपणा व धूर्तपणा यांचं दर्शन घडतं. मराठ्यांच्या फौजा व जनता आपल्या बाजूची आहे, याची खात्री असल्याने त्यांना घाई करण्याचं कारणच नव्हतं. पन्हाळ्यावरून त्यांचा राज्यकारभार सुरूही झाला होता. या सर्व घटना संभाजीराजांच्या कर्तृत्वावर असणारा जनतेचा व फौजेचा विश्वास दाखवणाऱ्या, त्यांची लोकप्रियता दर्शवणाऱ्या आहेत. शिवाजी महाराजानंतर मराठ्यांचा राजा कोण, याविषयी ते अजिबात संभ्रमात नव्हते. रायगडावर आल्यावर संभाजीराजांनी चिडून जाऊन कोणावरही कोणत्याही प्रकारचा सूड उगवला नाही. सोयराबाईंवरही राग दाखवला नाही. राजारामांना फारसं काही कळण्याचं त्यांचं वयच नसल्याने त्यांचा रागही धरण्याचं त्यांना कारण नव्हतं. रायगडावर आल्यावर, पित्याच्या मृत्यूची अधिकृत माहिती कानी पडल्यावर धर्मशास्त्राप्रमाणे त्यांनी बारा दिवस सुतक पाळलं. २७ जून या दिवशी शिवाजी महाराजांच्या एक पत्नी पुतळाबाई सती गेल्या व २० जुलै १६८० रोजी संभाजीराजांनी मंचकारोहण केलं. मंचकारोहणाच्या वेळी त्यांनी मोठ्या मनाने राजद्रोही म्हणून अटक केलेल्या सर्वांची सुटका केली. मोरोपंत मात्र कैदेत असतानाच या आधी मरण पावले होते. कटवाल्या मंत्रिगणांपैकी मोरोपंतांनी केलेली स्वराज्याची सेवा स्मरून, त्यांचा मुलगा मोरेश्वर यास वडिलांचं पेशवेपद दिलं. आण्णाजी दत्तो याला मजमूचा कारभार सांगितला. प्रल्हाद निराजी याच्याकडे न्यायाधिशी व मोरेश्वर रघुनाथकडे पंडितराव म्हणून कारभार, याप्रमाणे थोड्या फार फरकाने सर्व



मंत्रिमंडळ पूर्ववत चालू केलं. अशी व्यवस्था केल्यावर खरं म्हणजे राज्य सुरळीतपणे चालावयास हरकत नव्हती; परंतु घरभेदी कटकारस्थान्यांचं सूडनाट्य अद्यापि शमलं नव्हतं. काही महिन्यांपूर्वी औरंगजेब बादशहाचा पुत्र शाहजादा अकबर याने बापाविरुद्ध दिल्लीच्या तख्तासाठी बंड पुकारलं होतं व तो संभाजी महाराजांच्या आश्रयास आला होता. तथापि, त्याला आश्रय देऊनही संभाजी महाराजांनी त्याची समक्ष भेट घेण्याचं दिरंगाईवर टाकलं होतं. त्यामुळे अकबर बैचेन होता. या त्याच्या मनाच्या कोंडमारीचा फायदा संभाजी महाराजांच्या विरोधातील कुमंत्र्यांनी घ्यायचं ठरवून संभाजी महाराजांच्या खुनाचा आणखी एक राजद्रोही कट योजला. कारण संभाजीला दूर केल्याशिवाय राजारामाला मराठ्यांच्या गादीवर बसवता येत नाही व त्याला राजपद दिल्याशिवाय ब्राह्मणांच्या हातात खरी सत्ता येत नाही. त्यासाठी त्यांनी एक पत्र लिहून व त्याबरोबर विषाची पुडी देऊन दोन खास दूत शहाजादा अकबराकडे रवाना केले. पत्रात त्यांनी लिहिलं होत की, अकबराने सहकार्य करून संभाजी महाराजांना विष घालून त्यांचा अंत केल्यास मराठे सर्व शक्तीनिशी त्यांच्या पाठीशी उभे राहतील व या कामगिरीसाठी मराठी स्वराज्याचा मोठा हिस्सा त्याला देण्यात येईल. या कामगिरीस शहाजादा थोडा फार अनुकूलही झाला होता, पण त्याच्याबरोबरचा, राजपुतांच्या उठावातील नेता दुर्गादास राठोड याच्या सल्ल्याशिवाय तो काही करीत नसे. त्याने जेव्हा याबाबतीत दुर्गादासाला विचारलं, तेव्हा त्याने सांगितलं की, कदाचित तुमची परीक्षा पाहण्यासाठी संभाजी महाराजांनी हा डाव टाकला असण्याची शक्यता आहे. तेव्हा हे पत्र सरळ संभाजी महाराजांकडे पाठवून द्या. त्याप्रमाणे अकबराने करताच, आपणाला ठार मारण्याची इच्छा करणारे आपलेच पूर्वीच्या कटकारस्थानातील माफी दिलेलेच लोक आहेत, याचा ताजा सबळ पुरावाच संभाजी महाराजांच्या हाती लागला.

तेव्हा संतप्त होऊन त्यांनी कटकर्त्यांना हत्तीच्या पायी देऊन ठार मारलं. त्यात आण्णाजी दत्तो, बाळाजी आवजी, हिरोजी फर्जंद, सोमाजी दत्तो यांचा प्रामुख्याने समावेश होता. हे प्रकरण आपल्यावरही शेकेल. या भीतीने सोयराबाईंनी २७ ऑक्टोबर १६८१ मध्ये विष प्राशन करून आत्महत्या केली. (४-पृ.३४, पृ.२३९) संभाजी महाराजांनी या आपल्या सावत्रमातेस मारलं नाही. मल्हार रामराव म्हणतो त्याप्रमाणे, त्यांना भिंतीत चिणून तर मारलं नाहीच, पण

पन्हाळ्यावरून रायगडावर प्रथम ता.१८ जून १६८० रोजी आल्या आल्याही मारलं नाही. बखरकाराने संभाजी चरित्रातील १६८१ च्या घटना १६८० मध्ये घातल्याने राजांवर तोंडसुख घेण्याची संधी टीकाकारांना मिळाली, असं सेतुमाधवराव पगडी म्हणतात. त्यांची उत्तरक्रियाही संभाजी महाराजांनी राजमातेस शोभेल, अशा थाटाने केली. त्यांचे सुतकही व्यवस्थितरीत्या पाळलं. (१-१५ पृ. १४९) शहाजादा अकबराने खुनाच्या कारस्थानाबद्दल सावध केल्याबद्दल संभाजी महाराजांनी त्याचे आभार मानले व त्यानंतर त्याच्यावर अधिक प्रीती लोभ ठेवून त्याच्या राजकारणात त्यास सहाय्य करण्याचं आश्वासन दिलं. हा प्रकार ४ ऑगस्ट ते २ सप्टेंबर १६८१ च्या दरम्यान झाला. या कटाचा उल्लेख मुंबईकर इंग्रजांच्या ता. ३० ऑगस्ट १६८१ व १२ ऑक्टोबर १६८१ च्या पत्रांतून थोड्याफार फरकाने झाला आहे. (१-पृ.२३९/२४०)

संभाजी महाराजांच्या विरोधातील स्वकीयांची कटकारस्थानं एवढ्यावर थांबली नाहीत. ती चालूच होती. संभाजी महाराजांनी ३० ऑक्टोबर १६८४ रोजी राहुजी सोमनाथ, गंगाधरपंत व मानाजी मोरे यांना अटक केली. रायगडावरील जुन्या राजकीय मुत्सद्यांचा एक गट कवी कलश या उत्तरेकडील कनोजी ब्राह्मणाचं संभाजी महाराजांच्या राज्यात वाढत असलेलं प्रस्थ पाहून नाराज होता. या गटाकडून शंभूराजे गोव्याच्या मोहिमेत असताना मोगल सरदार शहाबुद्दीन याच्यामार्फत कवी कलशाचा काटा काढण्याचा असफल प्रयत्न झाला. त्यासंबंधात ही अटक असावी. (४-पृ.५२) कवी कलशामुळे महाराष्ट्रात तांत्रिक पंथाचा विकास झाला, हे वैदिक ब्राह्मणांना रुचलं नव्हतं आणि त्याला कारणीभूत संभाजीराजे होते, असा ग्रह करून घेऊन दख्खनी ब्राह्मणांनी संभाजीराजांवर विषप्रयोग करण्याचा घाट रचला, अशी एक वार्ता त्याकाळी कारवार, राजापूर येथील इंग्रज वखारवाल्यांत प्रसृत होती. त्यात अगदीच तथ्य नाही असं नाही, पण खरी गोष्ट अशी आहे की, संभाजीराजांना संपवण्याच्या सरकारकुनांच्या विचाराचं हे मूळ कारण नाही. या सरकारकुनांनी संभाजीराजांविरुद्ध त्यांचा राजसिंहासनावरील हक्क डावलण्यासाठी खोट्या कंड्या उठवून त्यांचं चारित्र्यहनन करावयास सुरुवात केली. तेव्हा थोरल्या महाराजांनी त्यांना आपल्या दक्षिण स्वारीवरील गैरहजेरीच्या काळात रायगडावर ठेवण्यापेक्षा शृंगारपूर इथे ठेवलं आणि तिथेच नंतर संभाजीराजांचा कवी कलश व त्याच्या शाक्त पंथाशी प्रत्यक्ष संबंध आला, हे आधी नोंदलेलंच आहे.



सरकारकुनांचा मूळ हेतू संभाजीराजांसारख्या कर्तृत्ववान शासकास दूर करून बाल रामराजास गादीवर बसवणं व त्यांना नामधारी करून सर्व खरी सत्ता सनातनी ब्राह्मण वर्णाच्या ताब्यात घेणं हा होता. मराठी इतिहासाचे अभ्यासक डॉ. वसंतराव कदमही म्हणतात, 'सरकारकुनांना तरुण संभाजीराजांपेक्षा अल्पवयीन राजाराम हवे होते. म्हणजे त्यांना पुढे करून मनसोक्त राज्यकारभार करता आला असता.' (३-१६-पृ.१७०) डॉ. कदमांचं हे विधान चुकीचं नाही, पण ते संपूर्ण व स्पष्ट असं सत्यही नाही. सरकारकुनांना आपल्या हातात सत्ता हवी होती, ती केवळ व्यक्तिगत स्वार्थासाठी नव्हे, तर ब्राह्मणांचं समाजातील वर्चस्व पुनर्प्रस्थापित करण्यासाठी. शिवाजी महाराजांनी जी सामाजिक क्रांती केली होती, तीच संभाजीराजे पुढे चालवणार, असं दिसताच त्यास वेळीच चाप लागावा म्हणून ही एक त्यांच्या प्रतिक्रांतीची चाल होती. असाच अर्थ लावावा लागतो.

संभाजीराजांविरुद्ध कट, कारवाया करणाऱ्यांतील सुरुवातीचा धुरीण आण्णाजी दत्तो व त्याचे काही सहकारी यांना संभाजीराजांनी १६८१ मध्ये देहांताच्या शिक्षा दिल्या असल्या, तरी त्यांचे काही समविचारी बगलबच्चे अद्यापि जिवंत होते व संभाजी महाराजांचा पूर्ण नाश करण्याचे त्यांचे प्रयत्न अखंडपणे चालूच होते. संभाजी महाराजांच्या विरोधातील, रायगडावरील या कर्मठ ब्राह्मण मंत्र्यांनी मोगली सरदारांसमवेत संभाजीराजांना पकडून देण्याचा कट केला आहे, हे संभाजीराजांना, ते पन्हाळगडी गेले असताना कळून आल्याबरोबर त्यांनी पन्हाळ्यावरील फितूर लोकांना शासन केलंच. पण मूळ कट रायगडी म्हणजे स्वराज्याच्या राजधानीत शिजला होता म्हणून त्यात जबाबदार असणाऱ्या प्रल्हादपंतादि सरकारकून वगैरेंना येसूबाईसाहेब राणी सरकार यांच्याकडून कैद करवले, ही घटना नोव्हे. १६८८ ची. (२७-पृ.१६ व २८) पण याच कटाचा परिणाम म्हणून १ फेब्रु. १६८९ रोजी संभाजी महाराजांना मोगलांनी कैद केलं. पाँडेचरीचा फ्रेंच गव्हर्नर मार्टिन यानेदेखील आपल्या रोजनिशीत संभाजी महाराजांच्या काही प्रमुख ब्राह्मणांनी मोगल अधिकाऱ्यांशी संगनमत करून त्यांचा नाश घडवून आणला, अशी नोंद केली आहे. (३-१४-पृ.१२०) व (२७-पृ.१७) इंग्रजी साधनांच्या सहाय्याने सर यदुनाथ सरकार यांनीही असं विधान केलं आहे की, मुघली सरदार मुकर्रबखानाने जेव्हा संभाजी महाराजांना पकडलं तेव्हा अशी वार्ता पसरली होती की,

स्थानिक देशद्रोही ब्राह्मणांनी या मुघल सेनापतीला योग्य वेळी आवश्यक ती बातमी पुरवून आणि मार्गदर्शन करून संगमेश्वर मुक्कामी संभाजीराजांना अचानक पकडण्यात मदत केली. श्री. बेंद्रे ठामपणे सांगतात की, रायगडच्या ब्राह्मण मंत्र्यांनी मोगली सरदारासमवेत संभाजी महाराजांना पकडून देण्याचा कट केला होता, हे आता तत्कालीन कागदपत्रांवरून सिद्धच झालं आहे. (२७-पृ.२८)

विशाळगडची सर्व व्यवस्था मार्गी लावून संभाजी महाराज आंबेघाटातून रायगडाकडे निघाले. शत्रूकडून अनपेक्षित कारवाई होऊ नये म्हणून त्यांनी आंबेघाटाचा एकमेव मार्ग शत्रूला बंद करण्याच्या उद्देशाने ५००० स्वारांची एक तुकडी घाटाच्या तोंडावरच मलकापुरात तैनात केली होती. पण या अपेक्षित मार्गाने न येता, औरंगजेबाच्या हुकुमाप्रमाणे मुकर्रबखान स्वतः कराड मार्गाने तिवरा घाटातून जंगल व दऱ्याखोऱ्या तुडवत संगमेश्वर मुक्कामी उतरला. संगमेश्वराकडे येणारा कोणताही शत्रू मलकापूर मार्गानेच येईल, तेथे सज्ज ठेवलेली आपली तुकडी त्यांचा प्रतिकार करेल व आपणास योग्य ती खबर मिळेल, या विश्वासाने संभाजी महाराज संगमेश्वरी निर्धास्त होते. पण मुकर्रबखान अचानक समोर उभा ठाकल्यावर मराठ्यांच्या छावणीत गोंधळ उडाला. संभाजी महाराजांबरोबर असलेल्या ४००-५०० स्वारांनी शत्रूची कोंडी फोडण्याचा केलेला प्रयत्न असफल ठरला व संभाजी महाराज व कवी कलश कैद झाले. त्यांना घेऊन मुकर्रबखान मिरज, अकलूज मार्गाने बहादूरगड येथे बादशहासमोर हजर झाला आणि मग दोन आठवड्यांत राजांचा अनन्वित छळ करून त्यांना ठार मारण्यात आलं. (११ मार्च १६८९)

संभाजी महाराज एक रणझुंजार युद्धनेता होता. सुमारे आठ वर्षांपेक्षा अधिक काळ त्यांनी मोगलांच्या प्रचंड सैन्याला ठिकठिकाणी यशस्वीपणे तोंड दिलं होतं. पण शेवटी संगमेश्वराला मुकर्रबखानच्या अधिक कुशल-युद्ध व्यवहारामुळे (Superior tactical Conduct) ते कैद झाले, असंच म्हणावं लागेल.

संभाजी महाराजांना कैद करून मुकर्रबखान जेव्हा त्यांना घेऊन जाऊ लागला, तेव्हा महाराजांची सुटका करण्याचा प्रयत्नच झाला नाही, असा एक समज आहे. पण श्री.बेंद्रे म्हणतात की, तसा प्रयत्न धनाजी जाधव व त्यावेळी त्यांच्या हाताखाली असलेल्या संताजी घोरपडे यांनी केला होता. (२७-पृ.३०) त्यात त्यांना यश आलं नाही, हा भाग वेगळा. याशिवाय संभाजीराजांना मुकर्रबखानाच्या



कैदेतून सोडवण्याचा प्रयत्न झाल्याचा दोन कथा इतिहास संशोधक डॉ. जयसिंगराव पवार यांनी दिल्या आहेत. बत्तीस शिराळ्याचे श्री.श्रीकृष्ण भट ऊर्फ आप्पाशास्त्री दीक्षित यांचे संभाजी महाराजांशी एकनिष्ठेचे संबंध होते. संभाजी महाराजांना कैद करून मुकर्रबखान आपल्या सैन्य तुकडीसह मार्गक्रमण करीत असताना त्याने एक रात्र शिराळ्याच्या कोटाजवळ मुक्काम केला. ही वार्ता आप्पाशास्त्रींना समजताच त्यांनी आपल्या तालीमखान्यातील तगडे जवान, गावातील लढाऊ लोक आणि ठाण्यामध्ये असलेली मराठा शिबंदी यांना एकत्र जमवून मुकर्रबखानाच्या छावणीवर, राजांची सुटका करण्यासाठी अचानक हल्ला केला. पण मोगलांचं सैन्यबळ अधिक असल्याने आप्पाशास्त्री व त्यांच्या साथीदारांनी शौर्याने प्रयत्न करूनही त्यात त्यांना यश आलं नाही व ते आपल्या सहकाऱ्यांसह पकडले जाऊन नंतर मुकर्रबखानाने सर्वांचा शिरच्छेद केला. दुसरी कथा सरदार जोत्याजी केसकरांची आहे. ते पन्हाळा-शिराळा परिसरातील पुनाळ या गावचे पाटील. ते रायगडाहून कांहीं कामानिमित्त या बाजूला आले असताना त्यांना संभाजी महाराजांच्या अटकेची बातमी समजली. कैद केलेल्या संभाजी महाराजांना मोगल सैन्य शिराळ्यावरून नेत आहेत, हे समजताच त्यांनी सैन्याची जमवाजमव केली व मोगल सैन्याच्या मागावर ते दबा धरून बसले. त्यांनी गनिमीकाव्याचा अवलंब करून मुकर्रबखानाची तुकडी जवळ आल्यावर अचानक छापा घातला. पण मोगल सैन्य सावरून उभं राहिल्यावर आपल्या थोडक्या मदतीवर त्यांच्याशी समोरासमोर सामना करणं अशक्य झाल्याने त्यांनी आजूबाजूच्या झाडाझुडपांचा आश्रय घेऊन माघार घेतली. कदाचित आप्पाशास्त्री दीक्षित व जोत्याजी केसकर यांनी संयुक्तपणे हा प्रयत्न केला असावा, असा डॉ. जयसिंगराव पवार यांचा कयास आहे. अर्थात, दोन्ही प्रयत्न फोल ठरले. (३६-पृ.९१ ते ९६)

एखाद्याला आश्चर्य वाटेल ते याचं की, संभाजीराजांसारख्या तरुण, उत्साही, युद्धकुशल, प्रजाप्रिय व सेनाप्रिय राजाला बाजूला सारून रामराजांसारख्या बालवयीन राजाला सिंहासनावर बसवून हे कारस्थानी सरकारकून मोगलांच्या स्वराज्यावरील प्रचंड स्वारीला कसं काय तोंड देणार होते? त्याचा खुलासा श्री.बेंद्रे यांच्या लिखाणावरून होतो. श्री. बेंद्रे म्हणतात, 'या राजद्रोही व राष्ट्रद्रोही मंत्र्यांनी व त्यांच्या सहाय्यकांनी आपल्या पापाचं (संभाजी महाराजांना पकडून देण्याचे) खापर कवी कलश मारला गेलेला पाहून त्याच्या माथी मारलं

आहे... बखरकारांनी मात्र राजद्रोही मंत्र्यांच्या प्रचारावरच भर दिला आणि हा कट गणोजी शिर्केनी केला, असं भासवलं... या कटाचा उद्देश इतकाच असावा की, संभाजी महाराजांना मोगली सरदाराकडून खून करवून त्यांच्या लहान मुलाच्या नावाने राज्य करून, मोगलांचं मांडलिकत्व स्वीकारून, सरकारकुनांना त्यांच्या नाकर्तेपणामुळे मागे पडावं लागलं होतं त्यांनी राज्यभोग भोगावयाचा. (शाहूराजे मोठे झाल्यावर वडिलांचा खून केल्याबद्दल सूड उगवतील म्हणून नंतर त्यांच्याऐवजी रामराजांचं नाव त्यांनी मुक्रर केलं.) असं केल्याने मोगलांनाही दुर्घट शत्रूच्या निर्मूलनाचा फायदा मिळून आपल्या राजधानीत परतण्यास मुक्तता मिळाली असती आणि जर मनुचीची माहिती बरोबर असली, तर २८ गड स्वाधीन झाल्याने हिंदवी स्वराज्यापासून (मोगलांना) निर्भयपणे राहाता आलं असतं. गड देण्याची अट कटवाल्यांची होती. येसूबाईसाहेबांच्या तहाच्या कलमातील नव्हती. हेही गड देण्याचं पाप आपल्या माथ्यावरून राजद्रोही मंत्र्यांनी येसूबाईसाहेबांच्या माथी मारलं. (हे गड नंतर दिले गेले नाहीत हा भाग वेगळा.) सारांश, हिंदवी स्वराज्याची निःसंतानी करण्याची कारवाई कटवाल्यांनी केली; परंतु त्याची जबाबदारी आपल्यावर येत आहे हे पाहून ह्या कारवाईला की कलश व येसूबाई जबाबदार असल्याचा प्रचार केला व आपल्यावरील पाप निखळून टाकलं.' (२७ पृ.२८)

निरक्षर व अडाणी जनताजनार्दन एका बाजूला व दुसऱ्या बाजूला उचापती विद्वान मोक्याच्या जागी असल्यावर ते विद्वान व त्यांचे पक्षपाती लेखक इतिहासाला कशी कलाटणी देतात, याचं संभाजी महाराजांचं चरित्र ज्वलंत उदाहरण ठरावं.

ooo



# ३. दिलेरखानाकडे संभाजीराजे

संभाजीराजांचे पणजोबा मालोजीराजे यांना प्रथम पुणे व सुपे प्रांताची जहागीर निजामशहाकडून मिळाली. पुढे मालोजीराजांच्या मृत्यूनंतर राजकीय उलाढालीत तो प्रदेश आदिलशहाकडे गेला व शहाजीराजे तिचे जहागीरदार म्हणून कारभार पाहू लागले. शिवजन्म ८/४/१६२७ चा आहे. असं सांगणाऱ्या सर्व बखरी व कवी परमानंदांच्या सूर्यवंश यातील नोंदीनुसार आपल्या वयाच्या सातव्या वर्षी शिवराय हे आपल्या मातेसह पिताश्री शहाजीराजांच्या जवळ कर्नाटकात राहात होते. शिवराय सात वर्षांचे झाल्यावर मुळाक्षरं शिकण्यास योग्य झालं, असं जाणून शहाजीराजांनी त्यांना पाच वर्षे योग्य ते शिक्षण देण्याची व्यवस्था केली व त्यांना बारावं वर्ष लागल्यावर १६३९ च्या सुमारास मातोश्री जिजाऊबाईसाहेब यांच्यासह पुणे प्रांती जहागिरीची व्यवस्था पाहण्यास धाडलं.

शिवरायांचे पुत्र शंभूराजे यांचा जन्म पुरंदरावर १४ मे १६५७ रोजी झाला. त्याच सुमारास शिवाजीराजांनी औरंगजेबाकडून आदिलशाही मुलूख तुम्हास बख्श करीत आहोत, असं फर्मान मिळवलं. म्हणजे एका अर्थी शिवराय त्यावेळी मोगलांचे मनसबदार झाले. (३-१०-४१६) शिवाजीराजांनी शंभूरायांना त्यांच्या १२ वर्षांच्या बालवयातच प्रथम पंचहजारी नंतर सप्तहजारी असा मोगली सुभेदारीचा तीन-चार वर्षे अनुभव दिला होता. इतकंच नव्हे, तर १६७४ मध्ये त्यांच्या राज्याभिषेक समयी, शंभूराजे राज्याचे युवराज ठरल्यावरही शिवाजी महाराजांनी कर्नाटक स्वारीवर निघण्यापूर्वी १६७५ मध्ये मोगलांशी सख्यत्वाचा बहाणा करून एक राजकीय डाव म्हणून का होईना, संभाजीराजांसाठी पुन्हा औरंगजेबाकडून मनसबदारी मागितली होती व आपल्या २२ जुलै १६७५ च्या हुकुमाने औरंगजेबाने संभाजीराजांसाठी सहाहजारी मनसबदारी मान्यही केली होती. म्हणजे एका अर्थाने संभाजीराजे या वेळेपासून पुन्हा

मोगलांचे मनसबदार झाले होते. वाटाघाटींचा घोळ घालून संभाजीराजांना ओलीस म्हणून प्रत्यक्ष पाठवण्यास शिवाजी महाराजांनी शेवटपर्यंत टाळाटाळ केली, ही गोष्ट वेगळी. ५ सप्टेंबर १६७६ च्या त्यांच्या पत्रात सुरतकर इंग्रज स्पष्टच म्हणतात की, मोगलांनी तूर्त आपल्या राज्यावर स्वारी करू नये, एवढाच त्यामागे महाराजांचा उद्देश होता.

उदयपूर वगळता अन्य सर्वच राजपूत राजे त्याकाळी समारंभपूर्वक सिंहासनारूढ होत असताना व त्यांच्या पुत्रास युवराज म्हणून घोषित केलं जात असताना त्याचवेळी ते दिल्लीकर पातशहाचे मनसबदार म्हणून मोठ्या प्रौढीने मिरवत असत. शिवाजी महाराज एका मनसबदार जहागीरदाराचे एक पुत्र म्हणून कारभार पाहात असताना, त्यांनी आपलं स्वतंत्र व सार्वभौम स्वराज्य स्थापलं, हाच तेवढा त्यांच्यातील व इतरांतील मोठा मौलिक फरक. हा सर्व आढावा थोडक्यात एवढ्यासाठी घेतला की, मोगलांतर्फे जहागीर किंवा मनसबदारी स्वीकारणं त्याकाळी गैर समजत नसत, हे लक्षात यावं. सर्व छोट्या-मोठ्या राज्यकर्त्यांत हा जणू प्रघातच होता.

मराठी साहित्याचे संशोधक डॉ. मु. श्री. कानडे आपल्या लेखात (३३३, पृ.४३३) म्हणतात, 'इ.स.१६७८ मध्ये संभाजीराजे स्वराज्य सोडून मोगलांकडे निघून गेले व मोगल सरदार दिलेरखान यांच्या फौजेत दाखल झाले. या विपरीत वागण्याला नेमकं कोणतं कारण घडलं, ते ठरवणं कठीण आहे. बखरकारांनी यासंबंधी वेगवेगळी कारणं दिलेली आहेत. मल्हार रामराव संभाजीराजांच्या दुर्वर्तनाबद्दल महाराजांनी त्यांना शिक्षा करण्याचं ठरवलं म्हणून ते निघून गेले असं लिहितो, तर कारभारी निळोपंत मुजुमदार यांच्याशी अयोग्य तऱ्हेने वागल्याबद्दल महाराजांनी संभाजीराजांची निर्भत्सना केली, त्यामुळे उदासवृत्ती झालेले संभाजीराजे पत्नी येसूबाईसह दिलेरखानाकडे गेल्याचं शिवदिग्विजयात वर्णन आहे. (प्रत्यक्षात ते पत्नी दुर्गा व जाधवरावांच्याकडे दिलेल्या आपल्या भगिनीसह दिलेरखानाकडे गेले.) सभासद मात्र अशा कोणत्याही प्रसंगाचा स्पष्ट निर्देश न करता 'संभाजी राजे-राजियांचे ज्येष्ठ पुत्र, राजियांवर रूसून मोगलाईत गेले.' असा मोघम निर्देश करतो. '९१ कलमी बखरीतही' असाच संदिग्ध उल्लेख आहे.'

संभाजीराजांविरुद्ध सरकारकुनांनी त्यांच्या विशिष्ट स्वार्थासाठी, चारित्र्यहनन व इतर खोटेनाटे आरोप यांचा सुकाळ केल्याचं, 'संभाजीराजांच्या विरोधात



कटकारस्थाने' या प्रकरणात आधी चर्चिले आहे. त्यांचाच संभाव्य परिणाम होऊन, संभाजीराजे थोरल्या महाराजांवर रूसून मोगलांकडे गेले, असं मानल्यास ते तसे का रूसले असावेत, याचा १९९० पर्यंत प्रसिद्ध झालेल्या महत्त्वाच्या ऐतिहासिक ग्रंथांचा आधार घेतल्यास अंदाज करता येतो तो असा–

१) दक्षिण स्वारीवर जाण्याचं महाराजांनी ठरवलं तेव्हा निघण्यापूर्वी त्यांनी दरबार भरवला होता. त्यावेळी ते स्पष्टपणे संभाजीराजांना म्हणाले होते, 'आपल्याला मिळालेल्या राज्यावर मुलाने राज्य केले, तर लोक त्याला मान देत नाहीत. मुलगा विद्वान आहे की नाही, हे तो जवळ राहिला तर कळत नाही. मलासुद्धा शहाजीराजांनी पुण्यास ठेवलं. तरी हे राज्य मी तुला देतो. राज्यातील कोणताही भाग तुझ्या भावाला देणार नाही. त्यासाठी मी नवीन राज्य जिंकेन. म्हणजे तुम्हा दोघांना स्वतंत्रपणे राज्य करता येईल. राजाराम लहान आहे. तो मला प्रिय आहे. तो स्वतः राज्य भोगावयास मागत नाही. तुझे गुण मोठे आहेत. पृथ्वी मी तुला ताब्यात देण्यास तयार आहे. खरे म्हणजे राज्य एकाचेच होऊ शकते. जशी शरीराची वाटणी होऊ शकत नाही, तशीच राज्याची वाटणी होऊ शकत नाही. हे राज्य कोणाला तरी एकालाच दिले पाहिजे. मी दुसरे राज्य जिंकून येईपर्यंत तू रायगडला सोयराबाईंच्या सहवासात न राहता शृंगारपूरला राहून प्रभावली सुभ्याचा कारभार पाहा.' यावर संभाजीराजे म्हणाले, 'आमचे दैव हेच आमच्या सुखदुःखाचे कारण आहे. त्याला आई–बाप कोणी जबाबदार नाहीत. तुम्ही नसलात तर स्वराज्यात माझे मन रमणार नाही. तुम्ही येथेच राहा. तुम्ही येथे असलात म्हणजे बरे. वाटणीची कल्पना चूकच आहे. व्यवहाराला धरून नाही. बापाजवळ मी राज्य मागणारा पुत्रच नव्हे.' (२–पृ.५५)

२) मात्र १६७८ च्या एप्रिल–मे महिन्यात महाराज दक्षिण स्वारीहून परतले, तेव्हा ते सरकारकुनांना म्हणतात, 'मी नवीन राज्य जिंकले आहे.... ज्येष्ठ मुलाला मोठा भाग द्यावा, लहानाला लहान भाग द्यावा, असा सर्वसामान्य नियम आहे. राजाराम लहान असल्याने त्याला लांब ठेवणे योग्य वाटत नाही. त्यामुळे मी जिंकलेल्या लांबच्या प्रदेशात (कर्नाटक) संभाजीला पाठवावे, याला तुमची सम्मती असेल तर मी तसे करीन.' (२–पृ.५८) शिवाजी महाराजांनी असा शब्द बदलणं संभाजीराजांना आवडणारं नव्हतं. त्यामुळे महाराज सोयराबाईसाहेब व मंत्रिमंडळ यांचं ऐकून शब्द बदलतात व आपल्यावर अन्याय करतात असं संभाजीराजांना वाटणं साहजिक होतं. आणखी एक

महत्त्वाचा मुद्दा यातून निघतो तो म्हणजे त्यांचं ज्यांच्याशी पटत नव्हतं ते मंत्रिमंडळातील भ्रष्ट मंत्री रायगडावर राहणार व आपणास मात्र दूर टाकणार, म्हणजे यात मंत्रिमंडळाचा विजय आहे व आपला पराभव. स्वाभिमानी शंभूराजांस हे सहन होणं शक्य नव्हतं.

३) शिवाजी महाराजांच्या गैरहजेरीत रायगडावर राजधानीत राहून मुखत्यारीने राज्यकारभार पाहण्याचा युवराजांचा नेहमीचा शिरस्ता मोडून शिवाजी महाराजांनी कर्नाटकचं राजकारण साधून परत येईपर्यंत संभाजीराजांनी रायगडास न राहता शृंगारपुरी जाऊन राहावं, म्हणून आदेश दिला होता. तिथे त्यांना प्रभावळी सुभ्याचा कारभार देऊन ठेवलं. दक्षिण कोकणचा सुभा फार मोठा होता, हे जरी खरं असलं तरी युवराज म्हणून जो सर्वाधिकार त्यांना राजधानीत राहून अशा वेळी मिळायला हवा होता, तो मिळत नव्हता. त्यातल्या त्यात ज्या सरकारकुनांच्या विषयी त्यांच्या मनात तिटकारा उत्पन्न झाला होता अशांचे एका अर्थाने निम्न स्थानात राहाणं त्यांना भाग पडणार होतं. महाराज स्वतः संभाजीराजांसह चिपळूणवरून शृंगारपुरास आले व त्यांनी संभाजीराजांची चांगली व खात्रीची व्यवस्था लावून दिली. (१-पृ.९७) डॉ. कमल गोखलेही म्हणतात की, युवराज म्हणून संभाजीराजे कारभार पाहात असताना त्यांना रायगडावरील अधिकार नाकारण्यात आल्याने ते रागावले असावेत. कदाचित त्यांच्यावर खोटेनाटे आरोप करण्यात येऊ लागल्याने किंवा इतिहासाला अज्ञात असा कोणता तरी मोठा अन्याय त्यांच्यावर झाल्यामुळे ते रागावून मोगलांना मिळाले असावेत, असं वाटतं. (३-३८-पृ.१२)

४) संभाजीराजांना राज्याची वाटणी नको होती. वडिलांनी आपल्यासाठी नवीन राज्य मिळवण्याचा त्रास घ्यावा, असंही त्यांना वाटत नव्हतं. वडिलांकडे राज्य मागणाऱ्यापैकीही ते नव्हते व वडिलांच्या पायाशी दूध-भात खाऊन राहण्याची त्यांची तयारी होती. हे सर्व वेळोवेळी त्यांचे म्हणून जे उद्गार बखरकारांनी नोंदले आहेत, त्यावरून दिसून येतं. त्यांचं वडिलांवर-त्यांच्या आबासाहेबांवर आत्यंतिक प्रेम होतं, आदर होता. आपल्यामुळे त्यांना कसलाही त्रास होऊ नये, अशी त्यांची प्रामाणिक इच्छा असे. त्यांनी वडिलांचा कुठलाच हुकूम कधी धुडकावला नाही. अशा परिस्थितीत, केवळ आपल्यावर सावत्रमातेने व सरकारकुनांनी उठवलेल्या काहुरीमुळे वडिलांना जो मानसिक त्रास होताना त्यांना दिसत होता, तो होऊ नये यासाठी या कवीमनाच्या



संभाजीराजांनी स्वतंत्रपणे आपलं ध्येय साधण्यासाठी दिलेरकडे जाणं शक्य आहे. आपलं उद्दिष्ट साधण्यातील अडचणी दिसून आल्यावर व वडिलांच्या आग्रहामुळे ते स्वराज्यात परतले.

५) शिवाजी महाराज दक्षिणेत गेल्याने व संभाजीराजे एकटेच राजधानीपासून दूर असल्याचं पाहून व त्यातच त्यांच्यामध्ये आणि थोरले महाराज व मंत्रिमंडळ यांच्यामध्ये काही बेबनाव झाल्याचं समजून आल्याने, मराठी राज्यात दुफळी निर्माण करण्यास ही संधी योग्य आहे हे पाहून दिलेरखानाने, औरंगजेबांच्या आज्ञेवरून त्यांना (संभाजीराजांना) पत्र लिहून व मोठी आमिषं दाखवून आपणाकडे ओढण्याचा प्रयत्न केला; परंतु महाराज विश्वासाने आपल्यावर राज्य सोपवून दक्षिणेत गेले असल्याने ते परत येईपर्यंत आपण येथून हलू शकणार नाही, अशाप्रकारचं उत्तर त्यांनी दिलेरला धाडलं. संभाजीराजांचा वडिलांविषयीचा आदर, विशेषतः त्यांनी आपणावर अन्याय केला अशी भावना असूनसुद्धा जो यातून दिसतो तो महत्त्वाचा. तसंच आपली जबाबदारी योग्य रीतीने पार पाडण्याचा त्यांचा स्वभावही त्यातून व्यक्त होतो. पण नंतर दिलेरखानाकडे जाण्यास हे एक कारण असावं.

६) एप्रिल १६७८ मध्ये महाराज कर्नाटक स्वारीहून परतले, पण त्यांनी बराच काळ संभाजीराजांशी संपर्क साधल्याचं दिसत नाही. यावरून कवीमनाच्या शंभूराजांना वडिलांची आपल्याविषयीची नाराजी उदास करून जाणं शक्य आहे. त्यातच महाराज कर्नाटक स्वारीवरून परतल्यावर जेव्हा रायगडावर गेले, तेव्हा मंत्रिगणाने संभाजीराजांविरुद्ध त्यांच्याकडे काही तक्रार केली. त्यावर संभाजीराजांना खुलासा करण्याची कसलीच संधी न देता, महाराजांनी त्यांना पत्र लिहिलं, 'प्रजेला अभय देऊन करवसुलीस प्रतिबंध करतोस, मंत्र्यांचा अपमान करतोस, तरी तू शृंगारपूर सोडून सज्जनगडाला जा.' (२-पृ.५९)

७) परमानंद काव्यात वर्णन केल्याप्रमाणे महाराज एकदा सोयराबाई राणीसाहेबांच्या महालात गेले असताना राणीसाहेबांनी त्रागा करून रामराजांच्या बाबतीतील भविष्यातील व्यवस्थेचा विषय काढला. तेव्हा महाराजांनी रामराजांना मराठी राज्याचे वारस करू व नव्याने मिळवायचे राज्य संभाजीराजांना देऊ, असं कबूल केलं. त्यानंतर थोड्याच दिवसांत शंभूराजांना बोलावणं पाठवून महाराजांनी जेव्हा आपली इच्छा व्यक्त केली तेव्हा संभाजीराजांनी उत्तर दिलं, ते या काव्याप्रमाणे असं: 'एवढे परिश्रम आपण कशाला घेता? माझ्या अंगात

कर्तबगारी असेल तर मी स्वतः (राज्य) मिळवीन.' (३-१२ पृ.३२६) आणि येथेच संभाजीराजे दिलेरला का मिळाले असावे, याचं उत्तर मिळतं. वरील अ. नं. १ मध्ये स्पष्ट झालेले महाराजांचे विचार (बापाकडून मिळालेलं राज्य मुलाने केलं तर लोक त्याला मान देत नाहीत वगैरे.) व या ठिकाणी संभाजीराजांनी उघड केलेलं त्याचं मन की, माझ्यात कर्तबगारी असेल तर मी स्वतः राज्य मिळवीन. या दोन्हीवरून निष्कर्ष निघतो तो असा की, वडिलांपासून दूर जाऊन आपली कर्तबगारी वडिलांना दाखवावी व स्वतंत्र राज्य उभारून मग मानमरातबाची अपेक्षा करावी, या उद्देशाने संभाजीराजे दिलेरकडे गेले असावेत. मी वडिलांकडे राज्य मागणारा पुत्रच नव्हे, असंही ते एकदा म्हणाल्याचं याआधी नमूद झालेलं आहे. दिलेरखानाला लिहिलेल्या एका पत्रोत्तरातही संभाजीराजे म्हणतात की, आपल्या पराक्रमाने जिंकलेल्या वैभवाने मी (वडिलांना) संतुष्ट करीन. (३-पृ.४४) आपल्याला युवराजपदाचा बाह्य व लौकिक सन्मानापासून दूर ठेवण्यात आपल्या प्रतिपक्षाने आपणावर मात केली याची जाणीव झाल्याने वैतागलेले जवान मर्द शंभूराजे, आपल्या पित्याने उठविले तसेच राज्य स्वतःच्या सामर्थ्यावर उठवण्याच्या भ्रामक आत्मविश्वासावर दिलेरला मिळाले असावेत आणि तेही वडिलांना आपली योग्यता सिद्ध करण्यासाठीच होय. मराठी राज्य मोगलांच्या घशात घालण्यासाठी निश्चितच नव्हे.

(८) संभाजीराजांनी १६८० मध्ये एका ब्राह्मणाला (बाकरे) दान दिलं होतं. त्या दानपत्रात ते म्हणतात, 'मंत्र्यांच्या सांगण्यावरून मला राज्य दिले नव्हते. सावत्रआईच्या रागाने बापाने मला वाईटरीतीने वागविले तरी मी रामचंद्राप्रमाणे वागलो. अर्धकोटीचे राज्य व किल्लेकोट असलेले राज्य टाकून मी थोड्या घोड्यांसह सैन्याला मिळालो.' राज्यावर आल्यावर संभाजीराजांनी स्वतः केलेल्या दानपत्रात हे लिहिलं असल्यामुळे ते दिलेरला का मिळाले, याच्या कारणावर अधिक चर्चा करण्याचं कारण उरत नाही. (२-पृ.६५)

दिलेरखानाने मराठी राज्याचा युवराज आपल्याकडे आल्याचा फायदा घेऊन मराठी प्रदेश जिंकावयाचा ठरवलं. पुढे संभाजीराजे व दिलेरखान यांच्यातील उडालेला खटका पाहता असं दिसतं की, आपल्याला मराठी राज्यावर हल्ला करण्याचा प्रसंग येणार नाही; विजापूर, गोवळकोंडा इत्यादी प्रदेशांत आपल्याकडून कामगिरी घेण्यात येईल, अशी संभाजीराजांची अपेक्षा असावी. पण मोगलांच्या



जाळ्यात एकदा अडकल्यावर त्यांच्या अपेक्षांना मर्यादा पडल्या. (३-८-पृ.१०६) त्यांना दिलेरखानाबरोबर मराठी राज्यातील भूपाळगडावर चालून जाण्याचा प्रसंग आला, तेव्हा आपली गडावरची माणसं निष्कारण मरू नयेत म्हणून त्यांनी गडावर दूत पाठवून, दिलेरच्या प्रबळ सैन्यापुढे गड दुर्बल असल्याने विनाकारण हानी करून न घेता किल्ला खानाला द्यावा, असा निरोप पाठवला, पण फिरंगोजी नरसाळे यांनी तो लढवलाच. दिलेरखानास तो घेण्यास फारसा वेळ लागला नाही. (त्यानंतर पंधरा दिवसांतच मराठ्यांनी तो गड परत जिंकला.) भूपाळगडानंतर पन्हाळ्यावर चालून जाण्याचा दिलेरचा मनसुबा होता. पण संभाजीराजांच्या विरोधामुळे त्यांच्या सल्ल्यानुसार; त्याने विजापूरकडे आपला रोख वळवला. पुढे मराठ्यांना मोगल हद्दीतून पळवून लावण्यासाठी दिलेरने मिरज आणि पन्हाळ्याच्या बाजूला आपला मोर्चा वळवला. कारण मोगल हद्दीतील प्रदेशात शिवाजी महाराजांनी केलेल्या लुटीचा दिलेरखानाकडून बंदोबस्त न झाल्याने औरंगजेबाने त्याची कानउघाडणी केली होती. जालगिरी, तिकोटा, होनवड या मार्गाने तो अथणीपर्यंत पोहोचला. संभाजीराजे त्याच्याबरोबर होते. दिलेरखानाने अथणीपर्यंत जाताना बरीच गावं व खेडी उद्ध्वस्त केली व हिंदूंचे हाल केले. ते संभाजीराजांना मुळीच आवडलं नाही व त्यांच्याच मतभेद सुरू झाले व भांडणे होण्यापर्यंत मजल गेली. वास्तविक संभाजीराजांचे मोगलांशी जे सख्यत्व झाले. ते Friendly Alliance या सदराखाली मोडतं. ते दिलेरखानाच्या गोटात गेले ते मोगलांचा सेवक अगर मनसबदार म्हणून नव्हे, तर त्यांचा स्वतंत्र व समान दर्जाचा दोस्त (Ally) म्हणून आणि त्यांचे दिलेरशी जे वितुष्ट आलं. ते तो अरेरावी करू लागला म्हणून. त्यानंतर त्यांनी खानाचा गोट सोडून सरळ स्वराज्याचा रस्ता धरला. (३-१३ पृ.४८३) इंग्रजी व फारशी साधनांवरून दिलेरखानाच्या छावणीत संभाजीराजे कसे स्वतंत्र राजासारखे वागत होते आणि अथणी व तिकोटा येथील हिंदूंच्यावर अन्याय करणाऱ्या खानाची त्यांनी कशी कानउघाडणी केली होती, याची कल्पना येते. संभाजीराजांनी आपल्या एका दानपत्रात दिलेरशी झालेल्या त्यांच्या मतभेदाचा उल्लेख केला आहे. त्यात ते म्हणतात, 'दिलेर आसुराबरोबर माझे भांडण झाले.' इतकंच नव्हे, तर दोघांत मारामारी होण्यापर्यंत मजल गेली होती. (३-३८ पान. १४) जेव्हा दिलेरखान संभाजीराजांवर धन्याची गुर्मी दाखवू लागला आणि मनसबदार म्हणून त्यांची दिल्लीला रवानगी करण्याची भाषा बोलू लागला, तेव्हा या

बाणेदार आणि स्वतंत्र वृत्तीच्या राजपुत्राला त्याच्या काळ्या कारस्थानाची कल्पना आली आणि त्याच्या हातावर तुरी देऊन ते निसटले. (३-१४-पृ.१२३)

दिलेरखानाच्या गोटातून परतून संभाजीराजे पन्हाळ्यास २१/१२/१६७९ रोजी आल्याचं कळताच शिवाजी महाराजांना अतिशय आनंद झाला व मुलाची भेट घेण्यास ते १३/१/१६८० रोजी पन्हाळ्यावर दाखल झाले. संभाजीराजे दिलेरखानाच्या गोटात गेल्याची बातमी जेव्हा महाराजांच्या कानावर गेली होती. तेव्हा त्यांना आपल्या कृतकर्माचा खेद झाला होता व आपल्या दुष्ट मंत्र्यांच्या सल्ल्याने आपण फसले गेलो, अशी त्यांची खात्री झाली होती. कवींद्र परमानंद शिवाजी महाराजांच्या त्यावेळच्या मनःस्थितीचं वर्णन करताना म्हणतात की, महाराज चिंतातूर झाले व त्यांना पश्चात्ताप झाला. (१-पृ.१०६) याचा अर्थच असा की, आपल्या मंत्रिमंडळाच्या चुकीच्या माहितीवर विश्वास ठेवल्यामुळे आपण फसलो व चुकीचे निर्णय घेतले आणि त्यामुळे संभाजीराजांची मनःस्थिती बिघडून त्याची परिणती त्यांच्या मोगलांना मिळण्यात झाली, याची पूर्ण कल्पना त्यांना आली. पन्हाळ्यावर पिता-पुत्राचं बरंच बोलणं झालं, एकमेकांचे गैरसमज दूर झाले व महाराजांनी पुन्हा त्यांना अधिकार दिले. दिलेरखानाकडून संभाजीराजे परत आल्यावर महाराजांनी या बगावतखोर पुत्राला नजरकैदेत टाकलं, ही आजवर प्रचलित असलेली अफवा साफ खोटी आहे. महाराजांनी त्यांना कोल्हापूर, मलकापूर, शिराळा असा मुलूख धरून प्रांत पन्हाळ्यावर स्वतंत्र कारभार करण्यास सांगितला व त्यांच्या दिमतीला म्हालोजी घोरपडे यांना दिलं.

पन्हाळ्यावर पिता-पुत्राची भेट झाली तेव्हा प्रेमळ पित्याच्या भावना उचंबळून आल्या असणार. कारण ज्येष्ठ मुलगा मोगलांच्या तावडीतून सहीसलामत परत आला, ही मोठी आनंदाची गोष्ट होती. ते म्हणतात, 'लेकरा मजला सोडू नको... आता तू ज्येष्ठ पुत्र, थोर झालास आणि सचंतर राज्य कर्तव्य हे तुझ्या चिती आहे. असे आपणास कळते. तर मजला हे अगत्य आहे.' पुढे सभासद म्हणतो की असे दोन प्रांत (कर्नाटक व महाराष्ट्राचे भाग) मिळून एक राज्य आहे. ऐशी तजवीज करून संभाजी राजियास पन्हाळ्यावर ठेवले आणि या दोन्हींच्या मधे तो असंही म्हणतो की, राज्याचे दोन भाग करून कर्नाटकाचे राज्य तुला देतो व इकडील भाग राजारामास देतो, असं महाराज म्हणाले. सभासदाचा हा



मजकूर बुचकळ्यात टाकणारा आहे. असं प्रसिद्ध इतिहास संशोधक डॉ. अ. रा. कुलकर्णीही म्हणतात. (३-१४, पृ.१२४/२५) पिता-पुत्राची मसलत अत्यंत खाजगीत झाल्याने सभासदाने हे काही प्रमाणात अंदाजाने व काही प्रमाणात हेतूपूर्वक लिहिलं असावं असं वाटतं. मंत्रिमंडळाने दिशाभूल केल्याने संभाजीराजांशी वागण्यात आपली चूक झाली व त्यामुळेच मनःस्ताप होऊन ते मोगलास मिळाले, ही गोष्ट लक्षात आल्यानंतर व संभाजीराजांना राज्याची वाटणी नको आहे, हे खुद्द संभाजीराजांनीच पूर्वी महाराजांशी बोलताना सांगि..लं असल्याने ते पुन्हा महाराज पुत्राशी झालेल्या वियोगानंतरच्या पहिल्याच भेटीत राज्याच्या वाटणीचा विषय काढून संभाजीस कर्नाटकात व रामराजास इकडील राज्य देण्याचं बोलून दाखवतील, असं वाटत नाही. एक तर त्यांनी संभाजीराजांचा रूसवा काढावा म्हणून त्यांना मराठी भागातील राज्य देण्याचं ठरवलं, असं तरी असेल किंवा सध्या आपण हयात असल्याने राज्याच्या वाटणीचा प्रश्न आताच उद्भवत नाही म्हणून त्याबाबतीतील निर्णय पुढे ढकलला असेल, एवढ्याच शक्यता वाटतात. 'आपणास साहेबांच्या पायाची जोड आहे. आपण दूधभात खाऊन साहेबांच्या पायाचं चिंतन करीत राहू.' हे संभाजीराजांचे सभासदाने नोंदवलेले त्यावेळचे उद्गार, शिवाजी महाराजांच्या अंमलाखाली एकछत्री कारभार पुढे चालवण्याचा विचार त्यांनी बोलून दाखवला असावा, असं दर्शवतं. कारण महाराजांचं वय त्यावेळी त्रेपन्न वर्षांच्या आसपास म्हणजे फार नव्हतं व त्यांची प्रकृतीही उत्तम होती. त्यावेळी ते पुढे एवढ्या लवकर कालवश होतील, असं खुद्द त्यांनाही वाटलं नसणार. महाराज त्यावेळी असंही म्हणाले की, आपण रायगडाला जातो. राजारामाचे लग्न आटोपून पुन्हा येतो त्यावेळी राज्यकारभाराचा जरूर तो विचार करू. कर्नाटकाचे राज्य संभाजीराजांस व मराठी भागातील राजारामास, असं महाराज बोलल्याचं सभासद जे लिहितो ते राजारामाच्या पुष्टीसाठी. सभासदाने ही बखर लिहिली ती राजाराम महाराजांचं जिंजीत वास्तव्य असताना व संभाजी महाराजांच्या मृत्यूनंतर ७/८ वर्षांनी. अर्थातच, तो राजाराम महाराजांचा पक्षपाती असल्याने त्यांची प्रतिमा उजळेल असंच तो लिहिणार आणि म्हणून थोरल्या महाराजांचा राजारामासच मराठी भागाचे राज्य द्यायचा विचार होता, असं त्याने दडपून सांगितल्याचं दिसतं. शिवाय तो संभाजी महाराजांविरुद्ध कट करणाऱ्या सरकारकुनांचा पक्षपाती असावा. कारण त्यातील प्रल्हाद निराजींसारखी मंडळी राजारामाच्या कारकिर्दीत

अधिकाराच्या जागांवर होती. शिवाय संभाजीराजांचा गादीवरील हक्क डावलून राजारामास गादीवर बसवण्याचा सरकारकुनांचा हेतू स्वार्थाचा नसून केवळ थोरल्या महाराजांची इच्छा पुरी करण्याचा होता, अन्य नाही असं म्हणण्यास बळकटी यावी म्हणूनच त्याने असं लिहिलं असावं.

पण संभाजीराजांचा निरोप घेऊन महाराज रायगडी परतल्यावर त्यांना पुन्हा पन्हाळगडी जाऊन संभाजीराजांशी पुढील चर्चा करण्यास अवसर मिळाला नाही. महाराजांनी रायगडावर येऊन राजारामांचं लग्न १५-३-१६८० रोजी लावल्यावर आठ दिवसांतच आजारी होऊन बाराव्या दिवशी ता. ३ एप्रिल १६८० रोजी ते मरण पावले.

संभाजीराजांकडून प्रमाद घडला नाही, असं कोणीही म्हणणार नाही. वडिलांच्या हयातीत मराठ्यांचे कट्टर शत्रू जे मोगल त्यांना जाऊन मिळणं, ही संभाजीराजांची मोठी चूकच होय. स्वतंत्र व सार्वभौम राज्याच्या मराठ्यांचा युवराज शत्रूला मिळणं ही घटना रजपूत राजांची कनिष्ठ मुलं मोगलांच्या चाकरीत जात. याहून सर्वस्वी भिन्न आहे. त्यांच्या कृत्याला कोणीही चांगलं म्हटलेलं नाही व एकमुखाने सर्वांनीच त्यांना दोष लावला आहे. शिवरायांमध्ये जी धगधगीत स्वातंत्र्यलालसा होती तशीच ती संभाजीराजांमध्येसुद्धा होती. पण ती प्रकर्षाने सूर्यबिंबासारखी झळाळून उठल्याचं दिसतं, ते मात्र पित्याशी झालेल्या पन्हाळ्याच्या कोठीतील ऐतिहासिक भेटीनंतर. तद्नंतर त्यांनी वठवलेली धीरोदत्त नायकाची व्यक्तिरेखा यास साक्ष आहे.

वरील सर्व पार्श्वभूमी लक्षात घेतली, तर काहीसा उदास, सरळ, आखीव मार्गाने चालायची सवय असलेल्या या आग्रही राजपुती बाण्याच्या राजपुत्राने, पूर्वपरिचित जो दिलेरखान त्याच्या छावणीत रूजू होण्याचं जे अपकृत्य केलं त्याचा गडदपणा श्री. गो. नी. दांडेकर म्हणतात, (३-१०-पृ.४१७) त्याप्रमाणे कमी व्हायला हरकत नाही.

वरील ऊहापोह मी माझ्या दृष्टिकोनातून साधारण १९९० पर्यंत प्रसिद्ध झालेल्या काही ऐतिहासिक ग्रंथांच्या आधारे केला आहे. हे मी सुरुवातीसच स्पष्ट केलं आहे. मात्र, त्यानंतर ऑक्टोबर १९९३ मध्ये पहिली आवृत्ती निघालेल्या आपल्या 'शंभूराजे' या छोटेखानी ऐतिहासिक पुस्तकात प्रा. सु. ग. शेवडे व छत्रपती संभाजी महाराजांवर सखोल संशोधन करणाऱ्या ॲडव्होकेट अनंत वि. दारवटकर यांनी आपल्या संकल्पित शंभू चरित्रातील एका प्रकरणात अधिक



सविस्तरपणे एक वेगळाच मुद्दा प्रथमच मांडल्याचं निदर्शनास आलं. त्यात हे दोघेही इतिहासकार जोरदारपणे प्रतिपादन करतात की, संभाजीराजांचं दिलेरखानास मिळणं हा थोरल्या महाराजांचा एक राजकीय डाव होता. अर्थात, हा अतिशय गुप्त राजकीय डाव असल्याने असले राजकीय डाव यशस्वी झाले तरी पुढील यशाच्या दृष्टीने लगेच उघड करायचे नसल्याने व यातील डाव आखणारे थोरले महाराज, तो प्रत्यक्ष कृतीत उतरवणारे त्यांचे पुत्र युवराज संभाजीराजे व कटाची पूर्ण कल्पना दिली गेलेले सरसेनापती हंबीरराव मोहिते, त्यानंतर लवकरच हे जग सोडून गेल्याने या गुप्त राजकीय काव्यास·ऐतिहासिक कागदपत्रांचा आधार मिळणं जवळजवळ अशक्य आहे व भक्कम तर्कसंगतीवरच त्याकरिता अवलंबून राहावं लागणार आहे. या उभयता अभ्यासकांनी मांडलेले मुद्दे सर्वसाधारणपणे असे आहेत-

१) बालपणापासून शिवरायांच्या तालमीत तयार झालेले, आक्रमणाचे प्रसंग स्वतः अनुभवलेले, थोरल्या महाराजांच्या राज्याभिषेकप्रसंगी युवराज म्हणून संबोधित झालेले, पाश्चात्यांना आपल्या शौर्याने व हुशारीने भारून टाकणारे, प्रजाननांच्या कळवळ्याने मंत्र्यांनाही अप्रिय होण्याची तमा न बाळगणारे, मोगलांसारख्या बलाढ्य शत्रूला व त्यांच्या पोर्तुगीज व सिद्दी या सहाय्यकांना एकाच वेळी दमदारपणे तोंड देऊन त्यांनी निंद हराम करणारे व या सर्व लढ्यात एकदाही निराशेचा सूर न काढणारे, संस्कृतात काव्यरचना करून युद्धाच्या धामधुमीतही ग्रंथ रचना करणारे, जीवनाची अखेरही देदीप्यमान हौतात्म्याने सहज स्वीकारणारे व शिवरायांवर नितांत श्रद्धा असणारे शंभूराजे स्वराज्य सोडून मोगलांसारख्या शत्रूला कधी काळी मिळतील, हे मनाला न पटणारं व स्वप्नातही खरं न वाटणारं आहे आणि हे जर खरं असेल, तर ज्याच्या मोगलांना मिळण्यामुळे भूपाळगडावर शेकडो मराठ्यांचे हात तुटले, असा स्वराष्ट्राला धोका देणारा युवराज परत आल्यावर, न्यायनिष्ठूर महाराज त्यांना काहीही शिक्षा न करता, 'लेकरा चुकला होतास, बरे झाले परत आलास.' म्हणून भावनिक मवाळ शब्दांत बोलून त्यांचा सहज स्वीकार करतील, असंही वाटत नाही. याचाच अर्थ तो एक बनाव होता.

२) महाराजांनी दक्षिण दिग्विजयाला जाताना रायगडावर कुरबुरी नकोत म्हणून आणि विजापुरात ठाण मांडून बसलेल्या मोगली सैन्यावर बारीक नजर राहावी म्हणून शंभूराजांना शृंगारपूर-पन्हाळ्यावर धाडलं व आपण परत येईपर्यंत

मोगलांना पुढे सरकू देऊ नये, ही कामगिरी त्यांच्यावर सोपवली. शत्रूला पुढे येऊ न देण्याचे दोन मार्ग होते, एक आपल्या सामर्थ्यांचा वचक, दुसरा त्याच्याशी मैत्रीचं नाटक. तेव्हा हे आक्रमण थोपवून धरण्यासाठी व दिलेरखानाला गाफील ठेवण्यासाठी संभाजीराजांना त्याच्याशी पत्रव्यवहार केला.

३) स्वराज्यात चाललेल्या घडामोडी दिलेरखान आपल्या गुप्तहेरांद्वारे जागृत होता. या कौटुंबिक भांडणाचा फायदा घेऊन शंभूराजांना आपल्या बाजूस वळवावं हा दिलेरचा विचार होता. त्या दृष्टीने त्याने मोगली सैन्यात आल्यास कसा फायदा होईल, त्याचं आमिष दाखवणारं पत्र शंभूराजांना धाडलं. शत्रूंस झुलवत ठेवण्यास हा मोका उत्तम आहे हे जाणून संभाजीराजांनी त्यास उत्तर पाठवून आपल्या वडिलांचं अंतःकरण सावत्रमातेने कसं व्यापून टाकलं आहे, मोरोपंतादी दुष्ट मंत्री आपला उच्छेद करण्यासाठी कसे टपले आहेत व त्यामुळे ते आपल्या दृष्टीसमोरही आपणास कसे नको आहेत, हे कळवून दिलेरच्या मनात आपल्याविषयी आपुलकी निर्माण केली. त्यामुळे शंभूराजांना सहज फोडता येईल ही आशा दिलेरच्या मनात दुणावली. पण त्याचबरोबर वडिलांनी विश्वासाने सोपवलेली जबाबदारी आपण ते येईपर्यंत टाळू शकत नाही, असंही मोठ्या खुबीने सांगून, महाराज परतेपर्यंत सहज वेळ काढला. संभाजी महाराजांचा हा पत्रव्यवहार म्हणजे एक खोटीच भुलभुलावणी होती.

४) वास्तविक शंभूराजांना मोगलांना खरोखरच मिळायचं होतं, तर महाराज सुमारे ६0 हजार मावळ्यांना घेऊन कर्नाटक स्वारीवर गेले. हीच योग्य वेळ होती, पण शंभूराजांनी तसं न करता पत्रव्यवहारात वेळ काढून शत्रूचा हल्ला होऊ न देण्याचा आपला हेतू साधला.

५) महाराज सुमारे पावणे दोन वर्षे मोठ्या सैन्यांसह महाराष्ट्राबाहेर होते. परत आल्यावर सेनेला विश्रांती देणं आवश्यक होतं. स्वारीवरून मिळवून आणलेल्या द्रव्याची योग्य व्यवस्था लावणं जरूर होतं आणि आतापावेतो संभाजीराजांनी शत्रूला थोपवून धरलं असलं, तरी महाराज परत आले त्या सुमारास परिस्थिती अधिक बिघडली होती. आपण मनसब देऊनही महाराजांनी ती संभाजीराजांसाठी स्वीकारली नाही याचा औरंगजेबास राग होता. त्याकरिता विजापूर-गोवळकोंडा यांच्या साहाय्याने स्वराज्यावर तुटून पडण्याचा त्याचा इरादा पक्का झाला होता. बहामनी राज्य नष्ट होऊन निर्माण झालेल्या आदिलशाही, निजामशाही वगैरे पाच मुस्लीम सत्ताधाऱ्यांनी, आपसातील मतभेद विसरून,



एकत्र येऊन विजयनगरचं बलाढ्य हिंदू राज्य बुडवलं, याचं येथे स्मरण व्हावं. विजापुरात वजीर खवासखान व बहलोलखान यांचं सख्य झालं होतं. खवासखानाची, मुघल सुभेदार बहादूरखान याच्याशी पक्की मित्रता होती. त्या दोघांनी विचार करून शिवाजी महाराजांच्या पारिपत्यासाठी खवासखानास पाठवण्याचं ठरविलं होतं. त्यासाठी औरंगजेबाने आदिलशहाकडून मिळणारा प्रतिवर्षाचा नजरेस ऐवज माफ केला होता व आदिलशहा सिकंदर पातशहास शाहा व खवासखानास नवानसखान असे किताबही दिले होते. हा गंभीर धोका निर्माण झाला असताना महाराजांना तर अधिक सैन्य उभारणीसाठी व शस्त्रास्त्रं निर्मितीसाठी सवड हवी होती आणि हे सर्व साधण्यासाठी दोन गोष्टी ताबडतोब करणं आवश्यक होतं.

अ) मोगलांना स्वराज्यावर हल्ला करण्यापासून शक्यतो थोपवणे आणि ब) मोगल व विजापूर यांच्यामध्ये वितुष्ट निर्माण करून मोगलांना विजापूर राज्यावर हल्ला करण्यास प्रवृत्त करणे आणि हे साधणे काही अलबत्या गलबत्याचे काम नव्हते. त्यासाठी शंभूराजासारखा मोहराच मुक्रर करावयास हवा होता. अनायासे त्यांचा दिलेरशी पत्रव्यवहार झाला होता. ते गेल्याने, मनसब त्यावेळी न स्वीकारल्याचा औरंगजेबाचा रागही मावळणार होता.

६) १६७८ एप्रिलमध्ये महाराज दक्षिण स्वारीवरून परतले ते प्रथम पन्हाळ्यालाच आले. त्यावेळी शंभूराजांनी प्रतिस्पर्ध्यांच्या तयारीचा हा सारा वृत्तान्त त्यांना कथन केला असला पाहिजे आणि त्याचवेळी संभाजीराजांनी बंडखोरीच्या मिषाने दिलेरकडे जाऊन वरील नमूद दोन हेतू साध्य करावेत असे ठरले असावे. महाराज त्यासाठी रायगडावर परतल्यावर योग्य वेळ सुचविणार असावेत आणि त्यांनी रायगडावरून कळवले ते कसे तर, 'प्रजेला अभय देऊन करवसुलीस प्रतिबंध करतोस, मंत्र्यांचा अपमान करतोस तरी तू शृंगारपूर सोडून सज्जनगडावर जा.' वास्तविक मंत्रिगणांनी काही तक्रार केली असल्यास दुसरी बाजू ऐकून घेतल्याशिवाय निर्णय करणारे शिवाजी महाराज नव्हते. पण हा एक इशारा असावा, सांकेतिक भाषेत दिलेला. सज्जनगडास जा म्हणजे प्रथम तिथे व मग तेथून दिलेरकडे आणि आज्ञाधारक शंभूराजांनी तो इशारा जाणून पुढील पावले उचलली व योजनापूर्वक ते दिलेरच्या गोटात गेले.

७) संभाजीराजे मोगलांना मिळाल्यानंतर ५ महिन्यांत स्वराज्यावर एकही स्वारी झाली नाही. एप्रिल १६७९ ला भूपाळगडची लढाई झाली तेवढीच.

संभाजीराजे ती टाळू शकले नाहीत पण त्यानंतर त्यांनी दिलेरच्या पन्हाळ्यावरील रोख बदलून त्याला विजापूरच्या भागाकडे वळवले. भूपाळगडच्या लढाईचे वेळी भीमसेन सक्सेना मोगलांबरोबर होता. त्याने लिहून ठेवलेल्या वृत्तान्तात, या लढाईचे वेळी शंभूराजे उपस्थित असल्याचा किंवा मराठ्यांचे हात तोडून भीषण कत्तल झाल्याचा उल्लेख नाही.

८) संभाजीराजे दिलेरखानाकडे ११ महिने राहिले; पण या ११ महिन्यात मोगलांना स्वराज्याचा कोणताही भाग घेता आला नाही. दिलेरने घेतलेला भूपाळगड मराठ्यांनी १५ दिवसांतच परत जिंकला.

९) संभाजीराजे दिलेरच्या छावणीतून पळून सरळ स्वराज्यात येऊ शकले असते, पण पाठोपाठ मोगलांची टोळधाड स्वराज्यावर धडकली असती आणि वर्षभर केलेला खटाटोप फुकट गेला असता, याची पूर्ण जाणीव असल्याने संभाजीराजे लष्करातून पळून विजापूरला प्रथम गेले. छत्रपतींनी विजापूरकरांशी तह केल्याची बातमी त्यांना होती. त्यामुळे प्रथम विजापुरात येऊन मग ते पन्हाळ्यावर आले.

१०) संभाजीराजे दिलेरखानाकडे आल्यानंतर दिलेरखानाने पादशहास अर्जदस्त लिहिली की, 'महाराज छत्रपती यांचे वडील पुत्र आम्हापासी आले आहेत. त्यांस पादशहांनी नावाजावे म्हणजे राजियातील दुयी होणार नाही. राजियांचे लष्कर असंच पुढोन येईल व किले कोट साधतील म्हणोन जाब लिहिला.' परंतु दिलेरखानाच्या डोक्यात जे आले नाही ते औरंगजेबाच्या ध्यानात आले. शिवाजी महाराजांच्या चातुर्याच्या राजकारणाचा औरंगजेबाने अनेक वेळा अनुभव घेतला होता. बऱ्याच वेळा फटकाही खाल्ला होता. तो हुशार व धूर्तही होता. दिलेरखानाच्या अर्जदास्तीवरून त्याने विचार केला की, 'महाराज छत्रपती यांचे पुत्र आले आहेत, त्यास नावाजीता पादशाई बुडवतील, त्यास नावाजू नये, त्याजला आणून कैदेत ठेवावे.' औरंगजेबाच्या या विचारावरून संभाजीराजे हे पादशाही बुडवण्यासाठी दिलेरखानाकडे गेले होते व ही बाब औरंगजेबाच्या लक्षात आली होती, हे स्पष्ट होते.

११) संभाजीराजे दिलेरकडून सुटका करून निघाल्यानंतर १ डिसेंबर १६७९ रोजी पन्हाळ्यावर दाखल झाले व थोरल्या महाराजांनी त्यांची भेट पन्हाळ्यावर १३-१-१६८० रोजी घेतली, पण ही भेट होण्यापूर्वीच संभाजीराजांनी स्वराज्याचा कारभार पाहण्यास सुरुवातही केली होती. फ्रेंचांच्या बोटी राजापूर बंदरात



नागरून पडल्या होत्या. संभाजीराजांनी फ्रेंच कंपनीस सौजन्य दाखवण्यासाठी काही खलाशी बोटीवर पाठविले. तेव्हा पूर्वीपासून फ्रेंच-मराठे यांच्यात चालू असलेल्या मैत्रीला पुन्हा उजाळा मिळेल, असे फ्रेंचांनी सांगितलं. म्हणजे संभाजीराजे पन्हाळ्यावर आल्यानंतर त्यांचे वागणे हे रोजच्या कारभाराच्या तरतुदीनुसार झालेले दिसते. मग राजे स्वतः रूसून दिलेरखानाकडे जाण्याचा प्रश्नच येतोच कोठे?

१२) जी व्यक्ती आपल्या शत्रूस मिळाली आहे, तिथे वर्षभर राहिली आहे, अशी व्यक्ती परत आल्यावर कोणता राजा आपल्या राज्यास ताळेबंद पूर्ण तपशील त्याच्यापुढे मांडेल? शिवाजी महाराज अत्यंत करारी, अशी घटना घडलीच असती तर महाराजांनी त्यांचा पूर्ण मुलाहिजा केल्याशिवाय त्याला सामील करून घेतलेच नसते, त्याला राज्याच्या गड-कोटांचा, खजिन्यांचा, सरदार-शिलेदारांचा, अठरा कारखान्यांचा आणि महालांचा तपशील सांगणे दूरच.

१३) या प्रसंगानंतर शिवाजी महाराजांनी जानेवारी १६८० मध्ये आपले बंधू राजेश्री व्यंकोजीराजे यांना एक विस्तृत पत्र पाठवले. त्यात महाराज लिहितात की, 'विचारे पाहता गनीम कट्टा, त्याहीमध्ये पठाण जाती, हट्टी, यागी हुन्नरेच करून खजील होऊन नामोहरम होय तो हुन्नर करावा, म्हणोन ऐशी तजवीज केली की, त्याचे मुलकात फौजांचा पैसावा करून ओढा लावावा.' यात दिलेरखानबरोबर हुन्नर केली अशी स्पष्ट कबुली महाराजांनी दिली आहे. या पत्रामध्ये काय हुन्नर केली याचा उल्लेख नसला तरी 'दिलेरखानाला खजील करण्यासाठी संभाजीराजांना दिलेरखानाकडे पाठवले.' हीच ती हुन्नर असावी, असे दिसते.

शिवाजी महाराज हे कुशलतेने राजकीय डाव खेळण्यात अतिशय वाकबगार होते यात शंकाच नाही. त्यांची मानवी मनाची पारख अप्रतिम होती हे त्यांच्या चरित्रातील अनेक प्रसंगावरून दिसून येते. हे राज्य व्हावे ही श्रींची इच्छा आहे, भवानीमातेने दृष्टांत देऊन काही सांगणे, शंभूराजांच्या आग्राहून परतीच्या प्रवासात, मोगलांचा धोका टळावा म्हणून संभाजीराजे वाटेतच मरण पावल्याची त्यांनी उठवलेली हूल व ती विश्वासार्ह वाटावी म्हणून त्यांनी पार पाडलेले त्यांचे मरणोत्तर विधी व अशा अनेक गोष्टी त्यांच्या कुशलतेचेच द्योतक आहेत. एवढेच कशाला, खुद्द शाईस्तेखानाच्या पुण्यातील गोटात शिरून त्यास जखमी करण्याचा धाडसी प्रयत्न त्यांनी जो केला तोही व्यवस्थित व्यूह

रचूनच. त्यांनी आपल्या एका सरदाराला, शाईस्तेखानास आपल्या पाचशे लोकांसह चाकरीत येतो म्हणून कळवण्यास सांगितले. राजांशी बेबनाव कशामुळे झाला त्याची पटण्यासारखी कारणेही सुचवली. त्याप्रमाणे त्या सरदाराने शाईस्तेखानास कळवल्यावर, शाईस्तेखानाचा त्याच्यावर विश्वास बसला. खुद्द राजांचा काही मुलूख, पूर्व संकेताप्रमाणे त्याने लुटून, आपल्यावरील खानाचा विश्वास पक्का केला व जेव्हा खानाने त्यास आपल्या पहारेकऱ्यांवरील मुख्य नेमले तेव्हा त्याने अमक्या रात्री आपण खानाच्या गोटावर पहारा करणार असल्याचे राजांना कळवले आणि मग राजांनी त्या रात्री खानाच्या गोटात प्रवेश केला व सरदाराने शाईस्तेखान कोण ते दाखवल्यावर तो जागे होऊन हत्यार घेण्यासाठी जात असता त्याच्यावर हल्ला करून त्यास जखमी केले. त्यातूनही तो पळाला पण त्याचा मुलगा ठार झाला. शाईस्तेखान मेला असं समजून राजे परत फिरले. (७–पृ.५१४) तेव्हा अशा राजकारण धुरंधर शिवाजी महाराजांनी संभाजीराजांना दिलेरखानाच्या गोटात एक राजकीय डाव रचून घुसवणे अशक्य नाही. महाराजांचे प्रत्येक राजकारण हे दूरगामी परिणाम करणारे होते. म्हणूनच की काय ९ मे १६७७ रोजी इंग्रजांनी नमूद करून ठेवले आहे की, 'शिवाजी महाराजांचे बेत वरवर दिसतात त्यापेक्षा दूरवर पोहोचणारे आहेत, अशी शंका येते. तेव्हा त्यांच्या हालचाली पाहून धोरण ठरवावे.' (३७)

पण मग संभाजीराजे आपणहून नाराजीने दिलेरखानकडे गेले असे सुचवणारी वाक्ये संभाजीराजांनी १६८० मध्ये दिलेल्या दानपत्रात आढळतात त्याचे काय? आपल्या बाकरे यांना दिलेल्या दानपत्रात खुद्द संभाजीराजे चक्क काय म्हणतात ते आधीच्या अ. नं. ८ येथे वरतीच आले आहे. शिवाय संभाजीराजे एक राजकीय डाव म्हणून थोरल्या महाराजांच्या सांगण्यावरून दिलेरकडे गेले असे मानले तर मग या जोखमीच्या व जीवावर बेतण्याची शक्यता असलेल्या कारवाईत संभाजीराजांनी आपली दुसरी पत्नी दुर्गा व जाधवरावांचे घरात दिलेल्या आपल्या एक भगिनी यांचेसह का जावे हे समजत नाही. ते आपणहून नाराजीने दिलेरला मिळाले असल्यास तशी शक्यता जास्त संभवते.

ooo



## ४. छत्रपती संभाजी महाराज व कवी कलश

छत्रपती संभाजी महाराजांच्या कार्यांशी व मरणाशीही जोडलेले एक महत्वाचे व वादग्रस्त नाव म्हणजे कवी कलश. कवी कलश हा कनोज ब्राह्मण, प्रयागजवळ राहणारा, काशी येथे भोसले कुळाचा क्षेत्रोपाध्याय होता. इ.स. १६६६ मध्ये शिवाजी महाराजांच्या आग्रा भेटीच्या वेळी शिवाजी महाराजांसोबत गेलेल्या परिवारात इतर पंडितांसोबत कवी कलश हाही होता. इतकेच नव्हे तर महाराजांनी आग्र्याहून पलायन केल्यानंतर त्यास कायस्थ सक्सेनासह काही काळ तुरुंगवासही भोगावा लागल्याचे राजस्थानी रेकॉर्डस्मधील परकलदासाच्या (मिर्झाराजे जयसिंहपुत्र रामसिंगचा सेवक) पत्रावरून दिसून येते. याचाच अर्थ तो व संभाजीराजे यांचे संबंध, संभाजीराजे छत्रपती झाल्यानंतरचे नसून त्या आधीपासून होते.

कवी कलश म्हणजे कवींमधील प्रमुख. हा मुळात एक श्रेष्ठ कवी व रसिक होता. कवीजीचा अपभ्रंश कबजी व कलुशा हे कलशचेच भ्रष्ट रूप. तो वेदशास्त्रसंपन्न होता, पण शाक्तपंथीय तांत्रिक होता. त्याचा सहवास लाभल्यामुळे संभाजीराजांनी काव्यनिर्मिती करून चार ग्रंथही लिहिले. तो श्रेष्ठ व शीघ्र कवी होता, याचे प्रत्यंतर त्याचे एकच चार ओळींचे काव्य जे उपलब्ध आहे त्यावरून येतो. बादशहाच्या आज्ञेने कवी कलश व संभाजी महाराज यांना दोरखंडांनी बांधून जेव्हा दरबारात पेश करण्यात आले तेव्हा संभाजी महाराजांना कैदी अवस्थेत प्रत्यक्ष सामने पाहून बादशहा आनंदित झाला व सिंहासनावरून खाली उतरून त्याने प्रार्थना केली व अल्लाचे आभार मानले. हे पाहून जखडलेल्या अवस्थेतही कवी कलशने संभाजी महाराजांना उद्देशून एक शीघ्र कविता केली. त्या कवितेचे शब्द असे आहेत–

**यावन रावन की सभा, संभू बंध्यो बजरंग।**
**लहू लासत सिंदूर सम, खूब खेल्यो रनरंग।**
**ज्यो रवि छवि लखत ही खद्योत होत बदरंग।**
**त्यो तुज तेज निहारी के तख्त तज्यो अवरंग।**

(अर्थ : रावणाच्या सभेत ज्याप्रमाणे हनुमानाला बांधून आणले होते त्याप्रमाणे संभाजीराजांस औरंगजेबासमोर (यावन) उपस्थित करण्यात आले. हनुमानाच्या अंगावर जसा शेंदूर शोभून दिसतो तसे घनघोर युद्धामध्ये रक्ताने अंग माखल्याने हे राजन, ते तुला शोभून दिसत आहे. ज्याप्रमाणे सूर्याला पाहताच काजव्याचा प्रकाश नाहीसा होतो त्याप्रमाणे तुझे तेज पाहून औरंगजेबाने आपल्या सिंहासनाचा त्याग केला आहे.)

कवी मनाच्या संभाजी महाराजांचे कवी कलश याच्याशी जे दृढ सूत जमले त्याच्या इतर कारणाबरोबरच, दोघांची संवेदनशील कवी मने हेही एक कारण असल्याने त्याचा येथे खास उल्लेख केला आहे.

कवी कलश नुसताच श्रेष्ठ कवी होता असे नव्हे तर प्रशासन व युद्धक्षेत्र यातही त्याने आपली कर्तबगारी दाखवली आहे. तो राजा रामसिंह, इंग्रज, पोर्तुगीज, शहाजादा अकबर व संभाजी महाराज यांच्यादरम्यान घडलेल्या राजकारणात वाटाघाटी करीत असे व या सर्व वाटाघाटी, तहनामे इत्यादी त्याने संभाजी महाराजांतर्फे अत्यंत प्रामाणिकपणे केल्या आहेत. कोठेही व कधीही त्याने बेईमानी केलेली नाही. यामुळे संभाजी महाराजांचा त्याच्यावर अधिकाधिक विश्वास बसत गेला. राज्यातील देशमुख-वतनदार नाराज झाले तर प्रत्यक्ष संभाजीराजांशी त्यांची भेट घडवून आणून त्यांचे समाधान करण्याचे त्याने प्रयत्न केलेले आहेत. वतनदारांची एकजूट करून सर्वांनी एकमताने मोगलांचे पारिपत्य करावे यासाठी त्याने संभाजी महाराजांतर्फे प्रामाणिक प्रयत्न केले आहेत. तो लष्करी पेशाचा नसूनही युद्धाच्या कामगिरीवरही गेलेला दिसतो. इ.स. १६८४ मध्ये मोगल अधिकारी शाबदीखान (शहाबुद्दीन) रायगडावर चालून जाण्यासाठी पुण्याहून निघून बोरघाटात उतरून गांगोलीस आला. त्यावेळी संभाजी महाराजांनी त्याला मुकाबल्यासाठी पाठवले होते व त्यानेही शाबदीखानाशी युद्ध करून त्यास परतून घाटावर पिटाळले होते. संभाजीराजांनी जुलै १६८५ मध्ये त्यास मोगलांविरुद्ध विजापूरकरांना मदत करण्यास सांगितले तेव्हा त्यानेच पन्हाळ्यावर जाऊन विजापूरकरांच्या मदतीस फौजा रवाना केल्या होत्या. संभाजी महाराजांच्या आश्रयास आलेला शहाजादा अकबर दि. १८ जाने. १६८५ रोजी महाराजांना लिहितो, 'महमदखान व खिदमदपरस्तखानाच्या पत्रांवरून मोगलांनी घातलेल्या छाप्यांबद्दल व त्यांचा निर्धाराने व धैर्याने कवी कलशाने केलेल्या प्रतिकाराबद्दल सर्व मजकूर विदित झाला. कवी कलश हा तुमचा फार चांगला व विश्वासू असा नोकर आहे. दरबारीयांच्या (सरकारकुनांच्या) हेव्यादाव्याने त्याचा कोणाकडून नाश ईश्वर होऊ न देवो, तुम्ही त्याच्या संरक्षणाची खबरदारी घेतली पाहिजे.' यावरून कवी कलशच्या कर्तृत्वाची छाप इतरांवरही पडत असल्याचे दिसते. (३-३९, पृ. १८१)

मोगलांनी बळजबरीने बाटवून मुसलमान केलेल्या गंगाधर रंगनाथ कुलकर्णी रा. कसबे हस्सूल, प्रांत औरंगाबाद यास पाच वर्षे मोगलांची चाकरी केल्यावर पुन्हा हिंदूधर्मात येण्याची जबर इच्छा झाली तेव्हा हा वृत्तान्त त्याने संभाजी महाराजांच्या कानी घालून आपल्या पुढाकाराने त्यास प्रायश्चित घ्यायला लावून व शुद्धिपत्र देऊन पुन्हा हिंदू धर्मातच नव्हे तर ब्राह्मण वर्णात समाविष्ट करून घेतले. संभाजी महाराजांनी कवी कलश यास १६८३ मध्ये कुलयेख्तियार (प्रशासनाचा प्रमुख) केले. छंदोगामात्य (वेद शास्त्रपंडित) असाही त्याचा १६८४ मध्ये केलेला उल्लेख सापडतो. त्याने धार्मिक बाबी व न्यायासंबंधी काही प्रकरणे हाताळल्याचेही दिसते. 'सर्व याचक लोकांची इच्छा पूर्ण करणारी राज्यव्यवहाराचे नियंत्रण करणारी आणि कार्यसिद्धीचा निधी असलेली अशी मुद्रा कलशाच्या हातात आहे.' अशा अर्थाची संस्कृतमधील त्याची मुद्राही असल्याचे दिसून येते.

शिवछत्रपतींच्या शेवटच्या काही वर्षांमध्ये त्यांच्या वारसांत दोन पक्ष निर्माण झाले होते. बहुतेक अनुभवी अष्टप्रधान (अर्थात सरसेनापती सोडून) सोयराबाई व राजाराम यांच्या पक्षाचे असल्यामुळे एकाकी पडलेल्या संभाजीराजांना प्रशासकीय कामासाठी विश्वासू मदतनीसाची गरज होती व ती कवी कलशने त्याच्या परीने भरून काढली. त्यामुळे कवी कलशच्या राजकीय उदयाला तत्कालीन सरकारकुनांची भूमिका मोठ्या प्रमाणावर कारणीभूत मानावी लागते.

थोरल्या महाराजांच्या कर्नाटक स्वारीच्या वेळी शृंगारपुरास वास्तव्य असताना संभाजीराजांनी कलीची उपासना सुरू केली व ता. २३-३-१६७८ रोजी

कलशाभिषेकही करून घेतला. याच पंथाच्या 'कलशा'शी त्यांचे जमते सूत; संभाजीराजे शृंगारपुरास जेथे राहात होते त्याच परिसरात शाक्त मानले प्रवीण असलेल्या कऱ्हाडे ब्राह्मणांची वस्ती ही जशी त्याची कारणे अशी शकतात तसेच सनातनी वैदिक धर्माचे कट्टर अनुयायी जे राज्याचे सरकारकून त्यांनी त्यांच्याविरुद्ध निष्कारण चारित्र्यहनन व बदनामी करण्याचे जे कारस्थान चालवले होते त्याचाही काही परिणाम असू शकतो. तथापि, ते या पंथाच्या फारसे आहारी गेल्याचे दिसून येत नाही. कारण राज्यावर आल्यानंतरची त्यांनी जी अनेक पत्रे उपलब्ध आहेत त्या पत्रांत कोठेही या पंथाच्या उपासनेबाबत किंवा शिवयोग्याबाबत उल्लेख आढळत नाही. (३-४२-पृ.८) कवी कलशाने संभाजी महाराजांची सेवा एकनिष्ठपणे अखेरपर्यंत करूनही त्याची महाराष्ट्रात जी बदनामी झाली त्याचे उत्तर कवी कलशाच्या तांत्रिक पंथाच्या उपासनेत मिळते. कवी कलश हा शाक्तपंथीय तांत्रिक ब्राह्मण होता. या शाक्तपंथाचे मूळ पीठ बंगालमध्ये असले तरी त्या विद्येचा प्रसार महाराष्ट्रातही विशेषतः दक्षिण कोकणात झालेला होता. शिवाजी महाराजांचा दुसऱ्यांदा राज्याभिषेक करणारा निश्चलपुरी गोसावी याच पंथाचा होता. या राज्याभिषेकाच्या प्रसंगातून महाराष्ट्रात वैदिक ब्राह्मण विरुद्ध तांत्रिक ब्राह्मण असा संघर्ष सुरू झाला होता आणि जेव्हा शाक्तपंथीय कवी कलशास संभाजी महाराजांनी आपल्या कारभाराचा प्रमुख म्हणून नेमले तेव्हा वैदिक धर्माच्या कडव्या अभिमानी सरकारकुनांनी त्याच्याशी वैर धरले. शिवाय पुढे सरकारकुनांनी अकबराच्या साहाय्याने खुद्द संभाजी महाराजांना विषप्रयोगाने ठार मारण्याचा प्रयत्न केला. त्यावेळी महाराजांनी काही सरकारकुनांना व अधिकाऱ्यांना ज्या देहांताच्या शिक्षा सुनावल्या व पुन्हा १६८८ मध्ये प्रल्हादपंतादींना कैद केले ते जेधे शकावलीच्या शब्दांत कलशाचे बोले झाल्यामुळे दुखावलेले बाकी सरकारकून व अधिकारी त्यांचे नातेवाईक व वारसदार यांचे मनात संभाजीराजे व कवी कलश यांच्याबाबत कायमची अढी निर्माण झाली. मुसलमान झालेल्या गंगाधर कुलकर्ण्याला पुन्हा हिंदूधर्मात व तेही ब्राह्मण वर्णात समाविष्ट करण्याच्या कवी कलशाच्या कारवाईचाही राग वैदिक ब्राह्मणांनी मनात धरला होताच. एक उत्तर भारतीय शाक्त ब्राह्मण महाराष्ट्रात येऊन छत्रपतींचा मुख्य सल्लागार बनतो ही गोष्टी वैदिक धर्माभिमानी सरकारकून व त्यांच्या समर्थकांना मानवणारी नव्हती.

कवी कलश हा मोगलांना फितूर होता व संभाजी महाराजांना पकडून देण्यात



त्याचा हात होता असे तत्कालीन इटालियन प्रवासी मनुची, तत्कालीन मोगल इतिहासकार ईश्वरदास नागर आणि रॉबर्ट ऑर्म यांनी नमूद केले आहे. मात्र, हे मत श्री. वा. सी. बेंद्रे व डॉ. कमल गोखले यांनी स्वीकारलेले नाही ते दोन कारणासाठी. पहिले कारण असे की औरंगजेबाने छत्रपती संभाजी महाराजांबरोबरच कवी कलशालाही ठार मारले व तत्कालीन मराठी साधनात कलशाच्या फितुरीचा उल्लेख नाही आणि हेच सत्य आहे. संभाजीराजांना पकडण्याचे काम पूर्ण झाल्यावर फितुरालाही सजा दिली नसेल कशावरून, असा प्रश्न विचारणारेही आहेत. पण संभाजीराजांची इमानीपणे नोकरी बजावताना, त्यांच्याबरोबरच कवी कलशने जे हौतात्म्य पत्करले त्याबद्दल राजाराम महाराजांनी कलशाच्या मुलास वतनाच्या सनदा करून दिल्याचे प्रसिद्ध संशोधक सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांनी दाखवून दिले आहे. तसेच पुढे येसूबाई राणीसाहेब औरंगजेबाच्या कैदेतून सुटून आल्यावर त्यांनी व शाहू महाराज यांनी संभाजी महाराजांचा जेथे वध झाला तेथे त्यांच्या धैर्याची, शौर्याची व स्वाभिमानाची स्मृती सतत जागृत ठेवण्यासाठी म्हणून जेव्हा तेथे वृंदावन बांधले तेव्हा कवी कलशने इमानीपणाने त्यांची केलेली सेवा स्मरून संभाजी महाराजांच्या वृंदावनाशेजारी त्यांचेही वृंदावन बांधले आहे. तेव्हा कवी कलशाच्या चरित्राचे वास्तव हेच आहे की, तो बेईमान व फितूर तर नव्हताच, पण संभाजी महाराजांचा एक महान एकनिष्ठ सेवक होता. (३-१६ व ३९)

OOO

## ५. छत्रपती संभाजी महाराज व शहाजादा अकबर

औरंगजेब बादशहाचा एक पराक्रमी मनसबदार, महाराज जसवंतसिंह राठोड हा मारवाडचा राजा. तो मोगलांतर्फे अफगाणिस्तानात मोहिमेवर असताना १० डिसेंबर १६७८ रोजी मरण पावला. तेव्हा त्याचा मुलगा अजितसिंह यास त्याची गादी मिळावयास हवी होती. पण औरंगजेबाने त्याचा हक्क नाकारला व मारवाड ताब्यात घेण्यासाठी व त्याचबरोबर संबंध राजस्थान आपल्या अंमलाखाली आणण्यासाठी मार्च १६८० मध्ये आपली प्रचंड फौज शहाजादा अकबर यांच्या नेतृत्वाखाली पाठवली. त्यामुळे जसवंतसिंहाच्या दिवाणाचा मुलगा दुर्गासिंह राठोड याने बाल अजितसिंह व त्याच्या मातेच्या संरक्षणाची जबाबदारी स्वतःकडे घेतली. तत्पूर्वी धर्मांध औरंगजेबाने उदेपूरला दूत पाठवून काही मागण्या केल्या. त्या लक्षणीय आहेत. उदेपूरच्या राण्याने मुस्लीम धर्म स्वीकारावा, त्याच्या राज्यातील काही मंदिरं पाडून टाकण्यात यावीत, तेथे शरियत कायद्याचा अंमल चालावा, काझीचा अधिकार मान्य व्हावा, हिंदू प्रजेवर जिझिया कर लादण्यात यावा, अशा त्या अन्यायी व धर्मवेड्या मागण्या होत्या. (३-४०-पृ.२०२) स्वाभिमानी राजपुतांना त्या मान्य होणं शक्य नसल्याने त्यांनी संघटित होऊन मोगल सैन्याचा प्रतिकार करायचं ठरवलं. या मोहिमेत अकबराला यश येईना. तेव्हा आपलं अपयश झाकण्यासाठी त्याने बापास राजपुतांशी मैत्री करावी, असं सुचवलं. इतकंच नव्हे तर त्याने बादशहाच्या परवानगीची वाट न पाहता गुप्तपणे बोलणीही सुरू केली. यावेळी दुर्गासिंह राठोड व रामसिंहाने धूर्तपणे अकबरास बापाविरुद्ध बंड पुकारण्यास सुचवून त्यासाठी सर्व राजपुतांचं सहाय्य देण्याचं आश्वासन दिलं. या आश्वासनावर विसंबून अकबराने ११ जानेवारी १६८१ रोजी स्वतः मोगल बादशहा झाल्याचं जाहीर करून, बापाविरुद्ध दिल्लीच्या तख्तासाठी बंड पुकारलं व स्वतःच्या



नावाची नाणीही पाडली. पण मुरब्बी औरंगजेबाने केवळ एका पत्राच्या सहाय्याने राजपूत व अकबर यांच्यात गैरसमज पसरवून ही युती फोडली. राजपूत अकबरास सोडून गेले, तेव्हा दुर्गादास राठोड व अकबर यांनी आपल्याकडील ४०० घोडेस्वारांसह संभाजी महाराजांच्या आश्रयास जाण्याचं ठरवलं. ९ मे १६८१ रोजी त्यांनी नर्मदा नदी ओलांडली व त्यानंतर दोनच दिवसांत आपल्या परिस्थितीचं वर्णन करणारं पत्र अकबराने संभाजी महाराजांना पाठवलं. संभाजी महाराजांनी त्यास उत्तर पाठवलं नाही. अकबराने पुन्हा दुसरं पत्र २० मे १६८१ रोजी संभाजी महाराजांना पाठवलं. संभाजी महाराजांचा आश्रय मागायला येताना खरं म्हणजे अकबराने मैत्रीच्या स्वरूपात पत्र लिहायला हवं होतं, पण त्याने ते स्वतः मोगल बादशहा असल्याच्या भूमिकेतून लिहिलं. स्वाभिमानी संभाजी महाराजांना हे आवडलं नाही व सैन्य नसलेल्या या नामधारी बादशहास त्यांनी आसरा देणं टाळण्याचं ठरवलं. त्यास आसरा देण्यातील धोकाही ते जाणत होते, असंच यावरून दिसून येतं. तथापि, कवी कलशाचा मराठी राज्यातील प्रभाव जाणून, अकबराने त्याच्यामार्फत प्रयत्न चालू ठेवले असावेत, असं दिसतं. कारण स्वराज्याच्या दृष्टीने अकबरापासून फायदा करून घेण्याचा सल्ला त्याने संभाजीराजांना दिला. परिणामी, संभाजी महाराजांनी अकबरास आपल्या राज्यात आश्रय दिला. औरंगजेबाच्या धर्मांधतेचा प्रत्यय आल्याने, उद्या राजपुताचं सहाय्य आपणास मिळेल व काट्यानेच काटा काढावा या न्यायाने बादशहाच्या धर्मवेडाचं प्रायश्चित्त त्याला त्याच्या मुलामार्फतच देता येईल या हिशेबाने, त्यातील धोक्याची जाण असूनही धाडसी स्वभावाच्या संभाजीराजांनी अकबराला आश्रय देण्याचा निर्णय पूर्ण विचारांतीच घेतला असावा, हे त्यांनी नंतर जयपूरला राजा रामसिंग याला लिहिलेल्या पत्रांवरून दिसून येतं. निर्णय घेताना इतरांची मतं अजमावून घ्यावीच लागतात व निर्णय मात्र स्वतःचा घ्यावा लागतो.

तथापि, त्यानंतरही बराच काळ संभाजी महाराजांनी अकबराची भेट घेतली नाही. त्यामागे काही संशयांचं निराकरण व्हावं, असाही हेतू असावा. मधल्या काळात अकबराला गोडी-गुलाबीत पत्रं पाठवून, सत्तेचं आमिष दाखवून त्यास आपल्याकडे परत येण्याविषयी औरंगजेब वरचेवर सुचवत होता. हेतू हा की, त्याची व संभाजी महाराजांची फाटाफूट व्हावी व त्याला पकडून ठार मारता यावं. शहाजादा अकबरानेही प्रथम बापाला नम्रपणे नकाराची पत्रं

पाठवली आणि त्याच्याकडून बराच पैसाही ओढला. पण शेवटी हे कुठेतरी थांबवावंच लागतं. एका पत्रात औरंगजेबाने शहाजाद्यास लिहिलं, 'मी तुमची येण्याची वाट पाहात आहे. सोबत सोने, नाणे, जडजवाहिर पाठवले आहे.' शहाजाद्याने यावर उत्तरादाखल लिहिलं, 'मी निश्चितपणे येईन, पण हातात तलवार घेऊन, तुम्हाला ठार करून हिंदुस्थानचं बादशाहीपद संपादन करण्यासाठी प्राणाची बाजी लावून येईन.' संभाजीराजांना शहाजाद्याच्या या उत्तराची बातमी लागली, तेव्हाच त्यांचा अकबराच्या हालचालीविषयीचा संशय दूर झाला. पुढे आण्णाजी दत्तो आदी सरकारकून व इतर अधिकाऱ्यांनी संभाजी महाराजांना अकबराच्या मदतीने विष घालून ठार मारण्याचा जो कट केला होता, त्यांची वाच्यता अकबरानेच संभाजीराजांपाशी केल्याने त्यांच्या त्याच्याविषयीच्या उरल्यासुरल्या संशयांचं पूर्ण निराकरण होऊन व त्याच्या उपकाराची परतफेड म्हणून संभाजी महाराजांनी अकबरास आश्रय देण्याचं धारिष्ट्य दाखवलं. मात्र, हे कळताच ८ सप्टेंबर १६८१ रोजी स्वतः औरंगजेब अफाट सैन्यानिशी अकबराला पकडण्यासाठी व संभाजीराजांना धडा शिकवण्यासाठी अजमेरहून दक्षिणेत येण्यास निघाला.

संभाजी महाराजांनी शहाजादा अकबरास आश्रय दिला, याबाबत इतिहासकार दोन्ही बाजूंनी बोलताना दिसतात. काहींच्या मते, संभाजी महाराजांनी त्याला आश्रय द्यायला नको होता. तो दिल्याने त्यांनी औरंगजेबाची स्वारी स्वतःच्या कठीण काळात स्वराज्यावर ओढवून घेतली. पण असा आश्रय दिला नसता, तर औरंगजेबाची स्वराज्यावर स्वारी झालीच नसती असं नाही. ती होणारच होती. फार तर ती इतक्या तडकाफडकी झाली नसती, इतकंच.

काहींच्या मते, संभाजी महाराजांनी, अकबराच्या रूपाने चालून आलेल्या नामी संधीचा कसबीपणे उपयोग करून घेतला नाही. ही टीका योग्य वाटत नाही; कारण संभाजी महाराजांनी जयपूरचा राजा रामसिंग याला पत्र पाठवून त्यात त्यांच्या पुढाकाराने अकबरास दिल्लीच्या तख्तावर नामधारी बादशहा म्हणून बसवावं व सत्ता हिंदूंनी राबवावी, अशी आपली कल्पना मांडली होती. अकबर उत्तरेत गेला तर औरंगजेबही उत्तरेत परतेल व जमलं तर खुद्द बादशहालाच कैद करावं, असाही संभाजीराजांचा मनसुबा होता. मात्र, या मनसुब्याला पाठिंबा देण्याऐवजी बादशहाला विरोध न करता त्यांचं सार्वभौमत्व मानावं, असा राजा रामसिंग याने सुरुवातीस सल्ला दिला. नंतर मात्र राजा रामसिंगाने



संभाजीराजांना पत्र लिहून, 'अकबराला तुम्ही आश्रय दिलात, ते योग्य केले. आपण सगळे हिंदू आहोत म्हणून या परिस्थितीत जे करणे योग्य आहे, असे तुम्हाला वाटते ते मी करण्यास तयार आहे.' असं कळवलं. या धाडसी मनसुब्याचं पुढे काहीच झालं नाही. तरीही यासंबंधात संभाजी महाराजांनी राजा रामसिंग यास जे सुरुवातीस पत्र धाडलं ते त्यांच्या धाडसी, आक्रमक व कल्पक दृष्टीवर चांगला प्रकाश पाडतं, यात शंका नाही. आपल्या पत्रात संभाजी महाराजांनी लिहिलं होतं... 'प्रजापालनाचा आमचा धर्म आम्ही टाळू शकत नाही. या दुष्ट यवनांशी युद्ध करण्यात आम्ही आमची संपत्ती, आमचा देश, आमचे दुर्ग, सारांश सर्व काही पणाला लावण्यास तयार आहो. या उद्देशाने आम्ही अकबर आणि दुर्गादास राठोड यांना आश्रय दिला आहे. आम्ही यवनाधिपतीच्या अनेक सेनानायकांचा वध केला. कित्येकांना कारागृहात टाकले, काहींना खंडणी घेऊ सोडून दिले... आता अशी वेळ आली आहे की, त्या यवनाधमाला (औरंगजेबाला) पकडून कारागृहात घालणे शक्य होईल मग आमच्या देवतांची पुन्हा स्थापना करून धर्मकृत्ये निर्विघ्नपणे पार पाडण्याची व्यवस्था करता येईल..' या पत्रात संभाजी महाराजांची जी गरूडझेप दिसते, ती लक्षणीय आहे. या मनसुब्याला उत्तरेतील पाठिंब्याच्या अभावाने मूर्तस्वरूप आलं नसावं. पण याबाबतीत हे लक्षात घेतलं पाहिजे की, आपल्या राज्याचं रक्षण करणं, हे संभाजी महाराजांचं आद्यकर्तव्य होतं. अकबराला दिल्लीचं तख्त मिळवून देणं हे नाही. संभाजी महाराजांचं औरंगजेबाच्या तुलनेतील जुजबी लष्करी सामर्थ्य, स्वराज्यावर त्यावेळी सर्व बाजूंनी होत असलेले शत्रूंचे हल्ले व त्यातून निर्माण झालेला स्वराज्याच्या अस्तित्वाचा प्रश्न, स्वराज्यातील सरकारकुनांच्या फुटीचं राजकारण, उत्तरेकडील राजपुतांचं सहकार्य मिळवण्यात प्रयत्नांतीही आलेलं अपयश व खुद्द शहाजादा अकबर याचं शहाणपण व सामर्थ्य या घटकांचाही योग्य विचार व्हायला हवा. (सुमार कर्तृत्व व बेसुमार महत्त्वाकांक्षा असं अकबराच्या स्वभावाचं वर्णन काही इतिहासकारांनी केलं आहे. श्री. बेंद्रे यांनी तर त्यास बालीश म्हटलं आहे.)

शेवटी प्रसिद्ध इतिहासकार श्री. स. मा. गर्गे म्हणतात त्याप्रमाणे, छत्रपती संभाजी व शाहजादा अकबर या दोघांनाही प्रतिकूल परिस्थितीने पुरेपूर घेरलं होतं आणि म्हणूनच दोघांचीही संधी हुकली असंच म्हणावं लागतं. (३४०-पृ.२०६)

शेवटी काहीही पदरात न पडता अकबराला १६८७ मध्ये राजापूर बंदरात, ४५ इसम बरोबर घेऊन, एका इंग्लिश जहाजाने हिंदुस्थानचा किनारा सोडावा लागला आणि प्रथम मस्कतला जाऊन, १४ जानेवारी १६८८ या दिवशी तो इस्पहान येथे पोहोचला. इराणचा बादशहा आब्बास याचा मुलगा शहा सुलेमान याने त्याचं स्वागत केलं आणि शेवटपर्यंत इराणमध्ये त्याला आश्रय दिला.

०००



# ६. छत्रपती संभाजी महाराजांचे प्रशासन

**अर्थव्यवस्था :**

संभाजी महाराजांच्या कारकिर्दीत सुरुवातीलाच मोगलांची प्रचंड स्वारी मराठी राज्यावर कोसळली. त्यातच औरंगजेबाने पोर्तुगीज, सिद्दी व इंग्रज यांनाही मराठी राज्यावर त्यांच्या त्यांच्या भागातून तुटून पडण्यास प्रोत्साहन दिलं होतं. अर्थात, स्वराज्याच्या भूमीतही युद्धक्षेत्र निर्माण झालं होतं. त्यामुळे सैन्यात वाढ करावी लागून लष्करी खर्चही मोठ्या प्रमाणात वाढला होता. त्यातच स्वराज्याच्या काही भागात १६८६-८७ च्या सुमारास दुष्काळाने थैमान घातलं होतं आणि त्यामुळे राज्याची आर्थिक घडी विस्कटली जाणं अपरिहार्य होतं. अशा कमालीच्या प्रतिकूल परिस्थितीत शिवाजी महाराजांनी मागे ठेवलेला समृद्ध खजिना त्यांच्या उपयोगाला आला, हे खरं असलं तरी संभाजी महाराजांच्या कारकिर्दीतील काटेकोर वसुलीही परिस्थिती सावरण्यास उपयुक्त ठरली.

त्या काळामध्ये महसूल क्षेत्र हे राज्याच्या उत्पन्नाचं मुख्य साधन होते. कारण शेती हाच मुख्य व्यवसाय होता. संभाजी महाराजांनी पडिक जमिनी लागवडीस आणण्यासाठी शेतकऱ्यांना उत्तेजन दिलेलं दिसून येतं. तद्वतच लागवडीखालील जमीन काही कारणासाठी पडिक राहात असल्याचं दिसलं, तर ते कारण दूर करण्यासाठी त्यांनी वैयक्तिक लक्ष पुरवल्याचीही उदाहरण दिसून येतात. शत्रूच्या धास्तीने त्रस्त झालेल्या वतनदारांना त्यांनी कौलनामे देऊन त्यांच्या पुनर्वसनासाठी प्रयत्न केले. संभाजी महाराजांनी महसूल वाढवल्यामुळे रयत गांजली होती, असे ग्रँट डफने म्हटलं आहे. त्याचा समाचार घेताना डॉ. प्र. न. देशपांडे म्हणतात की, हा आरोप चुकीचा आहे. त्याचं कारण असं की, शिवाजी महाराजांच्या कारकिर्दीच्या अखेरीस महत्तर सर्व कर कमी करून जो ४० टक्के सारा निश्चित करण्यात आला होता, त्यात संभाजी महाराजांनी

कोणताही बदल केला नाही. शिवाजी महाराजांनी व्यवसायादि इतर कर जे निश्चित केले होते, त्यातही त्यांनी बदल केला नव्हता. तथापि, इ.स.१६८४ मध्ये त्यांनी एक कर मात्र वाढवला आणि तो म्हणजे गुलामगिरीवरील कर तोही गुलामगिरीस आळा बसावा या स्पृहणीय उद्देशाने. (२४-२५८)

शिवकाली, शेतसाऱ्याखेरीज उत्पन्नाची अन्य साधनं म्हणजे परकीय मुलुखातील लूट व चौथाई वसुली आणि खंडणी. संभाजी महाराज व त्यांच्या लष्कराने बुऱ्हाणपूर, धरणगाव, जालना, बिदर, म्हैसूर आदी ठिकाणी छापे टाकून लूट जमा केली. चौथाई वसुलीसाठी संभाजी महाराजांनी स्वतः म्हैसूरसारख्या राज्यावर स्वारीही केली. एकूण राज्यकारभारात काही कमी पडू नये म्हणून राजांनी शिकस्तीचे प्रयत्न केल्याचं दिसून येतं. अनेक बाबतीत संभाजी महाराजांविषयी प्रतिकूल मत मांडणारे इतिहास संशोधक कै. शां. वि. आवळसकरही म्हणतात, 'शिवाजीचे पश्चात रायगडावरील राज्यव्यवस्थेच्या दृष्टीने संभाजीने सर्व काही सुरळीत चालवले. औरंगजेबाची स्वारी नसती तर फारसा उणेपणा दिसला नसता.' (३-२३-पृ. ३३२)

संभाजी महाराजांच्या मृत्यूनंतर परशुरामपंतांनी राज्याच्या एकूण शिलकीचा अंदाज घेतला, तेव्हा गडोगडी विपुल धान्य, धन, युद्धसामग्री संभाजी महाराजांनी साठवून ठेवल्याचं आढळलं. एकाच वेळी प्रबळ व अफाट मुघल सेनेशी तसंच पोर्तुगीज व सिद्दी यांच्याशी सतत युद्ध चालू असताना, त्यासाठी सैन्यसंख्या दुपटीपेक्षा अधिक वाढवली असताना शेवटपर्यंत संभाजी महाराजांनी आपला खजिना समृद्ध ठेवला, यात त्यांच्या आर्थिक नियोजन व एकूण प्रशासन कर्तृत्वावर प्रकाश पडतो. (३-१५-१५२)

**मुलकी व्यवस्था :**

संभाजी महाराजांचा मुलकी कारभार त्यांच्या पत्नी येसूबाई या सरबी राज्ञी सचिव अशा आपल्या स्वतंत्र शिक्क्याने चालवत असत. आपल्या प्रजेला काडीचीही इजा पोहोचता कामा नये, याबद्दल शिवाजी महाराजांप्रमाणेच संभाजी महाराजही काळजी घेत व त्यासाठी लहान-मोठ्या अधिकाऱ्यांना, वतनदारांना आणि आप्तस्वकीयांना वेळप्रसंगी कडक पत्रं लिहीत असत. त्या पत्रांमध्ये त्यांची वतन व वतनदार यांच्यासंबंधीची तीन पत्रं आहेत. त्यातील दोन पत्रांमध्ये राज्यातील वतनदारांना त्यांच्या वतनाबद्दल दिलासा देऊन मोगलांशी चालू असलेल्या युद्धात त्यांचं सहकार्य मिळवण्याचा प्रयत्न केलेला



दिसतो तर तिसऱ्या पत्रात शत्रूला मिळालेल्या वतनदारांसंबंधी कसं जरबेचं धोरण संभाजीराजांनी अवलंबलं होतं ते दिसून येत. (३-पृ.५१०) आपल्या कारकिर्दीतील अत्यंत धामधुमीच्या काळातही आपलं प्रजाहित धोरण राबवण्याचा त्यांनी प्रामाणिक प्रयत्न केला. शत्रूंच्या जाळपोळीत आपल्या प्रजेचं जे नुकसान होतं, ते भरपाई करून देण्याची स्वतंत्र पद्धत संभाजी महाराजांनी निर्माण केली होती. (३-१५-१५३)

**न्यायव्यवस्था :**

संभाजी महाराजांच्या अत्यंत धामधुमीच्या कारकिर्दीतही त्यांची न्यायव्यवस्था पूर्ण सक्षम होती व निर्भय आणि निर्भीडपणे न्यायनिवाडे होत असत. इ.स.१६८५ च्या आरंभी रायगडावर हाजीर मजालसीत एका चोरीच्या प्रकरणाचा न्यायनिवाडा करण्यात आला होता. या हाजीर मजालसीत स्वतः संभाजीराजे, पंतप्रधान निळोपंत, सेनापती हंबीरराव मोहिते, मुख्य न्यायाधीश प्रल्हाद निराजी आणि छंदोगामात्य कवी कलश सहभागी झाले होते. या निवाड्यावरून संभाजी महाराजांच्या कारकिर्दीत गुन्ह्यांची चौकशी किती बारकाईने केली जात असे आणि न्यायदान करताना साक्षीपत्रे आणि इतर पुरावे यांची किती काळजीपूर्वक छाननी होत असे याची कल्पना येते. (३-२४-२६७) रायगडावरून अनेक खटल्यांचे न्यायनिवाडे करीत असताना संभाजी महाराजांनी स्वतंत्र बुद्धीने निकाल दिलेले आढळतात, असं श्री. आवळसकरही म्हणतात. (३-२३-३३२)

**धार्मिक धोरण :**

संभाजी महाराज हिंदू धर्माचे अभिमानी होते, पण इतर धर्मांबाबतही त्यांचं धोरण उदार होतं. त्यांच्या लष्करात आणि आरमारात अनेक मुसलमान अधिकारी होते. त्यांचे अधिकारी इतर धर्मीयांच्या श्रद्धास्थानांचा आदर राखत. सर्व धर्मीय साधुसंतांविषयी त्यांना थोरल्या महाराजांसारखाच नितांत आदर होता. त्यांच्याप्रमाणेच संभाजी महाराजांनी देवालयं, मठ आदींना देणग्या दिलेल्या आढळतात. त्यांची देवस्थानांशी संबंधित काही पत्रं उपलब्ध आहेत. यावरून नुसती नजर टाकली, तरी संभाजी महाराजांच्या व्यक्तिमत्त्वाचं ओझरतं का होईना दर्शन जरूर घडतं. त्यामधून संभाजी महाराजांची धर्मनिष्ठा, सत्पुरुषांविषयीचा भक्तिभाव व आदर इत्यादी गुण दिसून येतात. शिवाजी महाराजांप्रमाणेच संभाजी महाराजांनीही रामदास स्वामी, त्यांचे शिष्य दिवाकर

गोसावी, मौनी महाराज, मोरेश्वर गोसावी, सदानंद गोसावी इत्यादी सत्पुरुषांविषयी श्रद्धा ठेवलेली आढळते. संत तुकारामांच्या देशोधडीस लावलेल्या कुटुंबातील त्यांचे पुत्र पुन्हा देहूस आल्यावर त्यांनी त्यांच्या उदरनिर्वाहाची व्यवस्था धान्य पुरवत जाऊन केली. जी त्यांच्या (संभाजीराजांच्या) मृत्यूनंतर पुन्हा बंद करण्यात आली. त्यांच्या एका पत्रातील उल्लेख, 'राजश्री आबासाहेबांचे संकल्पित आहे हे चालवावे हे आम्हास अगत्य' हा संभाजी महाराजांचा स्वभावधर्म व कारकिर्दीविषयी बरंच काही उदात्त सांगून जातो. (३-२४-२६९) त्यांचं धार्मिक धोरण स्पष्ट, सुबोध आणि प्रगत होतं. (३-२३-३४१) शिवाजी महाराजांनी हिंदू धर्मांतरितांना पुन्हा हिंदू करून घेण्याचा कार्यक्रम सुरू केला होता. संभाजी महाराजांनी या कार्यासाठी स्वतंत्र विभागच सुरू केला व हे कार्य मोठ्या प्रमाणावर वाढवलं. (३-१५-पृ.१५१)

**संरक्षण व्यवस्था :**

मराठ्यांच्या लष्करी कारभाराचा प्रमुख स्वतः राजा असे. संभाजी महाराजांची सैन्यव्यवस्था, शिवाजी महाराजांच्या शिरस्त्यानुसारच होती. त्यांच्याप्रमाणेच संभाजी महाराजांनी पाश्चात्य वखारवाल्यांकडून तोफा मिळवण्याचा प्रयत्न केला व १६८१ मध्ये फ्रेंचांकडून त्या मिळवल्याची माहिती मिळते. १६८२ मध्ये त्यांनी डिचोली आणि कुडाळ येथे दारूगोळ्याचे कारखानेही काढले. स्वराज्यातील महत्त्वाच्या किल्ल्यांवर पुरेसा दारूगोळा व शिबंदी ठेवण्यात त्यांनी थोरल्या महाराजांच्या पावलावर पाऊल टाकून अजिबात हयगय केली नाही. १६८८ मध्ये मुंबईकर इंग्रज लिहितात- मोगली सैन्य येणार म्हणून संभाजीने सर्व बुरुजांवर पुष्कळ तोफा तयार करून ठेवल्या आहेत. परंतु मोगल सैनिक त्याच्यावर चाल करून जायला धजावत नाहीत. (३-१५-पृ. १५१) इतकंच नव्हे, तर आपल्या अत्यंत धामधुमीच्या काळातही त्यांनी काही नवे किल्ले बांधले. फोंड्याजवळ मर्दनगड नावाचा किल्ला त्यांनी बांधला. साष्ट प्रदेशात खोलगड नावाचा किल्ला त्यांनी बांधण्यास प्रारंभ केला. पारसिक येथेही किल्ला बांधण्याचा त्यांचा प्रयत्न होता; परंतु पोर्तुगीजांनी तो यशस्वी होऊ दिला नाही. मुंबईजवळ एका खडकावर नवा किल्ला बांधण्याचा त्यांचा विचार होता. १६८२ मध्ये कारवारजवळ अंजदीव बेटात तटबंदी बांधण्यासाठीही त्यांनी प्रारंभ केला होता. डॉ.पिसुर्लेकर म्हणतात, 'हेंद्रीकेंद्री येथे मराठ्यांनी किल्ला बांधल्यापासून ज्याप्रमाणे पोर्तुगीजांच्या



चौलला उपद्रव होऊ लागला, तशीच परिस्थिती संभाजीने अंजदीव बेट ताब्यात घेतल्यास गोव्यास उत्पन्न होणार होती, हे लक्षात घेऊन पोर्तुगीजांनी हे कार्य होऊ दिलं नाही.' याशिवाय सिद्दी, पोर्तुगीज, मोगल यांच्याशी एकाच वेळी निरनिराळ्या आघाड्यांवर लढा देत असताना केवळ स्वराज्य बचावाचं धोरण न स्वीकारता त्यांनी उत्तरेतही मोगली प्रदेशात स्वाऱ्या करून मोगली अंमलाला हादरा देण्याचं कैक प्रयत्न केले. त्यामुळे मराठी राज्यातील आपले जवळजवळ पाऊण लाख सैनिक काढून घेऊन औरंगजेबाच्या उत्तरेत आपल्या प्रदेशाच्या संरक्षणासाठी पाठवावं लागलं. मोगल सरदार बहादूरखान याच्या पदरी असलेला गंगाराम गुजराथी हा बंड करून संभाजीराजांकडे आला असताना त्याला १०,००० सैन्य देऊन राजांनी बंगाल प्रांतात मोगलांविरुद्ध उठाव करण्यासाठी धाडल्याचा उल्लेख मिळतो. औरंगजेबाचा मुलगा अकबर आणि रजपूत सरदार दुर्गादास राठोड हे संभाजी महाराजांच्या आश्रयास आले होते. त्याचा फायदा घेऊन राजपुतांना आपल्याकडे ओढण्याचा संभाजीराजांचा प्रयत्न होता. रामसिंहाला त्यांनी लिहिलेल्या संस्कृत पत्रात त्यांच्या धोरणावर उत्तम प्रकाश पडतो. आपल्या पत्रात त्यांनी म्हटलं होतं की, औरंगजेब हा आपल्या संस्कृतीचा शत्रू आहे. त्याला पदच्युत करून अकबराला गादीवर बसवावं, पण रजपुतांकडून त्यांना प्रतिसाद न मिळाल्याने त्यांची योजना बारगळली. या सर्व सैनिकी हालचालीसाठी शिवकालीन साधारण दीड लाख लष्कर त्यांनी दुपटीनं वाढवलं.

शिवाजी महाराजांनी आरमाराची उभारणी करून पश्चिम किनाऱ्यावर दरारा निर्माण केला होता. तो संभाजीराजांनी आरमारात वाढ करून कायम राखला. राजापूरजवळ त्यांची ६० गलबते आणि गुराबे सज्ज असत. पेण येथे त्यांनी तीन हजाराचं आरमार सज्ज ठेवलं होतं. थल येथेही पाच हजाराचं नौदल होतं आणि मुंबईजवळच्या खाडीत १०० गलबतं तयार ठेवली होती, अशी माहिती पैर्तुगीजांच्या पत्रव्यवहारातून मिळते. यावरून संभाजी महाराजांच्या दूरदर्शी संरक्षण व्यवस्थेवर प्रकाश पडतो. (३-२४७-२६९)

ooo

## ७. छत्रपती संभाजी महाराजांचा शत्रूशी चौफेर मुकाबला

**मोगल :**

औरंगजेब बादशहा स्वतः मराठी राज्यावर चालून येण्यास अनेक कारणं होती. पहिली गोष्ट म्हणजे शिवाजी महाराजांसारखा कर्तबगार शत्रू आता मरण पावला होता. त्यांच्या जागी गादीवर आलेल्या संभाजीराजांना त्यांच्या सरकारकुनांचा पुरता पाठिंबा नव्हता. बादशहाला स्वतःला काबूलपासून कंदहारपर्यंत सर्व हिंदुस्थान आपल्या एकछत्री अंमलाखाली आणायची प्रथमपासून अभिलाषा होती व त्यासाठी दख्खनमधील मराठी राज्य व आदिलशाही, कुतुबशाही या शाह्या त्याला नेस्तनाबूत करायच्या होत्या. शिवाजी महाराजांनीच आपल्या हयातीत स्वराज्याबाहेर म्हणजे भीमेच्या दक्षिणेकडील प्रदेश आणि कोकण यांच्या बाहेर पडून केवळ मोगली मुलूख समजला जाणारा अर्धा बागलाण (नाशिक जिल्हा) आपल्या ताब्यात आणला होता व तेथून त्यांना हुसकावून लावण्यास त्यास आजवर यश आलं नव्हतं, ह्याचाही त्याला राग होता आणि या सर्वांत ज्या महत्त्वाच्या कारणाकरिता त्याला स्वतः दक्षिणेत उतरणं भाग पडलं. ते कारण म्हणजे त्याचा चौथा मुलगा शहाजादा अकबर याने त्याच्याविरुद्ध बंड केलं असता, त्याला संभाजी महाराजांनी आश्रय दिला होता. औरंगजेब बादशहाचे रजपुतांशी युद्ध सुरू असताना त्याच्या या आवडत्या पुत्राने रजपुतांशी सहकार्य करून त्यांच्या सहाय्याने स्वतःला बादशहा म्हणून जाहीर करून बापाशी उघड उघड शत्रूत्व स्वीकारलं होते. (१६ जाने. १६८१) पण औरंगजेबाच्या कपटनीतीसमोर हार खावी लागल्याने आपला जीव वाचवण्यासाठी त्याला आपला सहकारी, मारवाडचा दिवाण दुर्गासिंग राठोड यांच्यासह दक्षिणचा रस्ता धरून संभाजींच्या आश्रयाला यावं लागलं होतं. बलाढ्य बापासमोर केवळ मराठ्यांचा दिलदार व शूर असा हा राजाच आपल्याला आश्रय देण्यास समर्थ आहे, या भावनेनेच तो संभाजीराजांकडे



आला होता. संभाजींनी अकबराला आश्रय देणं म्हणजे चूड दाखवून वाघ घरात घेण्याचा प्रकार होता, याची संभाजीराजांना जाणीव होतीच. तरीही त्यांनी हे धारिष्ट्य दाखवलं. आपला एक बंडखोर पुत्र स्वतःला बादशहा म्हणून जाहीर करून मराठ्यांच्या आश्रयाला जावा आणि तेही बादशाही तक्त मिळवण्यासाठी आपण स्वतः जी नीती वापरली तीच नेमकी वापरून, ही बाब त्याच्या साम्राज्याच्या व वैयक्तिकरीत्या त्याच्या हिताच्या दृष्टीने मोठी गंभीर धोक्याची घटना त्याला वाटल्याने त्याचा क्रोध भडकला व त्याने तातडीने राजपुतांविरुद्धचं युद्ध आवरतं घेऊन दक्षिणेस मराठी राज्यावर चालून जाण्यास ५ सप्टेंबर १६८१ मध्ये अजमेरहून अफाट सैन्यासह कूच केलं. त्याआधी त्याने आपला दुसरा पुत्र शहाजादा आज्जम याला अकबराच्या पाठलागावर तातडीने ससैन्य पाठवलंच होते. पण एकट्या आज्जमच्या हातून हे कार्य पार पडणं कठीण वाटल्याने तो स्वतःही निघाला. (३-पृ.५६)

यापूर्वी औरंगजेब दिल्लीचा बादशहा या नात्याने स्वतः दक्षिणेत कधीच चालून आला नव्हता. त्याने शाईस्तेखान, मिर्झाराजे जयसिंह, जसवंतसिंह, बहादूरखान, दिलेरखान, शहाजादा मुअज्जम, दाऊदखान कुरेशी अशासारखे त्याचे सेनानीच फक्त पूर्वी धाडले होते. शिवाजी महाराजांच्या मृत्यूच्या वेळी मराठ्यांचं मोगलांशी युद्ध चालूच होतं. संभाजीराजे राज्यावर आल्यावर त्यांनीही हा संघर्ष चालूच ठेवला होता. औरंगजेब दक्षिणेत निघण्यापूर्वीच म्हणजे जाने. १६८१ मध्ये संभाजीराजांचे सेनापती हंबीरराव मोहिते यांनी बऱ्हाणपूरपासून सोलापूरपर्यंत आणि वऱ्हाड-खानदेशपासून निजामाबाद, आंध्रपर्यंतच्या सगळ्या दक्षिणेच्या विस्तीर्ण मोगली प्रदेशात लुटालूट, जाळपोळ यांचा एकच कहर उडवून दिला होता. विशेषतः संपत्तीचं माहेरघर असलेल्या व ज्याला विश्वरूपी सुंदरीच्या गालावरील तीळ संबोधण्यात येत होतं, त्या बुऱ्हाणपूर शहरावर तर असा गहजब केला की, थोरल्या महाराजांच्या सुरत लुटीची याद यावी. औरंगाबादही मराठ्यांच्या कचाट्यातून सुटलं नाही. बुऱ्हाणपूर ही खानदेशची राजधानी आणि औरंगाबाद हे मोगलांचं दक्षिणेतील ठाणं. त्यांची अशी दुर्दशा, दक्षिणचा मोगली सुभेदार खानजहान हजर असताना व्हावी, त्यावरून औरंगजेब समजून चुकला की, संभाजी हा शिवाजीचा मुलगा तर आहेच, पण त्याच्यापेक्षा सवाई आहे. मोगलांचा प्रसिद्ध इतिहासकार महंमद हाशिम खाफीखान म्हणतो, 'संभाजींच्या बापाने प्रसिद्ध परगणे व

सरकारी वाडे यावर छापे घालून लुटण्याची कधी कमतरता केली नाही; परंतु बादशहाची वंशपरंपरागत दख्खनची राजधानी जे बुऱ्हाणपूर व औरंगाबाद यावर कधीही छापा घातला नव्हता. उलट कोणी मंत्र्याने त्याला या शहरावर हल्ला करण्याचा सल्ला दिला, तर त्यांना तो शहाणपणाने व दूरदर्शीपणाने तसे करू देत नसे. तो त्यास सांगे की, या शहरांवर हल्ला चढवला तर औरंगजेब आपली मानहानी झाली असे समजून खासच चालून येईल आणि मग त्या भांडणाचे काय परिणाम होतील देव जाणे.' खाफीखानचं म्हणणं अगदी बरोबर होतं. बुऱ्हाणपूरच्या प्रतिष्ठित नागरिकांनी जेव्हा बादशहाकडे अर्ज पाठवला की, काफरांचा जोर झाला, आमची अब्रू व संपत्ती नष्ट झाली, तेव्हा औरंगजेबाने खानजहानला चिडून पत्र लिहून कळवलं की, दक्षिणच्या काफरांचा बीमोड करण्यास मी स्वतः येत आहे. (११-पृ.१९०)

औरंगजेब आणि संभाजीराजे यांच्यातील सामना अत्यंत विषम स्वरूपाचा होता. औरंगजेब म्हणजे त्रेपन्न पातशाहीचा धनी, सैन्यादी देशकोशाविषयी अद्वितीय, सुबुद्धिमान, किंबहुना पृथ्वीतलाच्या ठायी दिल्लीश्वरो व जगदीश्वरो वा अशी त्याची प्रख्यातस्था. असा त्याचा उल्लेख रामचंद्रपंतांनी केल्याचं आढळतं. त्याचं सैन्यबळ अफाट होतं. ॲबे कॅरे या प्रवाशाच्या मताप्रमाणे त्याच्याकडे तीन लाख घोडदळ व चार लाख पायदळ होतं. खुद्द बादशहाच्या छावणीत साठ हजार घोडेस्वार, एक लाख पायदळ, पन्नास हजार उंट, तीन हजार हत्ती असल्याची तो एके ठिकाणी नोंद करतो. त्याच्याबरोबर पुत्र आज्जम, मुअज्जम, कामबक्ष, नातू मुईजुद्दीन, बेदारबख्त व नातेवाईक आसद खान, झुल्फिकार खान, बईराम खान तसेच कडवे राजपूत सेनानी सवाई जयसिंह, दलपत बुंदेला, किशोरसिंह हाडा, शिवाय अमीर उमराव साडेचौदा हजार व प्रचंड तोफखाना होता. यासमयी त्याची एकंदर तयारी एवढी प्रचंड होती की, जणू काय हा आता पृथ्वी पादाक्रांत करणार, असाच सर्वत्र भ्रम झाला होता. याउलट संभाजी महाराजांचं सर्व सैन्य मिळून सेतु माधवराव पगडी यांच्या अंदाजाप्रमाणे तीस-चाळीस हजारांपेक्षा जास्त नव्हतं. काहींच्या मते, ते साधारण एक लाख घोडदळ व एक लाख पायदळ इतकं असावं. औरंगजेबाचं साम्राज्य अवाढव्य होतं. काबूलपासून बंगालपर्यंत व काश्मीरपासून दक्षिणेत भीमा नदीपर्यंत ते पसरलं होतं. याउलट मराठी राज्य त्याच्या एका सुभ्याएवढंसुद्धा नव्हतं. औरंगजेबाकडे ५०० वर्षांच्या इस्लामी राजवटीची परंपरा होती, तर



मराठी राज्य स्थापन होऊन केवळ सहा-सात वर्षेच झाली होती. औरंगजेब ६३ वर्षांचा अत्यंत अनुभवी मुत्सद्दी व चतूर सेनानायक होता, तर संभाजीराजे फक्त २४ वर्षांचे होते. औरंगजेबाची आणखी एक जमेची बाजू म्हणजे त्याची अवज्ञा करण्याची कोणाची प्राज्ञा नव्हती, मग फितुरीची गोष्टच अलाहिदा. तर संभाजीराजांना मंत्र्यांचा एकमुखी पाठिंबा नव्हता. ते राज्यावर येण्यापूर्वी त्यांच्याविरुद्ध कपट-कारस्थानं चालू होती. ते राज्यावर स्थिर होतात न होतात, तोच १६८१ च्या ऑगस्टमध्ये त्यांच्याविरुद्ध विषप्रयोग झाला व त्याच्या पुढच्या महिन्यात त्यांच्या मंत्रिमंडळातील धुरिणांनी अकबराशी संगनमत करून पुन्हा त्यांना ठार करून राजारामांना राज्यावर आणण्याचा कट केल्याचं अकबरानेच त्यांना कळवल्याने, आण्णाजी दत्तो, बाळाजी आवजी, हिरोजी फर्जंद या जुन्याजाणत्या मंत्री व ज्येष्ठांना त्यांना देहांत शासन द्यावं लागलं होतं. त्यातच या वेळी संभाजीराजे केवळ औरंगजेबाशी लढा द्यायला पूर्णपणे मोकळे नव्हते. औरंगजेबाच्याच चिथावणीने, त्याच्याच पक्षाच्या जंजिऱ्याच्या सिद्दीने रायगड जवळच्या मराठ्यांच्या मुलखात जाळपोळ, लुटालूट, माणसांची पळवापळवी व विक्री इत्यादी प्रकार सुरू केल्याने संभाजीराजांनी दंडाराजापुरीला वेढा टाकला होता व तिथे ते प्रत्यक्ष हजर राहून लढा देत होते. राज्याचा दुसरा शेजारी जो पोर्तुगीज, तोही बलाढ्य मोगलांच्या चिथावणीने मराठी राज्यावर घसरण्यास आतूर झाला होता व मोगलांना सर्व तऱ्हेचं सहाय्य करीत होता. फक्त संधिसाधू इंग्रज दोघांही सत्ताधाऱ्यांशी भांडण नको म्हणून थोडेफार अलिप्त राहिले होते.

अजमेरहून निघाल्यानंतर औरंगजेब बुऱ्हाणपूरला १३ नोव्हें. १६८१ रोजी पोहोचला. दक्षिण दरवाजा म्हणून इतिहासख्यात असलेली, भारत या प्राचीन देशाचे बरोबर दोन भाग करणारी बुऱ्हाणपूरची वेस ओलांडतानाच त्याचे पवित्र किताबे कुराण उठवून कसमच घेतली होती. 'कांजीवरम से काबूल तक ये बंदा यह कुफ्र मुल्क इस्लाम कर देगा।' (३-२२-३८६) तेथील दुर्दशा झालेली पाहून मात्र त्याने शाह अब्दुल लतीफच्या समाधीपाशी जाऊन इस्लामच्या शत्रूंचा नाश करण्यास सहाय्य मिळावं म्हणून करुणा भाकली. पुढे तो २२ मार्च १६८२ रोजी आपल्या फौजफाट्यासह औरंगाबादला पोहोचला. तत्पूर्वीच त्याच्या हुकुमाने मोगली फौजांनी मराठी राज्यावर अनेक बाजूंनी चढाई आरंभली होती. या सर्वच लढायांचा तपशील देणं शक्य

नसल्याने, त्यांच्यातील संघर्ष किती तीव्र होता व संभाजीराजांनी औरंगजेबाला कसं जेरीस आणलं होतं, त्याच आकलन व्हावं. म्हणून ४/२ लढ्यांचाच उल्लेख करणं सोयीस्कर होईल. तथापि, हे लक्षात घेणं जरूर आहे की, या लढ्यांबद्दल मराठी कागदपत्रांत फारच त्रोटक माहिती असल्याने मुख्यतः फारशी अखबारांवर अवलंबून राहावं लागतं आणि म्हणून त्यांवर पूर्णतः विसंबून राहता येत नाही. हे फारशी अखबार म्हणजे औरंगजेबाच्या सरदारांनी पाठवलेली बातमीपत्र आहेत. मोगली सरदारांचा पराभव झाला किंवा त्यांच्या हातून चुका झाल्या तर आलमगीर त्यांच्या मनसबी कमी करून त्यांना पदावन्नत करीत असे किंवा त्यांच्या बदल्या करीत असे. त्यामुळे या बातम्या पाठवताना ते आपला पराभव व चुका लपवून ठेवीत व जय झाल्यास बातमी अतिरंजित स्वरूपात देत. बादशहालाही त्यांची नंतर प्रचिती आल्याने तो त्यांवर एकदम विश्वास न ठेवता अनेक वेळा चिकित्सा करताना आढळतो.

औरंगाबादला पोहोचल्यावर औरंगजेबाने मुगली आक्रमणाची सूत्रं स्वतःच्या हातात घेतली. आल्या आल्या संभाजी महाराजांची परिणामकारक कोंडी करण्यासाठी त्यांचे किल्ले आधी जिंकणे आवश्यक वाटून त्याने आपला सेनापती शहाबुद्दीन फिरोजजंग याला रामसेजचा किल्ला जिंकण्यास रवाना केलं. किल्ले रामसेज नाशिकच्या उत्तरेला सात मैलांवर दिंडोरी तालुक्यात आहे. हा किल्ला जिंकायला फारसा कठीण नसल्याने तोच प्रथम जिंकून मराठी वाक्प्रचाराप्रमाणे भवानी करावी, असं त्याने ठरवलं. किल्ल्यावर मराठी शिबंदी ६०० आसामींपेक्षा जास्त नव्हती. ३५-४० हजार सैन्य, प्रचंड दारूगोळा, तोफखाना अशा तयारीनिशी शहाबुद्दीन रामसेजवर चालून गेला व त्याने रामसेजला वेढा घातला. (एप्रिल १६८२) त्याच्याबरोबर अनेक मातब्बर सरदार होते.

रामसेजचा मराठी किल्लेदार मोठा कल्पक, अनुभवी, शूर व कसलेला होता. इतिहासाला त्याचं नाव ज्ञात नाही, पण डॉ. कमल गोखले यांच्या अंदाजाप्रमाणे ते रंभाजी पवार असं असावं. (२-पृ.४८३) किल्ल्यावर भरपूर धनधान्य असलं तरी तोफा मात्र नव्हत्या आणि शहाबुद्दीनच्या तोफा रामसेजवर आग ओकू लागल्या. तरीही किल्लेदार घाबरला नाही. कसं काय माहीत नाही, पण उल्लेख केला जातो की, त्याने लाकडी तोफा बनवून घेतल्या व त्यातून किल्ल्यावर भरपूर असलेल्या कातड्यांचा उलट मारा अत्यंत परिणामकारकपणे



केला. त्याने शत्रूने पेरलेले सुरूंग नष्ट केले. रात्री-बेरात्री मोगली वेढ्यावर अचानक तुटून पडून कापाकापी करून वेळीच किल्ल्यावर परतण्याचं तंत्र-अवलंबलं. शहाबुद्दीनने पराक्रमाची पराकाष्ठा केली, किल्ल्याच्या तटबंदीवर परिणामकारक मारा करता यावा म्हणून किल्ल्यासमोरच टेकडीवर एक प्रचंड लाकडी दमदमा उभारून त्यावरून तोफांचा मारा सुरू केला. पण मराठ्यांनी आवेशाने प्रतिकार करून शहाबुद्दीनच्या आशेवर साफ बोळा फिरवला. चार आठवडे लोटले, तरी रामसेजवरील मराठी सैन्याचा आवेश चढत्या श्रेणीचा होता. त्यातच त्याच्या मदतीला शंभूराजांनी ५-७ हजार फौजेसह रूपाजी भोसले व मानाजी मोरे यांच्या हाताखाली कुमक धाडली. त्यांनी वेढा घालून बसलेल्या मोगली सैन्यावर असा जबरदस्त अचानक हल्ला केला की, शहाबुद्दीनला वेढा उठवून जुन्नरला पळून जावं लागलं. त्यानंतर औरंगजेबाने ताज्या दमाच्या बहाद्दरखानला किल्ला घेण्यास धाडलं. त्यानेही किल्ला सर करण्यास बराच आटापिटा केला. एका बाजूने हल्ला करण्याची हूल देऊन किल्ल्याच्या दुसऱ्या अंगाने काळोख्या रात्री किल्ला घेण्यास निवडक सैन्यास पाठवलं, पण किल्लेदाराने हा डाव आधीच ओळखून त्यात शत्रूला यश मिळू दिलं नाही. शेवटी एका मांत्रिकाच्या म्हणण्याप्रमाणे, १०० तोळ्यांचा सोन्याचा साप तयार करून पुढे घालून मांत्रिकाच्या मागून सैन्य धाडलं, पण त्याच्या छातीवर किल्ल्यावरून आलेला कवठाएवढा गोफण गुंडा आदळल्याने मांत्रिक पडला, त्याच्या हातातील साप बाजूस पडला व त्यामुळे उडालेल्या गोंधळात किल्ल्यावरील सैन्याची तुकडी त्यांच्यावर चालून येऊन त्यांनी बऱ्याच मोगल सैन्याला कापून काढलं. बाकीचे परत फिरले. बहाद्दरखानाची ही फजिती पाहून औरंगजेबाने त्याला परत बोलावलं. परतताना फजित पावल्याने निराश झालेल्या बहाद्दरखानाने आधी उभा केलेला प्रचंड लाकडी दमदमा जाळून टाकला. औरंगजेब काही कमी जिद्दी नव्हता. त्याने त्यानंतर आपला तडफदार सरदार कासीमखान किरमाणी याला रामसेजवर धाडलं. पण त्यालाही पाठ फिरवून, नामुष्की पदरात घेऊन खाल-मानेने परतावं लागलं. आपल्या सैनिकी बळावर संभाजीला हां हां म्हणता पराभूत करू, म्हणून मोठ्या उमेदीने आलेल्या औरंगजेबाला या अपयशानंतर कळून चुकलं की, संभाजींस जिंकता येणं आपणांस वाटत होतं तितकं सोपं नाही. संतापाने व निराशेने त्याने आपला किमांश (पगडी) उतरवला व पण केला की, आता या शंभूला पूर्ण पराजित

केल्याशिवाय पुन्हा तो डोईवर चढवणार नाही. आपल्या नावाजलेल्या सरदारांची रोज रोज होत असलेली फजिती ऐकून औरंगजेब इकडे संतापाने जळफळत होता. तर तिकडे शंभूराजे आपल्या शूर व कर्तव्यतत्पर किल्लेदाराचं कौतुक कसं करू आणि कसं नको, या विचाराने त्याचा सत्कार करण्यास आतूर झाले होते. त्यांनी ताबडतोब या किल्लेदारास खिलतीचा पोषाख, रत्नजडित सोन्याचे कडे व मोठी नगदी रक्कम पाठवून त्याची पाठ थोपटली. हा किल्लेदार रामसेजवर होता तोपर्यंत मोगलांना तो किल्ला घेता आला नाही. संभाजीराजांनी त्याची दुसऱ्या महत्त्वाच्या किल्ल्यावर बदली केल्यानंतर तेथे नेमले गेलेल्या किल्लेदाराला फितूर करूनच त्यांना तो घेता आला. तोवर मध्यंतरी पाच वर्षांचा काळ लोटला होता. यावरून लक्षात येते ती गोष्ट म्हणजे बलिष्ठ औरंगजेबाच्या हल्ल्यातही मराठ्यांचं टिकून राहिलेलं नीतीधैर्य. तसंच या किल्लेदाराला शेजारच्या त्रिंबक गडावरून होणारा धान्य पुरवठा व मोगलांना वेढा मोडून काढण्यासाठी रूपाजी भोसले व मानाजी मोरे यांच्या अधिपत्याखाली संभाजीराजांनी धाडलेली मदत या गोष्टी हेच दाखवतात की, राजांचं सावध लक्ष चौफेर होतं व आपल्या सैन्याला लागेल ती मदत देण्यात ते अत्यंत तत्पर होते. रामसेजच्या वेढ्यात मोगलांचा प्रसिद्ध इतिहासकार महम्मद हाशिम खाफीखान हा समक्ष हजर होता. मराठ्यांचा तो कट्टर शत्रू. शिवाजी महाराज, संभाजी महाराज व इतर मराठे यांच्याविषयी तो नेहमी निर्भत्सना करीतच लिहितो. पण त्यालाही मराठ्यांनी यावेळी दाखवलेल्या शौर्य-पराक्रमाच्या प्रतिकाराकडे दुर्लक्ष करता आलं नाही. उलट त्याने अनेक ठिकाणी त्यांची मुक्तकंठाने स्तुतीच केली आहे. तो म्हणतो, 'रामसेजचा किल्लेदार हा सर्व मराठ्यांत अत्यंत अनुभवी आणि कसलेला होता. त्याच्या प्रयत्नामुळे व सावधगिरीमुळे मोगल फौजेचे काही चालेना.' त्याच्या मते, संभाजी हे शिवाजीपेक्षा दहापटींनी अधिक तापदायक राजे होते. (३-३१-८७)

आदिलशहाकडून मराठ्यांना मिळणारी मदत रोखण्यासाठी बादशहाने दोन्ही राज्यांच्या सीमेवर शहाजादा आज्जम याची नेमणूक केली होती. (फेब्रु. १६८२) तेथून शहाजादा मराठी मुलखात मोहिमा काढू लागला. तेव्हा मराठ्यांनी बातमी काढून त्याच्या अनुपस्थितीत त्याच्या तळावरच हल्ला चढवून मोठी गडबड उडवून दिली.



नोव्हें. १६८२ मध्ये बादशहाच्या हुकुमाने रणमस्तखान हा सरदार घाट उतरून कल्याण-भिवंडीच्या प्रदेशात आला व कल्याणला त्याने छावणी केली. तेव्हा त्याच्यावर खुद्द संभाजी महाराजांनी हल्ला चढवून त्याची दाणादाण उडवली. शेवटी बादशहाला दुसरा सरदार रहुल्लाखान त्याच्या मदतीस पाठवावा लागला. (जाने. १६८३) रणमस्तखानाचा बचाव करून त्याने त्याला कसंबसं घाटावर आणलं. पण घाट चढत असताना मराठ्यांचे सेनानी रूपाजी भोसले यांनी मोगली बाजूकडील पद्मसिंग व इतर अनेक मोगल अधिकारी व बरेच सैन्य गारद केलं. याच सुमारास शहाजादा आज्जम आपली फौज घेऊन कोल्हापूरपर्यंत मराठी मुलखात शिरला. तेव्हा सरसेनापती हंबीरराव मोहिते यांनी प्रतिहल्ला करून त्यास परतून लावलं.

वयाची ज्येष्ठता, अनुभवाची विशालता, राजकारणातील नीती-अनीतीच्या पलीकडली अष्टपैलूपणा, साधनसामग्रीची विपुलता या प्रत्येक बाबतीत संभाजीराजांपेक्षा अनेकपटींनी औरंगजेब उजवा असूनही एका वर्षात जेव्हा त्याला त्याच्या चौफेर आक्रमणाचा काहीच परिणाम दिसेना व उलट अनेक ठिकाणी मराठेच त्याच्या सैन्याचा अडचणींच्या ठिकाणी गाठून फन्ना उडवू लागले, तेव्हा त्याच्या मनाची स्थिती भ्रमिष्टासारखी झाली. अकबर तर मराठ्यांच्या सहाय्याने उघडपणे त्याच्याशी लढत होता. वडील पुत्र शहाआलम मराठ्यांना मिळून आहे अशी वार्ता सर्वत्र उठली होती. कोणावर भरवसा ठेवावा व कोणावर नको, असं त्यास होऊन गेलं. मे महिन्यात तर असा काही काळ गेला की, स्वतःच्या जीविताचीही त्याला शाश्वती वाटेना. केव्हा मारेकरी येऊन आपला जीव घेतील, अशी धास्ती मनात बसल्याने त्याची झोप उडाली. मराठे म्हणजे केवळ सैतान होत, त्यांच्या पिशाच्च भूमीतून आपण कसंतरी निघून जावं, असाही त्याने अल्पकाळ विचार केला. परंतु मागे दक्षिणेत राहून संभाजीराजांपुढे पाय रोवून उभा राहण्यास कोणी तयार होईना. वडील पुत्राला त्याने ही कामगिरी अंगावर घेण्यास सुचवलं. तेव्हा तो म्हणाली की, अफगाणिस्तान अमीरखान आहे. त्याला इकडे बोलावून माझ्या हाताखाली द्या म्हणजे मी हे काम पत्करितो. एकूण काय, नकारच. कारण इतक्या दूरवरून बादशहा त्याला बोलावणे कठीण व बोलावलंच, तर अफगाणिस्तान हातचा जाणार, हे तो जाणत होता. त्याने बादशहास घोर विवंचनेत टाकलं. पाश्चात्यांच्या लेखात बादशहाच्या या मनःस्थितीचं उत्तम असं चित्रण आहे. ता. १९-६-

१६८३ च्या पत्रात सुरतेचा इंग्रज लिहितो, 'बादशहाचे चित्तास भ्रम झाला आहे. क्षणोक्षणी त्याचे मन बदलते... आता त्याचे डोळे मिटतील तरच निभाव आहे. नाहीतर काही तरी अपाय त्यास होणार खास.' त्यानंतर त्यांचे २ ऑक्टोबरचं पत्र म्हणतं की, बादशहा इतका चिडखोर बनला आहे की, कोणाचे काही ऐकून घेत नाही. औरंगजेबाच्या या मनःस्थितीचा विचार केला म्हणजे त्याच्या अफाट सामर्थ्याला आव्हान देणाऱ्या मराठ्यांनी त्याला किती हैराण केलं होतं, त्याची कल्पना येते. (२-२९७)

अशा एकूण परिस्थितीत युद्धाचा निकाल लागणार नाही. तेव्हा काही नवीन मार्ग ठरवण्यासाठी त्याने १६८३ च्या पावसाळ्यात आपल्या ठिकठिकाणच्या सर्व सेनानींना वाटाघाटींसाठी आपल्या जवळ-आणलं, पण ते तरी नवीन काय सुचवणार? मनुचीने सांगितलेली हकीकत म्हणजे साऱ्या दरबारी अधिकाऱ्यांना बादशहाने एकदा विचारलं की, 'काय हो काफरांच्या विरुद्ध लढताना प्राण अर्पण करणारा कोणी बादशहा तैमूरशहाच्या वेळेपासून आजपर्यंत होऊन गेला आहे का?' साऱ्यांनी कानावर हात ठेवल्यावर, बादशहा स्वतःच म्हणाला, 'मग तर ऐका! हा आलमगीर आता आपले प्राण अर्पण करणार! एक काफरांना गारद तरी करीन, नाहीतर रणांगणात देह ठेवून बेहस्ताची (स्वर्गाची) वाट धरीन!' (३-३२-पृ.२७९)

तथापि, प्रतिष्ठेपायी मराठी राज्य जिंकल्याशिवाय दिल्लीला परत फिरणं, बादशहाला शक्य नसल्याने त्याने पुन्हा कंबर कसली व मराठी राज्यावर निकराचे हल्ले सुरू केले. त्यापैकी शहाजादा मुअज्जमची दक्षिण कोकणातील मोहीम व शहाबुद्दीनखानची उत्तर कोकणातील मोहीम या दोन मोहिमा महत्त्वाच्या आहेत. शहाबुद्दीनने पुण्याच्या बाजूने उत्तर कोकणात उतरून, उत्तरेकडून दक्षिणकडे मुलूख जिंकत जायचं व शहाजादा मुअज्जमने बेळगावच्या बाजूने दक्षिण कोकणात उतरून दक्षिणेकडून उत्तरेकडे मुलूख काबीज करत जायचं व अशा प्रकारे दोन्ही फौजांनी सर्व कोकण जिंकून एकत्र यायचं. (सप्टेंबर १६८३) शहाजाद्याजवळ ४०,००० घोडदळ, १६,००० पायदळ, १९०० हत्ती व ६०० उंट इतकं सैन्यबळ असल्याची नोंद आहे. शहाजादा राजघाटमार्गे दक्षिण कोकणात उतरत असता, मराठ्यांनी त्याचा प्रतिकार केला. यावेळी संभाजी महाराजांची साष्ट व बारदेश या पोर्तुगीजांच्या प्रदेशात स्वारी चालू होती. बादशहाच्या कोकणातील या दोन्ही स्वाऱ्यांची बातमी लागताच, आपली



मोहीम आटोपती घेऊन ते रायगडावर बचावासाठी परतले व शहाजाद्याच्या फौजेशी गनिमीकाव्याने लढण्याचं काम त्यांनी कवी कलशावर सोपवलं. शहाबुद्दीन पुण्याहून कोकणात उतरला. पण तो येण्यापूर्वी संभाजी महाराज रायगडाकडे आल्याने तो कोकणात फारशी हालचाल करू शकला नाही. निजामपूर नावाचं एक खेडं जाळून तो बादशहाकडे परतला. तिकडे दक्षिण कोकणात मालवण, वेंगुर्ले, कुडाळ ही मराठी गावं शहाजाद्याने उद्ध्वस्त केली. पण मोगलांना रसद घेऊन येणारी जहाजं मधल्यामध्ये लुटून त्याच्या सैन्यात अन्नधान्याची टंचाई उत्पन्न करून मराठ्यांनी त्याला जेरीस आणलं. मोगल सैनिक उपाशी मरू लागल्याने घाटावर सुरक्षित जाण्याचा निर्णय शहाजाद्याने घेतला. या माघारीत उपासमार, रोगराई व मराठ्यांचे हल्ले यामुळे मोगली सैन्याचे अतोनात हाल झाले. हजारो सैनिक व जनावरं मरण पावली. फौजेतील माणसांपैकी जे मृत्यूच्या दाढेतून वाचले, त्यांना प्रत्येक श्वासागणिक वाटू लागलं की, मिळालं एवढं जीवन पुरं झालं. तबेल्यात स्वारीयोग्य असा एकही घोडा शिल्लक राहिला नाही. तेव्हा पायी रखडत, फजित पाऊन शहाजाद्याला जीवानिशी परतावं लागलं. त्याची दुर्दशा समजल्यावर बादशहाने रहुल्लाखान याला त्याच्या मदतीला पाठवलं म्हणूनच तो कसाबसा परतू शकला. अशाप्रकारे बादशहाने मराठी राज्यावर मोठ्या महत्त्वाकांक्षेने पाठवलेल्या दोन्ही मोहिमा अपयशी ठरल्या. स्वराज्यात घुसणाऱ्या अशा सर्वच मोगली फौजांना मराठे प्रतिकार करीत असतानाच. स्वराज्याबाहेरही मोगली मुलखात आपल्या फौजा धाडून संभाजीराजे कसा धुमाकूळ घालत होते, याची अनेक उदाहरणं मोगली इतिहासकार खाफीखान, साकी मुस्तैदखान व भीमसेन सक्सेना यांच्या इतिहास ग्रंथात पानापानांवर आढळतात. (३-पृ. ५८, ५९)

मराठी राज्यात यश येईना, तेव्हा प्रथम विजापूर व गोवळकोंडा या शाह्या पादाक्रांत करून, त्यांची मराठी राज्याला मिळणारी मदत थांबवून मगच सर्व शक्ती मराठ्यांवर केंद्रित करण्याचं ठरवून बादशहाने दक्षिणेतील या दोन शाह्यांकडे आपला मोर्चा वळवला. या दोन्ही शाह्या शिया पंथीय होत्या व बादशहा सुन्नी पंथाचा होता. वास्तविक सुन्नींचे साम्राज्य स्थापण्यासाठीही त्याला या शाह्या नाहीशा करायच्या होत्या. संभाजीराजांनी या दोन्ही शाह्यांशी हातमिळवणी करून औरंगजेबाविरुद्ध या दक्षिण भागाची फळी उभारली होती, हा भाग वेगळाच. १६८६ मध्ये विजापूर व १६८७ मध्ये गोवळकोंडा या शाह्या

नेस्तनाबूत करून मग त्या सहजी मिळालेल्या यशाने उत्साहित होऊन मोठ्या उमेदीने आपली सर्व शक्ती केंद्रित करून बादशहा १६८८ मध्ये मराठ्यांविरुद्ध आक्रमणासाठी उभा ठाकला. त्याच्या हुकुमाने मोगली फौजांनी स्वराज्याच्या सर्व भागात आघाडी उघडली. त्यामुळे एकट्या पडलेल्या मराठी राज्यावर प्रचंड दबाव निर्माण झाला. मराठी वतनदारांच्या मनात चलबिचल सुरू झाली. त्यांच्या निष्ठा डळमळू लागल्या. शिर्केही मोगलांना मिळाले. शिर्के व कवी कलश यांच्यादरम्यान वितुष्ट आलं. शिर्क्यांनी चाल केल्यामुळे कलश खेळणा किल्ल्यावर पळून गेला. कलशाच्या पराभवाची वार्ता कळताच संभाजी महाराज लगबगीने रायगडावरून खेळणा येथे आले व त्यांनी शिर्क्यांशी लढाई करून त्यांना पळवून लावलं. शिर्के यांना कलशाच्या विरोधात प्रल्हाद निराजी व इतर सरकारकुनांची साथ असावी, असं दिसतं. कारण डिसेंबर १६८८ मध्ये प्रल्हाद निराजी, सरकारकून व कित्येक लोकांना संभाजीराजांनी अटकेत ठेवल्याचं आढळलं. (संभाजीराजांच्या वधानंतर ते मोकळे झाले.)

स्वराज्यात अशा घडामोडी चालू असताना औरंगजेब बादशहाने आपला सरदार मुर्करबखान ऊर्फ शेख निजाम याला २५ हजाराची जंगी फौज देऊन कोल्हापूर भागात रवाना केलं. त्याला पन्हाळा जिंकायचा होता म्हणून त्याने कोल्हापुरात आपली छावणी ठेवली होती. त्याच सुमारास वरील नमूद संभाजीराजे व शिर्के यांचा झगडा होऊन आपला पराभव झाल्यावर शिर्के मुकर्रबखानाच्या छावणीत आश्रयास आले. इकडे औरंगजेबाला बातमी लागली की, संभाजी महाराज रायगड सोडून खेळण्याकडे आले आहेत. त्याने ताबडतोब वजिरामार्फत मुकर्रबखानास कळवले की, अशा परिस्थितीत संभाजींवर चालून जाऊन त्याला कैद करावं. मुकर्रबखानाच्या हेरांनीही त्याला बातमी दिली होती की, संभाजीराजे खेळण्याहून रायगडाकडे जाण्यास निघाले असून सध्या मार्गात संगमेश्वर येथे मुक्काम करून आहेत. मुकर्रबखान साहसी व युद्धनीतीमध्ये प्रवीण होता. पन्हाळा, खेळणा, मलकापूर इत्यादी ठिकाणी मराठी सैन्यांच्या लहान-मोठ्या तुकड्या असणारच, हे जाणून त्याने त्या मार्गाने न जाता सह्याद्रीच्या दऱ्याखोऱ्यांतून, घनदाट जंगलातून ४५ कोसांचे अंतर जलदीने व शत्रूला जराही पत्ता लागू न देता, २००० घोडदळ व १००० पायदळ बरोबर घेऊन पार पाडलं व तो अचानक संगमेश्वरला संभाजी महाराजांसमोर पोहोचला. संभाजीराजांना ही खबर मिळाली, तेव्हा उशीर झाला होता. त्यातूनही ते पळून



जाऊ शकले असते. पण त्यांनी आपल्या केवळ चार-पाचशे भालाईत स्वारांसह मुकर्रबखानाच्या सहापटीने अधिक असलेल्या सैन्याशी मुकाबला केला व त्यात ते पकडले गेले, एवढं थोडक्यात म्हणता येईल. संभाजीराजांचं बोचसं सैन्य कापलं गेलं. त्यात त्यांचे सरनोबत म्हालोजी घोरपडे पडले. म्हालोजींचे पुत्र पुढे नावारूपाला आलेले, संताजी घोरपडे व खंडो बल्लाळ सुखरूप पळून जाण्यात यशस्वी झाले.

### कर्नाटक

शिवाजी महाराजांनी ऑक्टोबर १६७६ मध्ये दक्षिण स्वारी केली. त्यावेळी जिंजी, बेलूर, तंजावर, कोलार, होसकोट, दोड्डबाळापूर हा प्रदेश त्यांनी जिंकून ताब्यात घेतला होता. आदिलशहाकडून शहाजीराजांना कर्नाटकात जी जहागीर मिळाली होती, तिथे शिवाजी महाराजांचे सावत्रभाऊ व्यंकोजी हे राहात होते. या भावानेही आपणाप्रमाणेच विजापूरकरांच्या नोकरीतून मुक्त होऊन स्वतंत्र राज्य करावं, अशी त्यांची इच्छा होती व महाराजांच्या दक्षिण स्वारीचा हाही एक उद्देश होता, पण तो साध्य झाला नाही.

शिवाजी महाराज मृत्यू पावल्यावर संभाजीराजांना त्यांच्या स्वतःच्या विरुद्ध चाललेल्या कारस्थानांना तसंच इतर शत्रूंशीही तोंड द्यावं लागलं. तरीही त्यांनी अत्यंत धोरणीपणाने कर्नाटकातील आपल्या प्रदेशाकडे जाणीवपूर्वक लक्ष ठेवलं होतं. तेथील सुभेदार रघुनाथ नारायण हणमंते यांचा हात संभाजीराजांच्या विरुद्ध १६८० च्या अखेरीस झालेल्या कटात असावा, अशा संशयाने त्यांना अटक केल्यावर त्या जागी आपल्या विश्वासू माणसाची नेमणूक करावी, या हेतूने त्यांनी आपला मेहुणा हरजीराजे महाडिक (शिवरायांची कन्या अंबिकाबाई यांचे पती) यांची नेमणूक केली व त्यांच्याबरोबर शामजी नाईक पुंडे यांना पाठवलं. यावेळी पश्चिम कर्नाटकात सर्वांत मोठं राज्य म्हणजे चिक्कदेवराय यांच्या अंमलाखालील म्हैसूरचं राज्य होतं. शिवाय बिदनूरला चेन्नम्माराणीने मुलगा बसवप्पाच्या नावाने चालवलेलं राज्य होतं. बिदनूर व संभाजीराजे यांचं सख्ख्य होतं. पूर्व कर्नाटकात चोकनाथाच्या अंमलाखालील मदुरा हे राज्य व व्यंकोजीच्या ताब्यातील तंजावर ही राज्यं व इतर लहानसहान पाळेगार किंवा नायकांची सत्तास्थानं होती.

संभाजीराजांच्या आज्ञेवरून हरजीराजे महाडिक, शामजी पुंडे, जैताजी काटकर आणि दादाजी काकडे हे सैन्यासह ११ मार्च ते ८ एप्रिल १६८१ च्या

दरम्यान कर्नाटकात जाण्यासाठी निघाले. संभाजीराजांवर झालेल्या विषप्रयोगात शामजी पुंडे याचा हात असल्याचा संशयावरून हरजीराजे महाडिक यांनी शामजीस ऑगस्ट १६८१ मध्ये संभाजीराजांच्या हुकुमावरून अटक केली; परंतु थोड्याच दिवसांत त्याला सोडून देण्यात आल्याचं दिसतं. स्वतः कर्नाटकात लक्ष घालावयास संभाजीराजांना वेळ नसल्याने त्यांनी हरजीराजांनाच कर्नाटकातील सर्वाधिकार सोपवले होते व तेथील सर्व अधिकाऱ्यांना हरजीराजांच्या आज्ञेत राहण्याची सूचना दिली होती.

जिंजीस पोहोचताच हरजीराजे यांनी आपल्या हालचालींना सुरुवात केली. त्यांनी म्हैसूरकरांशी असलेलं पूर्वीचंच धोरण चालू ठेवलं. तेथील पाळेगारांच्या आपापसातील दुहीचाही पूर्ण फायदा घ्यायचं त्यांनी ठरवलं. म्हैसूरच्या राजाचा सेनापती कुमारय्या याने चोकनाथाच्या मदुरेतील त्रिचनापल्लीच्या किल्ल्याला वेढा घातला होता म्हणून त्याने हरजीराजे व व्यंकोजी यांची मदत मागितली. हरजीराजे व व्यंकोजी यांनी कुमारय्याला हुसकून लावलं खरं, पण त्यांनी स्वतःच मदुरेच्या राज्यातील बराच मुलूख काबीज केला. हरजीराजे यांनी कुमारय्याला हुसकून लावलं तरी म्हैसूरकरांनी मरूवनाडांच्या सहाय्याने मदुरेच्या राज्यातील काही गड जिंकले होते व मदुरेची राजधानी त्रिचनापल्ली येथपर्यंत धडक मारली होती. त्रिचनापल्ली एकदा चिक्कदेवरायाने घेतली असती, तर मराठ्यांच्या राज्यातील जिंजी, तंजावर आदी भागांना धोका निर्माण झाला असता. संभाजीराजांना चिक्कदेवरायाच्या सामर्थ्याची जाणीव असल्याने व त्यांना उत्तरेतील मोगलांविरुद्ध दक्षिणेतील सत्ताधीशांच्या बरोबर एक फळी उभी करायची असल्याने त्यांनी स्वतः इक्केरीचा नायक व गोंवळकोड्याच्या सुलतानाचं सहाय्य मिळवून म्हैसूरवर स्वारी केली व त्रिचपनापल्लीच्या पश्चिमेला असलेल्या बाणावर येथे आपला तळ ठोकला. (जून १६८२) तेथे त्यांना व्यंकोजींचीही मदत मिळाली. पण या ठिकाणी चिक्कदेवरायाबरोबर झालेल्या संघर्षात संभाजी महाराजांना यश लाभलं नाही. तेव्हा त्यांनी म्हैसूरकरांना मदुरेच्या राज्यातून पूर्णपणे हाकलून देण्याचं ठरवून आपला तळ त्रिचनापल्लीला हलवला व त्रिचनापल्लीला निकराने वेढा घातला. आता चिक्कदेवरायाला औरंगजेबाची मदत मागण्यावाचून गत्यंतर नव्हतं. पण त्यांची मदत येईपर्यंत संभाजी महाराजांना तोंड देणं त्यांना जड जाऊ लागलं. संभाजीराजांनीही म्हैसूरकरांची पाठ सोडली नाही. त्यांनी तेघनापट्टण



व पोर्टो नोव्हो ही शहरे जिंकून घेतली. मदुरेच्या आजूबाजूच्या प्रदेशांतही लढाई करून काही गड घेतले, धर्मपुरीच्या भोवतालच्या प्रदेश हस्तगत केला व बाणावर येथील अपयशाचा वचपा त्रिचनापल्लीच्या लढाईत काढला. या सर्व हालचालींमुळे मदुरेच्या राज्यातील म्हैसूरकरांची सत्ता जवळजवळ नाहीशीही झाली. चिक्कदेवरायाला स्वतःच्या राज्यातही मराठ्यांविरुद्ध लढावं लागल्याने, मदुरेच्या राज्यात आपल्या सैन्यास कुमक पाठवणं जमेना व त्यांना माघार घ्यावी लागली. शेवटी त्याने संभाजी महाराजांशी तहाची बोलणी सुरू करून खंडणी देण्याचं कबूल केलं, तेव्हा १६८३ च्या सुरुवातीला संभाजीराजे महाराष्ट्रात परतले. म्हैसूरच्या राजाने मागितलेली मोगलांची मदत ऑगस्ट १६८४ मध्ये म्हैसूरला पोहोचली. मोगल व म्हैसूर यांच्या जोडसैन्याला तोंड देण्यासाठी मराठ्यांचे प्रयत्न चालूच होते.

१६८३ मध्ये झालेला तह चिक्कदेवरायाने पाळला नव्हता. खंडणीही दिली नव्हती. त्यामुळे संभाजीराजांनी १६८६ मध्ये पुन्हा म्हैसूर राज्यावर स्वारी केली व म्हैसूर राज्याचं केंद्रस्थान असलेल्या श्रीरंगपट्टणला वेढा घातला. हा वेढा चालू असतानाच मराठ्यांनी म्हैसूर राज्यातील प्रदेशही लुटला. औरंगजेब विजापूर जिंकून घेणार, अशी चिन्हं दिसू लागताच संभाजीराजांनी विजापूर राज्यातील गड काबीज करण्यास सुरुवात करून चिक्कदेवराय व औरंगजेब यांच्यावर आघाडी मारली. तथापि, औरंगजेब पन्हाळ्याला वेढा देईल या धास्तीने संभाजीराजे आपली कर्नाटक स्वारी अर्ध्यावर सोडून घाईने पुण्याला परतले. (संभाजी व चिक्कदेवराय यांचे संबंध सलोख्याचे असते तर मोगलांच्या दक्षिणेतील सत्तेस आळा बसला असता). १६८६ नंतर कर्नाटकात हरजीराजे महाडिक यांनाच प्रामुख्याने मोगलांविरुद्ध लढा द्यावा लागला. मोगलांनी विजापूरचं राज्य आधी जिंकलं व नंतर गोंवळकोंडा घेतल्यावर त्यांचं सैन्य कर्नाटकात मोठ्या संख्येने उतरू लागलं. आता मोगलांचा लढा महाराष्ट्रात तसंच कर्नाटकातही निकराचा होणार, हे स्पष्ट दिसू लागलं. संभाजीराजांना महाराष्ट्रातील स्वराज्य राखण्याबरोबरच दूरच्या कर्नाटकातील मराठ्यांच्या प्रदेशाचंही रक्षण करणं अगत्याचं होतं. त्यांनी प्रथमपासून कर्नाटकात लक्ष पुरवलं होतं. तेथील परिस्थितीही समक्ष पाहिली होती. तेव्हा मोगल व म्हैसूरकरांच्या विरुद्ध एकट्या हरजीराजांना तोंड देण्याचा बिकट प्रसंग येऊ नये, म्हणून संभाजीराजांनी ऑक्टोबर-नोव्हेंबर

१६८६ मध्ये केशव त्रिमल व संताजी घोरपडे यांना तिकडे जाण्याची आज्ञा केली. त्यानुसार फेब्रुवारी १६८७ मध्ये १२००० सैन्यासह ते दोघे कर्नाटकात पोहोचले. केशव त्रिमल कर्नाटकात पोहोचताच तो स्वतः मुख्य सुभेदार आहे, असं भासवू लागला. त्यामुळे तो व हरजीराजे महाडिक यांच्यात वितुष्ट आलं. मुळात केशव त्रिमलला सर्वाधिकार दिलेले नव्हते व त्याने हरजीराजांच्या अधिपत्याखाली वागावं असाच हुकूम होता, पण त्याच्यात वितुष्ट आलं. तरी एक गोष्ट चांगली होती, ती म्हणजे शत्रूबरोबर लढताना ते एक होत असत व दोघेही संभाजी महाराजांशी इमान राखून होते. गोवळकोंडा घेतल्यावर त्या राज्याचा जो भाग कर्नाटक राज्यात होता, तो घेण्यासाठी औरंगजेबाने मोगल सैन्य रवाना केलं. ते सैन्य एप्रिल १६८७ मध्ये कर्नाटक भागात पोहोचलं. त्यांनी कोडापिला हा महत्त्वाचा गड घेऊन लुटमार करीत तुमकूर, चिकनहळी, चंद्रगिरी, पेनुगोडा ही शहरं जिंकली. त्यांचा सेनानी कासिमखान याने बंगलोरही ताब्यात घेतलं व म्हैसूरच्या चिक्कदेवरायाला विकलं. बंगलोर नंतर कासिमखानाने तिकडील मराठी सत्तेचं केंद्रस्थान दोड्डबाळापूर घेतलं, असा मजकूर या शिलालेखात आहे. त्यानंतर जो मराठ्यांचा मुलूख कासिमखानाने जिंकला. तो त्याने चिक्कदेवरायाबरोबर विभागून घेतला. या आक्रमणामुळे सर्वत्र अंदाधुंदी माजली होती. मराठ्यांनी माघार घेत, हरजीराजे जिंजीजवळ आठ मैलांवर असलेल्या मात्येनूर येथे आणि संताजी घोरपडे तिरूवन्नमलाई येथे परतले, तर केशव त्रिमल जगदेवगडच्या परिसरात परतून सर्वजण मोगलांच्या प्रतिकारासाठी सज्ज राहिले. पूर्वीच्या गोवळकोंडा राज्यातील अनेक शहरं मराठ्यांनी घेतली, अर्काटला वेढा घातला व ते मोगलांकडून जिंकून घेतलं. मद्रासपासून सहा मैलांवर लुटीसाठी जाऊन त्यांनी सैदापेट लुटलं व कावेरी पाक येथील कापसाची व्यापारी पेठ जाळून टाकली. त्यांचं शहरं घेणं व लूट मिळवणं चालूच होतं. त्यांचं सैन्यबळही ते वाढवत होते. त्यामुळे औरंगजेबाने १६८८ च्या फेब्रुवारी महिन्यात महम्मद सादिक, याचप्पाखान नाईक यांच्या नेतृत्वाखाली ४००० घोडदळ आणि ७००० पायदळाच्या तुकड्या मराठ्यांच्या बंदोबस्तासाठी रवाना केल्या. अनेक ठिकाणी मराठे-मोगल संघर्ष घडत होता. कधी मराठे जिंकत तर कधी मोगल. कांजीवरम येथे मराठ्यांचा पराभव झाला तर तेथून बारा मैलांवर त्यांनी मोगलांचा पराभव केला. अशा तऱ्हेने जय-पराजयाचे अनुभव घेत १६८८ अखेरपर्यंत मोगल-मराठे लढा चालूच होता. जिंजी, अर्काट, सॅन थोमा आणि भोवतालचा प्रदेश मराठ्यांच्या ताब्यात होता.



संभाजी महाराजांच्या हृदयद्रावक मृत्यूच्या बातमीमुळे हरजीराजे खचलेच. आतापर्यंत ते परिस्थितीला खंबीरपणाने तोंड देत होते. त्यांचा २९-६-१६८९ रोजी मृत्यू झाला.

संभाजीराजांनी कर्नाटकाच्या बाबतीत शिवाजी महाराजांचंच धोरण चालू ठेवलं, याशिवाय हरजीराजे महाडिक, केशव त्रिमल, संताजी घोरपडे, दादाजी काकडे, जैताजी काटकर इत्यादी मंडळींना कर्नाटकात धाडून तेथील मुलूख सांभाळण्याची व्यवस्था केली. शिवाजी महाराजांनी जिंकलेला मुलूख त्यांनी सांभाळलाच व त्यात थोडीफार वाढही केली.

हरजीराजे महाडिक यांनी कर्नाटकाचा बंदोबस्त उत्तम केला. त्यांच्यासारखा दूरदर्शी आणि धोरणी मुत्सद्दी कर्नाटकात असल्यामुळे काही हिंदू पाळेगारांना चांगला लाभ होऊन मराठ्यांच्या प्रांताचं रक्षण झालं. त्यांच्यासारखा शहाणा व धूर्त मुत्सद्दी तेव्हा कर्नाटकात होता म्हणूनच जिंजीची मराठी सत्ता कायम राहिली आणि त्याचा पुढच्या काळात राजाराम महाराजांना चांगला फायदा झाला. (२-पृ.३३४) जिंजीची बळकटी आणि तेथील हरजीराजे महाडिक यांची नेमणूक या घटना संभाजीराजांच्या दूरदर्शीपणाचा साक्षच आहेत. १७०२ पर्यंत मराठे तामिळनाडूमधून हटले नव्हते आणि मोगलांशी झुंजत होते.. (३-८-पृ.११२)

**जंजिऱ्याचा सिद्दी :**

संभाजी महाराजांच्या कारकिर्दीत देशाच्या पश्चिम किनाऱ्यावर एथियोपियन वंशाच्या निग्रो जमातीतील सिद्दी, त्याचप्रमाणे इंग्रज व पोर्तुगीज यांच्या नाविक सत्ता होत्या. सिद्दी हा मोगलांच्या सेवेतील प्रभावी नाविक सत्ताधारी होता. औरंगजेबासारखा प्रबळ शत्रू स्वराज्यावर चालून आला असताना संभाजी महाराजांना यातील पोर्तुगीज व सिद्दी या नाविक सत्ताधीशांशीही संघर्ष करावा लागला. मुंबईकर इंग्रजांशीसुद्धा संभाजीराजांचे संघर्षांचे प्रसंग आले. पण त्यांच्यात प्रत्यक्ष युद्ध झालं नाही. त्यावेळी पश्चिम किनाऱ्यावरील सुरत हे व्यापारी बंदर मोगलांच्या राज्यात मोडत होतं. दमण, वसई प्रांत, साष्टी, ठाणे, चौल, रेवदंडा ही ठाणी तसेच वेंगुर्ल्याच्या खाली गोवा येथे पोर्तुगीजांचं राज्य होतं. मुंबई इंग्रजांकडे होती. कुलाबा (सध्याचा रायगड जिल्हा) येथपासून मालवणपर्यंतचे कोकण, रेवस, थळ, नागाव, खांदेरी बेट याशिवाय सिंधुदुर्गपर्यंत

अनेक किल्ले व बंदरं संभाजी महाराजांच्या राज्यात मोडत होती. जंजिरा, दंडाराजापुरी हे किल्ले आणि लगतचा किनारा व उंदेरी बेट सिद्यांच्या ताब्यात होतं. अशा किनारपट्टीवरील राजकीय पार्श्वभूमीवर संभाजी महाराजांच्या आरमारी हालचाली खांदेरी बेट आणि कुलाब्यापासून कारवारपर्यंतच्या किनाऱ्यावर झाल्या. मोगल-मराठा संघर्ष सुरू झाल्यावर औरंगजेबाची फूस मिळाल्याने त्यांचा आरमारी अधिकारी या नात्याने सिद्दीने आपल्या राज्यापासून रायगडापर्यंत संभाजीराजांच्या कारकिर्दीच्या सुरुवातीस स्वाऱ्या केल्या. त्याची गलबते पावसाळ्यात इंग्रजांच्या मजगाव बंदरात आश्रय घेत व तेथून कल्याण प्रांतात चोरट्या स्वाऱ्या करून संभाजीराजांच्या मुलुखास उपद्रव देत. मराठी मुलखातील खेडोपाडी लुटमार करून तेथील लोकांस पकडून नेऊन मुंबईत गुलाम म्हणून विकत. यास आळा बसावा म्हणून संभाजीराजांनी इंग्रजांना कळवून सिद्दीला त्यांच्या बंदरात आश्रय न देण्यासंबंधी तगादा लावला. सुरुवातीला इंग्रजांनी तसा बंदोबस्त न केल्याने, संभाजीराजांच्या सुभेदारांनी इंग्रजांची गलबतं अडवली. १६८१ च्या उन्हाळ्यात सिद्दी कासम व संभाजीराजांचा नौकाधीश दौलतखान यांच्यात कित्येक चकमकी झाल्या. नंतर १२ ऑक्टो. १६८१ च्या सुमारास इंग्रजांनी सिद्दीच्या गलबतांना आपल्या बंदरात आश्रय घेण्यास मज्जाव केल्यानंतर इंग्रजांची अडवलेली गलबतं संभाजीराजांचा नाविक अधिकारी सिद्दी मिसरी याने सोडून दिली. सिद्दी कासम ऑक्टो. १६८१ मध्ये मुंबईला आला असताना त्यांना लूटमार न करण्याच्या अटीवर तेथे राहू दिलं गेलं; परंतु ७ डिसें. १६८१ रोजी सिद्दीने संभाजीराजांच्या हद्दीतील नागोठाणे, आपटे गावात जाळपोळ केली. पनवेलपासन चौलपर्यंतच्या किनाऱ्यावरील मराठ्यांचा मुलूख त्याने उद्ध्वस्त केला. या प्रकारामुळे चीड येऊन संभाजीराजांनी सिद्दीच्या दंडाराजापुरीच्या किल्ल्याला साधारण ३/४ जानेवारी १६८२ रोजी वेढा दिला. सतत १५ दिवस तोफांचा मारा करून किल्ल्याच्या भिंती जमीनदोस्त करण्यात आल्या. पोर्तुगीजांनी या हल्ल्यात आपणास मदत करावी म्हणून संभाजीराजांनी त्यांना पत्र लिहिली. मदत केली नाही तर त्यांच्यावर कारवाई करण्याची धमकीही दिली. तरी पण पोर्तुगीजांची मदत मिळाली नाही, हेही नंतरच्या संभाजी-पोर्तुगीज संघर्षाचं एक कारण आहे. किल्ला उद्ध्वस्त झाल्यामुळे दंडाराजापुरी येथील सिद्यांचा प्रमुख सिद्दी खैरात याला पळून जाणं भाग पडलं. तथापि, सिद्दी तहास येत नाही तोपर्यंत तोफांच्या माऱ्याने किल्ला



साफ करायचा संभाजीराजांचा निश्चय होता. दंडाराजापुरी हा किल्ला खाडीच्या पाण्यात असल्याने आजूबाजूच्या पाणी, दलदल, पाणथळ या भागातून किल्ल्यास सैन्याची लगट करणे कठीण होतं. तथापि, हा किल्ला घेण्यासाठी संभाजी महाराजांनी आटोकाट प्रयत्न केले. किल्ला सर करण्याचा दुर्घट कामाला उत्तेजन देण्यासाठी त्यांनी आपल्या सैन्याला प्रत्येकी अर्धा शेर सोनं किंवा चांदीची कडी बक्षीस देऊ केली. सर्वात आधी त्यांनी खंडोजी फर्जंद नावाच्या आपल्या मर्जीतील एका इसमाला दंडाराजापुरीवर पाठवलं. संभाजींशी आपलं वैर आहे, असा बहाणा करून खंडोजीने सिद्दीची नोकरी पत्करली; परंतु खंडोजीचा कावा एका दासीच्या मार्फत सिद्दीला कळला. त्याबरोबर सिद्दीने खंडोजी व त्याचे साथीदार यांना पकडून ठार मारलं. दंडाराजापुरी घेण्यासाठी राजांनी किल्ल्याच्या आजूबाजूच्या दलदलीच्या व पाणथळ भागातून किल्ल्यावर चालून जाता येणं शक्य व्हावं म्हणून तो सर्व भागच भरून काढून पायवाट सिद्ध करण्याची तयारी चालवली. पण हे साध्य होण्याआधीच हसनअल्लीखान हा मोगलांचा अधिकारी कल्याणवर चालून आल्याची खबर मिळाल्याने त्याचा प्रतिकार करण्यासाठी या वेढ्याचं काम दादाजी रघुनाथ प्रभू यांच्यावर सोपवून संभाजीराजे तातडीने कल्याणला गेले. महाडचे देशपांडे दादाजी प्रभू पूर्वी बेलवडीच्या युद्धात प्रसिद्धीस आलेले होते व त्यांना पश्चिम किनाऱ्याची चांगली माहिती होती. संभाजीराजांनी त्यांना वचन दिलं की, तुम्ही सिद्दीचा पाडाव केल्यास तुम्हास अष्टप्रधानात एक पद देतो. पण त्यांनाही प्रयत्न करून यश न मिळाल्याने दादाजी प्रभू यांना पावसाळा सुरू होताच वेढा उठवून परतावं लागलं. त्यांचे दोनशे लोक सिद्दीच्या हातात पडले. लगेच सिद्दीने महाडपर्यंत दादाजींचा पाठलाग करून त्यांची बायकोही पळवली. पावसाळा संपल्यावर संभाजीराजांनी मजगाव येथे सिद्दीच्या आरमारावर हल्ला केला. त्यात त्यांना पराभव स्वीकारावा लागला आणि त्यांचा मुख्य नाविक सिद्दी मिसरी सिद्दीच्या हाती सापडला. या प्रकरणात संभाजीराजांना कळून आलं की, सिद्दीला मुख्य मदत गोव्याचे पोर्तुगीज करतात, ती बंद पाडल्याशिवाय सिद्दीचा पाडाव होणार नाही. तेव्हा त्यांनी सिद्दीवरील चढाई तूर्त थांबवून पोर्तुगीजांकडे लक्ष वळवलं.

## पोर्तुगीज

औरंगजेबाने संभाजीराजांवर सैन्य रवाना केल्याचा उल्लेख गोव्याच्या व्हिसेरेइने २४ जाने. १६८३ रोजी पोर्तुगालच्या राज्याला लिहिलेल्या पत्रात आढळतो. त्यात तो म्हणतो, 'मोगलांचे सैन्य शिवाजींच्या प्रदेशात तीन बाजूंनी शिरले आहे व मराठ्यांचे राज्य जिंकण्यासाठी सुरतेहूनही निघालेले मोगलांचं आरमार मुंबई बेटानजीक येऊन दाखल झाले आहे. त्यात असंख्य नौका आहेत व त्यातील बऱ्याचशा पुरवठा घेऊन आल्या आहेत.' या काळात पोर्तुगीज संधिसाधू राजकारण करीत होते. इकडे संभाजीराजांच्या कोकणातील सुभेदाराला पत्र लिहून व्हिसेरेइ असं सुचवत होता की, आपला मोगलांशी मैत्रीचा करार होण्याआधी मराठ्यांशी तसा करार झाला तर बरं आणि त्याचवेळी तिकडे त्याने संभाजीराजांच्या राज्यावर स्वारी करण्यासाठी आलेल्या मोगल सैन्याला आपल्या उत्तर कोकणातील प्रदेशातून वाट दिली होती व हरतऱ्हेने तो त्यांना मदत तर करीत होताच. पण त्याने त्याबदल्यात औरंगजेबाला पत्र लिहून आपल्या राज्यास उदार सवलती मिळतील, अशी आशा व्यक्त करून आपण (मोगल) जो प्रदेश कोकणात काबीज कराल, तो पोर्तुगीलला देऊन टाकावा, अशीही मागणी करीत होता. व्हिसेरेइला वाटत होते की, मोगल व मराठे यांच्या लढाईत संभाजीचा खात्रीने पराभव होईल, तेव्हा वाहत्या गंगेत हात धुऊन घेऊन मोगलांकडून दक्षिण कोकण मिळवावं. संबंध दक्षिण कोकणचा प्रदेश गोव्यास जोडणं हे पोर्तुगीजांचं फार जुनं उद्दिष्ट होतं व व्हिसेरेइ कोंदि द. आल्होर याचं धोरणही तेच होतं. पोर्तुगीजांच्या या विश्वासघातकी कृत्याचा राग येऊन तसंच मराठ्यांविरुद्ध जंजिऱ्याच्या सिद्दीलाही पोर्तुगीज मदत करीत असल्याचं दिसून आल्यावरून संभाजीराजांनी आपलं सैन्य पोर्तुगीज प्रदेशात घुसवलं. हा संघर्ष ता. २ जाने. १६८३ पासून जाने. १६८४ पर्यंत चालला. ठाणे जिल्ह्यातील डहाणू, असेरी, संजण व तारापूर या ठाण्यांवर मराठ्यांनी हल्ले चढवले. अनेक खेड्यांची जाळपोळ केली व काही नौका हस्तगत केल्या. १६८३ च्या जुलै महिन्यात संभाजीराजांनी आपलं काही सैन्य चौलकडे रवाना केलं व तेथील पोर्तुगीज ठाण्याला वेढा घालून तटबंदीवर अविरत हल्ले चढवले. पोर्तुगीजांकडून पश्चिम किनाऱ्याने मोगलांना सहाय्य होत असे ते रोखण्यासाठी राजांचा हा चौलवरील हल्ला होता. मराठ्यांचे हल्ले विफल व्हावे, म्हणून पोर्तुगीजांनी मेरी व्हर्जिन आणि सेंट



स्टिफन यांची करुणा भाकण्यास प्रारंभ केला. ठाण्याच्या कॅप्टनने तर सेंट अन्थनीची आळवणी करून त्याच्या चरणाजवळ साठ अश्रफी ठेवल्या. तटबंदीवर तोफा चढवून, पोर्तुगीज शिबंदीच्या सैन्याने वेढा घालून बसलेल्या मराठी सैनिकांवर मारा करूनही त्यांना मराठी सैन्याला हटवता आलं नाही. हा वेढा ढिला पडावा म्हणून पोर्तुगीज व्हिसेरेइने मराठ्यांच्या ताब्यातील फोंड्याच्या किल्ल्याला वेढा घातला. ता. ९ नोव्हें. १६८३ रोजी पोर्तुगीज सैन्य या किल्ल्यावर अखेरचा हल्ला करण्याची तयारी करताना संभाजीराजे राजापूरहून फोंड्याला तातडीने आले आणि पोर्तुगीजांच्या नजरेसमोर सुमारे ८०० स्वारांच्या संरक्षणाखाली आपले ६०० शिपाई त्यांनी किल्ल्यात घातले. तेव्हा मराठे पिछाडी मारून आपली परतीची वाट अडवतील म्हणून वेढा उठवून व्हिसेरेइ कोंदी द आल्होर याने गोव्यास परतण्याचं ठरवलं. पोर्तुगीज माघार घेत आहेत पाहून किल्ल्यातून काही मराठे सैनिक बाहेर पडून त्यांनी माघार घेणाऱ्या पोर्तुगीज सैन्यावर हल्ला चढवला. त्यावेळी झालेल्या हातघाईच्या लढाईचं वर्णन करताना व्हिसेरेइ म्हणतो की, शत्रूचे घोडेस्वार त्यांच्या घोड्यावर आडवे होऊन आमच्याशी लढले. त्यांची ही करामत खरोखर वाखाणण्यासारखी होती. या हातघाईच्या लढाईत खुद्द नामदार व्हिसेरेइ मृत्यूच्या दाढेतून दोनदा वाचला, तरीही जखमी झालाच. फोंड्याच्या या लाजिरवाण्या पराभवाने अपयश घेऊन तो ११ नोव्हें. १६८३ रोजी राजधानीला परतला व थेट जेसुइटच्या मठात जाऊन तब्बल चार दिवस तिथेच राहिला. १३ डिसेंबर रोजी व्हिसेरेइने एक जाहीरनामा काढला. त्यामध्ये म्हटलं होतं, 'पोर्तुगीजांचे नाव व ख्रिस्ती लोक गोव्यात शिल्लक ठेवणार नाही, असं शत्रू उघडपणे म्हणतो.'

फोंड्याच्या विजयानंतर माघारी रायगडला न जाता संभाजीराजांनी साष्टी व बारदेश या प्रांतांवर स्वारी करण्यास आपल्या सरदारांना हुकूम दिला. संभाजीराजांचं सैन्य जुवे बेटात ओहोटीची संधी साधून शिरलं व बेटावरील किल्ला त्यांनी काबीज केला. संभाजीराजांच्या सैन्याने जुवे बेट घेतल्याची बातमी गोवा शहरात पसरल्याबरोबर तिथे एकच धावपळ उडाली. कारण हे बेट गोवा शहराला लागून असल्याने मराठे गोवा शहरावर केव्हा हल्ला करतील त्याचा नेम नव्हता. तेव्हा व्हिसेरेइने गोवा शहराच्या संरक्षणासाठी काही फौज मागे ठेवून मराठ्यांना जुवे बेटावरून हुसकावण्यासाठी जुवे बेटावर आपल्या सैन्यानिशी तो चालून गेला. व्हिसेरेइने चाल केली खरी, पण त्याचवेळी

मराठ्यांना तीनशे स्वारांची कुमक आल्याने व्हिसेरेइने आपल्या सैन्याला माघार घेण्याचा हुकूम दिला. हा हुकूम निघण्याचाच अवकाश, भेदरलेल्या पोर्तुगीज सैन्याने धूम पलायनास सुरुवात केली. मराठ्यांच्या सैन्यातील घोडदळाने त्यांचा पाठलाग केला. यावेळी झालेल्या हातघाईच्या लढाईत दीडशे पोर्तुगीज सैनिक ठार झाले व अनेक जखमी झाले. व्हिसेरेइला एक गोळी लागून तोही जखमी झाला.

पोर्तुगीज सैन्य, ओहोटी असताना होड्यांनी आलं होतं, पण आता ते नदीकिनाऱ्यावर जाऊन पोहोचलं तेव्हा भरती असल्याने होड्या नदीच्या पात्रात आतमध्ये तरंगत होत्या. त्या गाठण्यासाठी त्यांच्यापर्यंत पोहत जाणं भाग होतं. ओहोटीपर्यंत थांबणं शक्य नव्हतं. कारण मराठे पाठलाग करीत होते. तेव्हा जीव बचावण्यासाठी पुष्कळांनी नदीत उड्या मारल्या. ज्यांना पोहता येत होतं, ते वाचले बाकीचे बुडून मेले. जे दलदलीत सापडले, त्यांना मराठ्यांनी कापून काढलं. व्हिसेरेइ व जनरल दो रुद्रिगु द कॉस्त हे दोघे मोठ्या मुश्किलीने वाचले. पळ काढणाऱ्या पोर्तुगीज सैन्याचा पाठलाग जातीने करताना संभाजी महाराज इतके बेभान झाले होते की, व्हिसेरेइची नौका पकडण्यासाठी त्यांनी आपला घोडा चढतीच्या पाण्यात घातला. तो पहुणीस लागणार असं दिसताच खंडोजी बल्लाळ याने प्रसंगावधान राखून घोड्याचा लगाम धरून त्यास मागे खेचल्यामुळे महाराजांवर काही गैर प्रकार गुदरला नाही.

जुवे बेटात पोर्तुगीजांची वाताहत झाल्याची वार्ता गोवा शहरात पसरली. हूल उठली की, व्हिसेरेइ व जनरल दोघेही मारले गेले. पण दोघांच्याही सुखरूप परत येण्याने दुसरा व्हिसेरेइ नेमण्याची पाळी आली नाही. या विजयानंतर संभाजीराजांनी त्याचवेळी गोवा शहरावर चालून जाण्याचं ठरविलं होतं. पण नदीला भरती आल्याने सैन्य पैलतीरी नेणं त्यावेळी लगेच शक्य झालं नाही. 'ते दिवशी गोवे घ्यावयाचेच; परंतु फिरग्यांचे दैव समुद्राने रक्षिले.' असे खंडो बल्लाळ चिटणीस यांची 'त्रोटक हकीकत' या पारसनीसकृत 'ऐतिहासिक स्फुट लेख' खंड ३ यात म्हटलं आहे. काही वेळ थांबल्यास नदीच्या पाण्याला ओहोटी लागून नदी पार करणं शक्य होतं. पण संभाजी महाराजांनी तो धोका पत्करला नाही. कारण एक तर त्यांच्याजवळ त्यावेळी स्वतःच्या आरमाराचं सहाय्य नसावं व अधिक वेळ थांबल्यास पोर्तुगीजांच्या प्रभावी आरमाराकडून घेरलं जाण्याचा धोका संभवत होता. इकडे गोव्यात मात्र सर्वत्र घबराट माजली



होती. पोर्तुगीज सैनिक मराठ्यांशी लढण्याच्या मनःस्थितीत नव्हतं. त्यामुळे व्हिसेरेइ पण गर्भगळीत झाला होता. त्याला काही सुचेना. तो सेंट झेवियरच्या चर्चकडे गेला. त्याच्यामागे लोकांचा मोठा घोळका होता. त्याने सेंट झेवियरची करुणा भाकली. नंतर सर्वजण मशाली पेटवून, सेंट झेवियरची शवपेटी ज्या तळघरात ठेवली होती तेथे गेले. त्यांनी शवपेटी उघडली. व्हिसेरेइने आपला राजदंड आणि इतर राजचिन्हे झेवियरच्या पायापाशी ठेवली. या राजचिन्हांबरोबर व्हिसेरेइच्या सहीचा एक कागद होता. त्या कागदात त्याने पोर्तुगालच्या राजाच्या तर्फे गोव्याचं राज्य सेंट झेवियरला अर्पण केल्याचं नमूद केलं व सेंट झेवियरने चमत्कार दाखवून शत्रूला माघारी परतवून लावावं, अशी याचना केली होती. व्हिसेरेइ मग सेंट झेवियरच्या डोक्याजवळ गेला व डोळ्यांत पाणी आणून त्याने त्याची करुणा भाकली. अनायासे संभाजीराजेही प्रत्यक्षात गोव्यावर चालून न आल्याने, तेव्हापासून सेंट झेवियर गोव्याचा रक्षणकर्ता (Patron Saint) म्हणून गणला जाऊ लागला व गोव्याला येणाऱ्या नवीन व्हिसेरेइने आल्या आल्या त्याच्या पायाशी राजदंड ठेवण्याची प्रथा पडली. (सन १९६१ मध्ये भारताने गोव्यावर स्वारी केली, तेव्हा असाच प्रयोग पोर्तुगीजांनी केला, पण यावेळी त्यांना सेंट झेवियर पावला नाही.) संभाजीराजांची स्वारी यावेळी झाली नाही. परंतु व्हिसेरेइने मराठ्यांची इतकी दहशत घेतली की, त्याने गोव्याची राजधानी मुरगाव बंदरात नेण्याचं ठरवलं. यदाकदाचित मराठ्यांनी गोवे घेतलंच, तर मुरगाव बंदरातून पळून जाणं शक्य व्हावं, म्हणून ही दक्षता घ्यायचं ठरवून राज्य सल्लागार समितीत त्याने तसा ठरावही पास करून घेतला. पोर्तुगीजांकडे गोव्यात चांगलं आरमार होतं. गोवे शहरास तट असून, जागोजागी त्यास गडगंज बुरूज आहेत. ह्या शहरामध्ये मोठा दारूखाना होता व नदीच्या मुखावर मुरगाव, आग्वाद, रेईजमागुश व काबूज यासारखे बळकट किल्लेही होते. असं असूनही व्हिसेरेइला मराठ्यांच्या भीतीने गोवे शहरातून राजधानी हलवण्याची गरज भासली. एका निनावी पोर्तुगीज वृत्तान्तात असं म्हटलं आहे की, जुवे येथे त्या दिवशी गोव्यातील ख्रिश्चनांची जी शोकांतिका घडली, तशी प्रकारचा लज्जास्पद पराभव ख्रिश्चन धर्मीयांच्या पूर्वेकडील प्रदेशांतून यापूर्वी कधीच झाला नव्हता.(३-३४-७०) याच सुमारास औरंगजेबाचा मुलगा शहाजादा शहाआलम याची मोठ्या सैन्यानिशी दक्षिण कोकणात स्वारी आल्याने, एकाच वेळी दोन्ही आघाड्यांवर तोंड देणे शक्य

नसल्याने संभाजीराजे पोर्तुगीजांशी तह करण्यास तयार झाले. तोवर पोर्तुगीजांच्या ताब्यातील एकूण प्रदेशाच्या जवळजवळ ३/४ भाग संभाजीराजांनी जिंकून घेतला होता. मोगलांच्या फौजेचा ससेमिरा मागे नसता तर त्याचवेळी त्यांनी पोर्तुगीज वसाहतीची इतेश्री केली असती. तथापि, राजे मोगलांशी लढण्यात अर्धेअधिक बुडाल्याने पोर्तुगीजांनी राजांच्या तहाच्या काही अटी मान्य करण्यास टाळाटाळ केली व मराठे-पोर्तुगीज संबंध ताणलेलाच राहिला. संभाजीराजांच्या वधानंतर त्यांच्यातील युद्ध जवळजवळ संपुष्टात आलं; परंतु संभाजीराजे जिवंत असताना पोर्तुगीजांनी त्याचा एवढा धसका घेतला होता की, ते त्यांना सार्वभौम राजा म्हणून मानत होते. त्यांच्या वकिलाला ते सार्वभौम राजाच्या वकिलाप्रमाणे वागवत असत. शिवाजी महाराजांना ते नुसते शिवाजीराजे म्हणून संबोधित तर संभाजीराजांच्या नावामागे छत्रपती ही बिरुदावली लावत. शिवाजी महाराजांच्या कारकिर्दीत त्याचे जे दूत गोव्यात जात असत, त्यांना सार्वभौम राजाच्या दूताप्रमाणे वागवण्यात येत नसे. तो मान मिळाला तो संभाजीराजांच्या दूतांना. हा त्यांचा दूत गोव्याला येण्यास निघाल्याचं नुसतं कळलं, तरी त्याला गोवा शहरी आणण्यासाठी सजवलेली खास नौका पाठवण्यात येई. गोवा शहरात त्याच्यासाठी घर बघून ठेवलं जाई. घराच्या खिडक्यांना व दारांना भारी किमतीच्या कापडाचे पडदे व खोल्यामध्ये उंची फर्निचर ठेवलं जाई. वकिलाला आणण्यासाठी कॅप्टनच्या दर्जाचा एक लष्करी अधिकारी आणि त्याचा मदतनीस, दूताचं स्वागत करण्यासाठी नौकेबरोबर असत व ती नौकाही मखमली कमान व रेशमी पडद्यांनी सजवलेली असे. संभाजीराजांचा वकील व्हिसेरेइला भेटण्यासाठी निघे तेव्हा त्याला नेण्यासाठी व्हिसेरेइचे दोन ए.डी.सी.घोड्यावर बसून येत. व्हिसेरेइच्या वाड्यावर वकील पोहोचला की, व्हिसेरेइ त्याच्या स्वागतासाठी बाहेर येई. दूत परत आपल्या राज्यात निघताना त्याला जलमार्गे जायचं असेल, तर खास नौकेने पाठवण्याची व्यवस्था करण्यात येई. त्याच्या सोबतीला व्हिसेरेइच्या इच्छेनुसार दोन ए.डी.सी. असत. राजदूतास खुष्कीच्या मार्गानं परतायचं असल्यास पोर्तुगीज हद्दीपर्यंत ए.डी.सी. जात. दुर्दैवाने मराठी कागदपत्रांत संभाजी महाराजांनी पोर्तुगीजांशी जो अभूतपूर्व लढा दिला, त्याची माहिती येत नाही. या लढ्यासंबंधी विपुल माहिती फिरंग्यांच्या साधनातून मिळते. (३-३४-७०)



संभाजीराजांनी स्वतःच्या तलवारीच्या बळावर पोर्तुगीजांना नरमाईचं धोरण स्वीकारावयास लावलं. ते जर आणखी काही वर्षे जगले असते, तर पोर्तुगीजांना ठाणे जिल्ह्यातून आणि गोव्यातून हद्दपार करण्यात ते यशस्वी झाले असते. (३-९-२८) आणि मग भारताला १९६१ मध्ये गोव्यावर स्वारी करण्याची जरुरी न भासता तो भाग त्याचवेळी मराठी राज्यात सामील झाला असता.

**इंग्रज**

दक्षिणेत स्वारीला उतरताना औरंगजेबाने पोर्तुगीज व सिद्दी यांच्याप्रमाणेच इंग्रजांनाही संभाजींवर तुटून पडण्याचे आदेश दिले होते. तरीही इंग्रजांनी संभाजीला डिवचण्याचं धोरण स्वीकारलं नाही. त्यांना त्यांच्या वरिष्ठांचा हुकूम होता की, कोणाशीही वैर उत्पन्न करू नये. संभाजीराजांनीही इंग्रजांची कुरापत काढून मोगल, पोर्तुगीज व सिद्दी यांच्याबरोबरच आणखी एका शत्रूची आपल्या विरोधात भर पडू नये, यासाठी इंग्रजांशी सांभाळून घेतलं, त्यांची इंग्रजांना एवढी विनंती होती की, सिद्दी व मोगलांच्या आरमारास मुंबई बंदरात थारा देऊ नये. यावेळी जिंजीनजीक शिवाजी महाराजांनी जिंकलेल्या प्रदेशात मद्रासस्थित इंग्रजांना काही वखारी घालावयाच्या होत्या, तो स्वार्थही संभाजीराजांशी चांगले संबंध ठेवून इंग्रजांना साधावयाचा होता. तो त्यांनी साधला व मराठ्यांशी उघड वैर करण्याच्या भरीस ते पडले नाहीत. अनायासे त्याचवेळी इंग्रजांच्या व्यवस्थेत जी बंडाळी उत्पन्न झाली, तीही संभाजीराजांच्या मदतीला आली. सन १६८३-८४ रिचर्ड केंग्वीन नावाचा एक इंग्रज गृहस्थ हिंदुस्थानात येऊन कंपनी विरुद्ध बंडावा करू लागला. मुंबई बेट इंग्लंडच्या राजाचं असून ते कंपनीच्या ताब्यात गेलं, हा प्रकार पुष्कळ इंग्रजांना आवडला नव्हता. केंग्वीनने त्यासाठी २७-१२-१६८३ रोजी कंपनीच्या अध्यक्षाला कैद करून मुंबईचा ताबा घेतला व सिद्दी व मोगल यांचं आरमार बिनहरकत मुंबईला येऊन उतरत नाही, हे अधिक कटाक्षाने पाहिलं आणि हे मराठी राज्याच्या हिताचंच होतं. केंग्वीनने सन १६८४ मध्ये आपला वकील संभाजीराजांकडे पाठवून दोन करार केले, ते दोन्ही राज्यांना फायदेशीर ठरले व पुढे पन्नास वर्षांपावेतो इंग्रज लोक मराठ्यांच्या वाटेला गेले नाहीत.

इंग्रज इकडे संभाजीराजांना न दुखवण्याचं व तिकडे त्याचवेळी मोगलांनाही खूश ठेवून आपण तटस्थ राहण्याची तारेवरची कसरत कशी करीत असत,

याची दोन उदाहरणं नमूद करण्यासारखी आहेत. मोगल सरदार हसन अलीखान याच्याजवळ तो कल्याण-भिवंडीकडे स्वारीस असताना पुरेसा दाणागोटा व दारूचा साठा नव्हता. म्हणून त्याने इंग्रज वखारवाल्यांना पत्र पाठवून त्याची मागणी केली. हसनअलीखान कल्याण येथे अधिक काळ राहणार असता, तर इंग्रजांना त्याच्या मागण्या पुऱ्या कराव्या लागल्या असत्या. संभाजीराजांना सुगावा लागू न देता इंग्रजांना ही मागणी पुरी करावी लागली असती. यासंबंधी सुरतकर २४/२/१६८२ रोजी कळवतात की, हसनअलीखानाच्या समाधानासाठी तुम्हाला देता येण्यासारखी जादा दारू व वस्तू रोख पैसे घेऊन द्या; परंतु त्या अगदी गुप्तपणे द्या. संभाजीला हा व्यवहार न समजेल अशी दक्षता घ्या. धान्यसामग्रीबाबत मात्र स्पष्ट सांगा की, ती आपल्याजवळ नाही. तथापि, या वस्तू मिळण्यापूर्वीच हसनअली खानास माघारी फिरावं लागल्याने इंग्रजांची अवघड परिस्थितीतून मुक्तता झाली. (२-पृ.२५४)

इंग्रज संभाजीराजांचं शत्रुत्व ओढवून घेण्यास तयार नसले, तरी दुसरीकडे मोगलांना नाखूश करणंही त्यांना शक्य नव्हतं, याचं आणखी एक उदाहरण म्हणजे कल्याण-भिवंडीच्या मोगल-मराठे संग्रामात, जहाजातून दाणागोटा आणण्यासाठी मोगलांनी इंग्रजांकडे परवानगी मागताच मुंबईकरांनी लंडनला ८/१/१६८३ च्या पत्राने कळवलं की, मोगल आरमारास आपण आपल्या बंदरात येऊ दिल्यास संभाजीराजा त्याबद्दल तीव्र नापसंती दाखवील व रागवेलही. त्याने याच कारणावरून पोर्तुगीजांना शत्रू लेखून त्यांच्या कित्येक होड्या जाळल्या. त्यांनी रणमस्तखानाच्या हाताखालील मोगल सैन्याला अन्नसामग्री पुरवल्यावरून संभाजीराजे त्यांच्यावर अत्यंत चिडून आहेत. हल्ली तर संभाजींची १०० गलबतं खाडीत आपल्यासमोर नांगरून आहेत. (२-२५७) संभाजी महाराजांनी इंग्रजांवर आपला कसा वचक ठेवला होता, याची यावरून कल्पना येते.

○○○



# ८. संभाजी महाराजांनी स्वराज्य रक्षणार्थ दिलेल्या संग्रामाचा परामर्श

१६८० ते १६८९ या नऊ वर्षांच्या काळात संभाजी महाराजांनी उत्तर महाराष्ट्रापासून दक्षिणेत कांजीवरमपर्यंत ५००० कि.मी.च्या टापूत आपल्या विरोधकांविरुद्ध जी झंझावाती मोहीम केली व सिद्दी तसेच पोर्तुगीज या सागरी सत्ताधीशांवर, कोकणपट्टी व गोवा प्रदेशात जी आक्रमणं केली त्याचं सविस्तर विश्लेषण केलं तर हे स्पष्ट दिसून येतं की, ते एक रणझुंजार युद्धनेता होते.

संभाजी महाराजांनी सर्वप्रथम आदिलशाही व कुतुबशाही या दक्षिणी शाह्यांशी आपली एकसंध आघाडी बनवून मोगलांविरुद्धच्या लढ्यात एकमेकांना आर्थिक सहाय्य व सैनिक मदत केली. इंग्रजांशीही त्यांनी जमवून घेतलं, पण सिद्दी हा मोगलांचाच सेवक असल्याने त्याच्याशी जमवून घेणं शक्य नव्हतं व पोर्तुगीजांनी दुटप्पी धोरण स्वीकारल्याचं पाहून त्यांना योग्य तो धडा शिकवण्याची त्यांना गरज भासली.

आपल्या उद्दिष्टांचा सातत्याने पाठपुरावा आणि आक्रमक पवित्रा, ही युद्धशास्त्राची दोन महत्त्वाची तत्त्वं, त्यांनी कधीही दृष्टीआड होऊ दिली नाहीत. उंदेरी बेट पहिल्या हल्ल्यात सिंद्याकडून हस्तगत करता आलं नाही, तरी उमेद न सोडता पुन्हा दुसरा हल्ला त्यांनी त्यावर केला. पण त्यातही यश मिळालं नाही, तेव्हा त्यांनी दुप्पट तयारीने स्वतःच दंडाराजापुरीवर हल्ला केला व तोही असा तुफान की, सिद्दीला जन्माची याद राहावी. या किल्ल्याच्या सर्व बाजूस खाडीचं पाणी असल्याने किल्ल्याच्या तटापर्यंत खुष्कीच्या मार्गाने आपली सेना भिडवण्यासाठी त्यांनी रामाने लंकेवर स्वारी करण्यासाठी जसा समुद्रावर सेतू बांधला म्हणतात तसा, खाडीत भर घालून सेतू बांधण्यास प्रारंभ केला. मोगल सेनापती हसनअलीखान कल्याण-भिंवडीवर चालून येत असल्याचं समजल्याने दादाजी रघुनाथ प्रभू यांच्यावर पुढील कामगिरील सोपवून त्यांना परतावं लागलं व त्या अंती ही मोहीम साध्य झाली नाही. पण कोणता शत्रू

आधी निवारला पाहिजे, याचंही भान सेनापतीस असावं लागतं, त्याचं गुणदर्शन संभाजीराजांच्या या निर्णयावरून दिसून येतं. असाच प्रसंग त्यांच्या गोव्यावरील चढाईच्या वेळी घडून आला. ही चढाई जारी असतानाच मोगल राजपुत्र शहाआलम दक्षिण कोकणात शिरल्याची बातमी आल्याने ही मोहीम आपल्या सहकाऱ्यावर सोपवून महत्त्वाचा प्रबळ शत्रूशी सामना करण्यासाठी ते स्वराज्यात परतले. ते दुसऱ्यांदा कर्नाटक स्वारीवर असतानासुद्धा मोगली हल्ला पन्हाळगडावर होईल, असं दिसताच त्यांनी लागोलग स्वराज्यात परतण्याची घाई केली. जी धडाडी संभाजी महाराजांनी सिद्दीविरुद्ध कारवाई करताना दाखवली, तशीच जिद्द त्यांनी पोर्तुगीजाविरुद्धच्या आक्रमणाच्या वेळीही दाखवली व त्यांचा जो काही दबदबा पोर्तुगीजांवर निर्माण झाला त्याचं सविस्तर वर्णन पोर्तुगीजांवरील लढाईच्या वर्णनात आलेलंच आहे. या निश्चयात्मक हालचाली म्हणजे अट्टहास नसून आपल्या उद्दिष्टपूर्तीसाठी निर्धारपूर्वक उचललेली ती पावलं होती, ज्यांची सैनिकी शास्त्रात आवश्यकता मानली जाते.

शत्रू नष्ट करण्याच्या अनेक मार्गापैकी शत्रूची चारी बाजूंनी कोंडी करून त्याच्या दळणवळणाचे मार्ग बंद पाडणे व रसद तोडणे, हा एक प्रमुख मार्ग असतो व तो गनिमीकाव्याच्या युद्धाचाच, ज्यास खच्चीकरणाची युद्धनीती असंही म्हणतात, त्याचाच एक भाग असतो. त्या दृष्टीने संभाजी महाराजांनी बेळगावजवळील रामघाट खिंडीतून दक्षिण कोकणात, सावंतवाडी परिसरात उतरलेल्या शहाजादा मुअज्जमच्या फौजेची व त्याचप्रमाणे महाड मार्गाने कल्याण-भिवंडीकडे येणाऱ्या हसनअलीखानाच्या फौजेची सर्व मार्गाने व विशेषतः सागरी मार्गाने सुरतवरून अन्नधान्य भरून येणाऱ्या गलबतेंची आपल्या नौसेनेमार्फत अडवणूक करून व मधल्यामधे ही कुमक लुटून जी दारुण अवस्था घडवून आणली, त्यावरून ही युद्धनीतीही संभाजीराजांनी जागोजाग वापरल्याचं दिसून येतं.

आपल्या एखाद्या ठिकाणावर शत्रूने जोर धरल्यास त्याचं लक्ष दुसरीकडे वेधण्यासाठी विरुद्ध दिशेला शत्रूच्या हद्दीत दुसरी आघाडी उघडणं, हेही एक गनिमीकाव्याचंच सूत्र आहे व संभाजी महाराजांनी ते यशस्वीपणे अनेक ठिकाणी वापरल्याचं दिसून येतं. अशा तऱ्हेने उत्तरेतही खुद्द मोगली प्रदेशात गंगाराम गुजराथी व इतरांमार्फत युद्ध आघाड्या उघडून मोगलांचे स्वराज्यात घुसलेले पाऊण लाख सैन्य संभाजी महाराजांनी कायमचं तिकडे गुंतवून



ठेवण्यास औरंगजेबास भाग पाडलं होतं. शत्रू सेना संख्येने प्रबळ असेल तर तिच्याशी आमनेसामने लढा न देता शक्य असेल तोपर्यंत प्रतिकार करून सुरक्षित जागी माघार घेणं, शत्रू सैन्यावर रात्री-बेरात्री अचानक हल्ले चढवून त्याला विस्मयचकित करून जमेल तेवढे शत्रू सैनिक कापून काढून व शत्रूच्या युद्ध साहित्यास नुकसान पोहोचवून, शत्रू एकत्रित होऊन लढा देण्यास तयार होण्याच्या आत पळून जाणं. कोणत्याही एका शत्रूच्या स्थानकावर मोठ्या गटाने हल्ला करण्यापेक्षा निरनिराळ्या शत्रू स्थानकांवर छोट्या छोट्या सैनिकी तुकड्यांनी सातत्याने छुपे हल्ले करून त्याला बेजार करणं इत्यादी गनिमीकाव्याच्या लढाईची अन्य सूत्रंदेखील संभाजी महाराजांनी जागोजागी उपयोगात आणली, असं दिसून येतं. औरंगाबाद येथे मराठ्यांचा हल्ला होत असताना चाळीस हजार सुसज्ज सेना घेऊन खान-इ-जहान औरंगाबादच्या रक्षणासाठी चालून येत आहे. ही बातमी लागताच मराठी सेनेने तेथून माघार घेतली, हे अशाच एका सूत्राचं पालन होतं.

अनेक लढायांत खुद्द संभाजी महाराजांनी जातीने हजर राहून आपल्या सैनिकांचं नेतृत्व केलं. सिद्दीच्या दंडाराजापुरीवरील हल्ल्यात, पोर्तुगीज हद्दीतील फोंडा व जुवे बेटावरील चढाईत तसंच कर्नाटकातील श्रीरंगपट्टणवरील संग्रामात त्यांचा प्रत्यक्ष भाग होता. अशा मार्गाने आपल्या सैन्याचं मनोधैर्य वाढतं व त्यांच्यात ईर्ष्या उत्पन्न होते, या सेनानायकाच्या भूमिकेचा त्यांनी विसर पडू दिला नाही. (३-४१-पृ. २४८)

आपल्या सैन्याच्या अनेक ठिकाणी चालू असलेल्या कारवायांवर सजग नजर ठेवून, त्यांना योग्य वेळी योग्य ती मदत पोहोचवणं, याकडेही संभाजी महाराजांनी कटाक्षाने लक्ष पुरवल्याचं दिसतं. रामसेजच्या किल्लेदारास त्रिंबक गडावरून रसद पुरवणं, रामसेजच्या किल्ल्यास वेढा घालून बसलेल्या शत्रू सैन्यावर रूपाजी भोसले व मानाजी मोरे या आपल्या सेनानायकांमार्फत पाच-सहा हजार फौजेनिशी अचानक हल्ला करवणं, कर्नाटकात हरजीराजे महाडिक एकटे पडत आहेत, असं दिसल्यावर त्यांना केशव त्रिमल व संताजी घोरपडे यांच्या ताबेदारीत बारा हजार सैन्याची कुमक पाठवणं, या गोष्टी संभाजीराजांच्या सर्वत्र विखुरलेल्या आपल्या सैन्यावरील सावध नजरेची ग्वाही देतात.

आपल्या सैनिकांच्या मर्दुमकीचं कौतुक करण्यासाठी व त्यांना प्रोत्साहन देण्यासाठी संभाजीराजांनी अनेकदा पावलं उचलली आहेत. त्यांनी रामसेजच्या

किल्लेदारास त्याच्या शौर्य व कर्तव्यनिष्ठेचं बक्षीस म्हणून खिलतीचा पोशाख, रत्नजडित सोन्याचं कडं व मोठी नगदी रक्कम बहाल केली. दंडाराजापुरीवरील हल्ल्यातही राजांनी जेव्हा पुढील कारवाई दादाजी प्रभू देशपांडे यांच्यावर सोपवून स्वराज्यात मोगली आक्रमणास तोंड देण्यासाठी परतावं लागलं, तेव्हा त्यांनी दादाजींना आश्वासन दिलं की, हा किल्ला त्यांनी जिंकून घेतल्यास त्यांना राज्याच्या अष्टप्रधान मंडळात स्थान देऊ. तसंच त्या वेढ्यात गुंतलेल्या सैनिकांनाही त्यांनी किल्ला सर केल्यास प्रत्येकी अर्धा शेर सोनं व चांदीची कडी बक्षीस देण्याचं आश्वासन दिलं होतं. हा सर्व वृत्तान्त संभाजी महाराजांच्या लष्करी कर्तृत्वाची साक्ष देतो. या कमालीच्या विषम लढ्यात संभाजी महाराजांनी कधीही निराशेचा सूर काढला नाही, ही गोष्टही त्यांच्या सैनिकांचं मानसिक बल उच्च प्रतीचं राखण्यास कारणीभूत ठरली.

मराठी राज्य जगणार की मरणार, असा गहन प्रश्न औरंगजेबाच्या स्वारीचं अफाट संकट स्वराज्यावर कोसळलं असताना जेव्हा निर्माण झाला, तेव्हा संभाजीराजांसारखा दमदार, बाणेदार व रणझुंजार युद्धनेता मराठ्यांना मिळाला, ही मराठी इतिहासाच्या दृष्टीने मोठी निर्णायक गोष्ट होती. अशा कसोटीच्या क्षणी संभाजीराजांच्या अंगी असणाऱ्या धैर्य, साहस, राजकारणात लागणारा कठोरपणा इत्यादी बळावर छोट्या मराठी राज्यावर घसरल्यावर ते आपण चुटकीसरशी धुळीस मिळवू, असा ठाम विश्वासाने आलेल्या औरंगजेबाचे बेत, चौफेर यशस्वी मुकाबला करून संभाजी महाराजांनी अक्षरशः मातीमोल केले. (३-८-पृ.१०४)

संभाजी महाराजांना कैद होईपर्यंत हिंदवी स्वराज्याचा कोणताही गड अथवा प्रदेश मोगलांच्या हाती पडला नव्हता. उलट उत्तरेकडील व दक्षिणेकडील मोगली प्रदेशच संभाजीराजांनी बळकावला होता. मोगली सैन्याचं आक्रमण कल्याण-पुणे भागात नेहमीप्रमाणे शिवकालापासून अयशस्वीपणे चालूच होतं. त्यात मोगलांना संपूर्ण यश कधीच मिळालं नव्हतं. (२७-पृ.२७) संभाजी महाराजांचा हा पराक्रम कोणत्याही मोजमापाने असामान्य कोटीतील होता, हे मान्यच करावं लागेल. शेवटी त्यांना घरभेद्यांच्या राजद्रोहामुळे अटक झाली, तरी जे देदीप्यमान व धीरोदत्त हौतात्म्य त्यांनी बाणेदारपणे स्वराज्यासाठी स्वीकारलं. त्यामुळे त्यांच्या निर्वाणानंतरही मराठी सेना एका धुंद अभिनिवेषात स्वराज्य रक्षणार्थ प्राणपणाने झगडत राहिली व २६ वर्षांत पुन्हा एकदाही



आग्रा, दिल्ली या आपल्या सत्ताकेंद्रांचं तोंडही पाहावयास न मिळता गाझी औरंगजेबास मराठी राज्याला तर धुळीस मिळवता आलं नाहीच, पण त्याला स्वतःलाच या महाराष्ट्र भूमीच्या धुळीत १७०७ मध्ये थकल्या-भागल्या स्थितीत निराश मनाने अखेरचा विसावा घ्यावा लागला. आपल्या पराक्रमाने संभाजी महाराजांनी मराठी स्वराज्य तर राखलंच, पण आपल्या धीरोदत्त मरणानेही त्याचं रक्षण करण्यास ते मराठी सैन्याचे स्फूर्तिदाते ठरले. 'संभाजी महाराजांच्या कार्यकर्तृत्वाचा दर्जा फार मोठा होता. त्यांच्या चारित्र्याला कलंकित करणारे सर्व आरोप असत्य कोटीतील अथवा द्वेषभावनेने कल्पिलेले होते. समकालीन पुराव्यांनी ते तसे ठरतात. उलट तेच आरोप मंत्र्यांनाच लागू पडतात, हे ऐतिहासिक समकालीन साधनांनी सिद्धच होत आहे.' असं श्री.बेंद्रे स्पष्टच म्हणतात. (२७-पृ. ४९६)

अशा वास्तविक परिस्थितीत संभाजी महाराजांनी राज्याचा विध्वंस केला, असं म्हणणं म्हणजे आपण (कारस्थानी सरकारकून) केलेलं पाप लपवण्यासाठी खोट्या कंड्या पिकविणं होय. हा प्रकार केवल व्यक्तिगत नामुष्कीमुळे आलेला अपवाद दूर करण्याचा राजद्रोही प्रयत्न होय, असंही श्री. बेंद्रे नमूद करतात.(२७) स्वराज्याचा विध्वंस संभाजी महाराजांनी केला नाही. तो केला आण्णाजी दत्तो, राहुजी सोमनाथ, प्रल्हाद निराजी, रामचंद्रपंत अमात्य आदी कारस्थानी हिंदू मूलतत्त्ववादी सरकारकून व त्यांच्या बगलबच्चांनी (त्यात मोरोपंतांचं चिरंजीव निळो मोरेश्वर व शंकरजी नारायण वगैरे प्रमुख व्यक्ती व सामान्य ब्राह्मण येत नाहीत.) त्यांना थोरल्या महाराजांनी केलेल्या अनेक लोककल्याणकारी सुधारणा जाचत होत्या व राज्यातील सामाजिक स्थिती पूर्वपदावर नेण्याचा त्यांचा प्रयत्न होता. 'रामचंद्रपंताने हिंदवी स्वराज्याची मूळ उद्दिष्टे व राजपत्रातील, व्यवहारातील वगैरे तपशिलात बदल करून इस्लामी राज्यबंधारणेतील फारसी पदव्या व लेखनात फारशी भाषेतील विचारसरणी, राज्याभिषेक शककालाच्या नोंदीऐवजी सुहुर सनाच्या व इस्लामी तारीख महिन्यांचा पुन्हा वापर केला आणि महाराष्ट्र धर्म महाराष्ट्र राज्य हे देवा ब्राह्मणांचे राज्य या नवीन विचारसरणीचा प्रचार करून जातींच्या आचारधर्मात शिवाजी व संभाजी महाराजांनी केलेल्या सुधारणांना मूठमाती दिली.' (२७) असं श्री. बेंद्रे जे दाखवून देतात त्यावरून हे सिद्धच होत आहे. त्यावरून शिककालातच हिंदू मूलतत्त्ववाद्यांचं ग्रहण स्वराज्यास लागलं होतं, असं

दिसतं. संभाजी महाराजांनी ते आपल्या हयातीत तरी खग्रास होऊ दिलं नाही.

संभाजी महाराजांच्या बाणेदार व तेजस्वी कारकिर्दीचा अत्यंत दुर्दैवी भाग म्हणजे अखिल हिंदुस्थान विरुद्ध छोटे मराठी हिंदवी स्वराज्य, असा अत्यंत विषम सामना झडला असतानाही त्यांनी स्वपराक्रमाने आपलं छोटं राज्य रक्षिलं, त्याकरिता वेदनामय हौतात्म्य पत्करलं; तरी संभाजीराजांना (मुळात तसे नसताना) बराच काळ व्यभिचारी, व्यसनी, राज्य विध्वंसणारे असं ठरवण्यात हिंदू सनातन्यांना यश आलं व ज्यांनी प्रत्यक्ष प्रजाप्रिय राजाला ठार मारण्याचे अनेक वेळा प्रयत्न केले, राजाला पकडून देण्यास शत्रूला मदत केली. ज्यानी राज्याचा मोठा हिस्सा शत्रूला खुशाल देऊन टाकण्याचा स्वार्थी डाव टाकला, बलाढ्य शत्रूशी लढा देण्यापेक्षा भेकडपणे त्यास शरण जाऊन त्याची मांडलिकी पत्करण्याचे व्यूह रचले, ते भ्रष्ट, कपटी, पाताळयंत्री, पीटर पॅन व कूप मंडूक वृत्तीचे मूलतत्त्ववादी, हिंदू सनातनी सरकारकून मात्र इतिहासात करड्या व करारी स्वभावाचे व जाणकार म्हणवून रंगवले गेले. आपले जातीनिष्ठ अनीतिमान, विषमवादी वर्णवर्चस्व येनकेनप्रकारे कायम राखणे हेच ज्यांचे अंतिम ध्येय, त्यांना आमजनतेस प्रगतीपथावर नेणाऱ्या समता, स्वातंत्र्य आदी उज्ज्वल कल्पनांचं कसलं अप्रूप!





## संदर्भ ग्रंथसूची


१) श्रीछत्रपती संभाजी महाराज – इतिहासाचे भीष्माचार्य श्री.वा.सी.बेंद्रे
२) शिवपुत्र संभाजी – डॉ. कमल गोखले
३) छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथ – डॉ. जयसिंगराव पवार
४) शंभूराजे – प्रा. सु. ग. शेवडे
५) विद्रोही तुकाराम – डॉ. आ. ह. साळुंखे
६) महात्म्याची अखेर – जगन फडणीस
७) श्रीशिवछत्रपती संकल्पित शिवचरित्राची प्रस्तावना – त्र्यंबक शंकर शेजवलकर (आराखडा व साधने) अ.नं. ३ येथे नमूद असलेल्या छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथातील खालील नमूद इतिहासकार व इतिहासतज्ज्ञ यांचे लेख इतर ग्रंथासह
८) छत्रपती संभाजी महाराज, काल आणि कर्तृत्व – सेतुमाधवराव पगडी
९) संभाजी आणि पोर्तुगीज – स. शं. देसाई
१०) संभाजी एका राजपुताचा आत्मयज्ञ – गोपाळ नीलकंठ दांडेकर
११) छत्रपती संभाजी व बादशहा औरंगजेब – प्रा. श. श्री. पुराणिक
१२) संभाजीचे दानपत्र व राज्याची वाटणी – प्रा. डॉ. ग. ह. खरे
१३) Sambhaji Rebelled Against His Father - Sir Jadunath Sarkar
१४) इतिहासाच्या दरबारात संभाजी राजा – डॉ. अ. रा. कुलकर्णी
१५) बेंद्रे यांचा संभाजी – प्रा. नरहर कुरुंदकर
१६) छत्रपती संभाजी आणि कवी कलश – डॉ. वसंतराव शं. कदम
१७) छत्रपती संभाजी आणि संस्कृत – डॉ. मा. रा. कंटक
१८) जवानमर्द संभाजी – वि. द. घाटे
१९) संभाजी और कवी कलश का साहित्यिक व्यक्तिमत्व–डॉ. कृष्ण दिवाकर
२०) संभाजी : बादशहास ताजीम न देणारा राजा – ईश्वरदास नागर
२१) युवराज शंभूराजे आणि छत्रपती संभाजी महाराज–प्रा. वसंत कानेटकर
२२) धर्मवीर छ. संभाजी महाराज एक 'डोळस' ललित दृष्टिक्षेप– शिवाजी सावंत
२३) संभाजी आणि रायगड – शां. वि. आवळसकर
२४) छत्रपती संभाजीचे प्रशासन – डॉ. प्र. न. देशपांडे

२५) कृतज्ञ मी कृतार्थ मी - धनंजय कीर
२६) यात्री - डॉ. कुमार सप्तर्षी
२७) श्रीछत्रपती राजाराम महाराज आणि नेतृत्वहीन - वा. सी. बेंद्रे
'हिंदवी स्वराज्या'चा मोगलांशी झगडा
२८) संभाजीराजांनी गोव्यावरील स्वारी -डॉ.पांडुरंगराव सखाराम पिसुर्लेकर
२९) असा लढला शंभूराजाचा किल्ले रामसेज - विजय देशमुख
३०) छत्रपती संभाजी महाराज आणि थोरातांची कमळा -मु. गो. गुळवणी
३१) शिवाजीपेक्षा दहापटीने अधिक तापदायक राजा-महंमद हाशिम खाफीखान
३२) शूरवीर छत्रपती संभाजी महाराज - म. म. दत्तोवामन पोतदार
३३) मराठी बखर-वाङ्मयातील संभाजीराजे - डॉ. मु. श्री. कानडे
३४) संभाजी महाराजांच्या गोव्यातील स्वारीची पोर्तुगीज साधने - डॉ. वि.
त्र्यं. गुणे
३५) पुरोहितवर्ग वर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास-डॉ. सुमंत मुरंजन
३६) मराठेशाहीचा मागोवा - डॉ. जयसिंगराव पवार
३७) 'संभाजीराजांचे दिलेरखानाकडे जाणे' - ॲड. अनंत वि. दारवटकर
छत्रपतींची राजकीय खेळी
३८) युवराज संभाजी - डॉ.कमल गोखले
३९) कवीकलशाच्या चरित्र्याचा वास्तवाचा शोध - डॉ. वसंत केशव मोरे
४०) छत्रपती संभाजी आणि शहाजादा अकबर - स. मा. गर्गे
४१) छत्रपती संभाजी- एक रणझुंजार युद्धनेता - ले.कर्नल डॉ. म. ग.
अभ्यंकर
४२) छत्रपती श्रीसंभाजी महाराज जयंती उत्सव-ॲड. अनंत वि. दारवटकर
यांचा सन २००३ - स्मरणिका विशेषांक लेख

○○○





## इतिहास संशोधक आनंद घोरपडे

सुमननगर, मुंबई येथील स्मृतिशेष
दि. १३ मे २०१६ रोजी चेंबूर, सुमननगर, मुंबई येथील स्मृतिशेष यांची भेट घेतली.
आनंद घोरपडे यांच्या घरी त्यांच्या पत्नी हेमलता घोरपडे यांची भेट घेतली.
त्यावेळी माझ्यासोबत किशोर कडूही होते.
आनंद घोरपडे सर व त्यांच्या साहित्याची माहिती घेणे हा या मागचा
उद्देश होता. अत्यंत अगत्याने त्यांनी आमचे स्वागत केले. त्यावेळी त्यांच्या
सूनबाईही सोबत होत्या. आनंद घोरपडे यांच्याविषयी अत्यंत आदर व प्रेमाने
त्यांनी माहिती दिली. त्यांच्या सहजीवनाच्या व परखड स्वभावाच्या आठवणी
सांगताना काही वेळ त्या भावूकही झाल्या. घोरपडे सरांसारखाच करारी व
परखडपणा त्यांच्यात दिसून आला. त्यांच्या संग्रहातील डॉ. बाळकृष्ण यांचे
'शिवाजी द ग्रेट' हे शिवचरित्र त्यांनी अगत्यपूर्वक भेट दिले. डॉ. बाळकृष्ण
यांनी १९३२ साली चार खंडात इंग्रजी भाषेत शिवचरित्र लिहिले आहे.
कोल्हापुरात आनंद घोरपडे यांचे वडील बाळासाहेब घोरपडे यांच्या घरात डॉ.
बाळकृष्ण राहत होते, अशी आठवणही हेमलता घोरपडे यांची सांगितली.
नुकतेच इतिहास अभ्यासक इंद्रजित सावंत यांनी परिश्रमपूर्वक हे 'शिवचरित्र'
पाच खंडात प्रास्तावनेसह प्रसिद्ध केले आहे.
२००३ मध्ये पुणे येथील शिवधर्म बंगल्यावर प्रवीण गायकवाड
यांच्या सोबत आनंद घोरपडे पुरुषोत्तम खेडेकर साहेबांना भेटावयास आले होते.
या भेटीत माझा व घोरपडे सरांचा परिचय झाला. खेडेकरसाहेबांसोबत त्यांची
अनेक विषयांवर चर्चा झाली. मराठा सेवा संघाचे प्रबोधन व परिवर्तनाचे कार्य
ऐतिहासिक असल्याचा निर्वाळा त्यावेळी बोलताना आनंद घोरपडे यांनी



दिला. मराठा व बहुजन समाजात मराठा सेवा संघाचे विचार रुजवण्याची गरज असल्याचेही त्यांनी प्रतिपादन केले.

पुण्यातील खेडेकर साहेबांचे निवासस्थान 'शिवधर्म बंगला' म्हणजे एक क्रांतिविचारांचे प्रेरणास्थान होते. देशभरातील साहित्यिक, इतिहासकार, प्रबोधनकार व चळवळीतील नेते कार्यकर्ते यांची नेहमी वर्दळ बंगल्यावर असायची. चर्चा-संवाद यातून अनेक नवे विषय समोर येत असत. या विचारांच्या परिवाराशी आनंद घोरपडे जोडले गेले.

वयाच्या शहात्तराव्या वर्षीसुद्धा त्यांचा उत्साह प्रचंड होता. विविध विषयांवरील त्यांची मते चळवळींना पुरक होती. छत्रपती शिवाजी महाराज, छत्रपती संभाजी महाराज व राजर्षी शाहू महाराज यांच्या इतिहासाची त्यांची मांडणी अभ्यासपूर्ण होती. शाहू महाराजांच्या विचार प्रभावातून त्यांची जडणघडण झाली असल्याचे सहज जाणवत होते.

'साप्ताहिक चित्रलेखा'चे संपादक ज्ञानेश महाराव यांनी आनंद घोरपडे यांची 'शिवछत्रपती : समज अपसमज' व 'स्वराज्य रक्षक छत्रपती संभाजी' ही दोन पुस्तके चित्रलेखातून क्रमशः प्रकाशित करून खूप मोलाचे कार्य केले. त्यामुळे आनंद घोरपडे यांचे विचार व लेखन महाराष्ट्राला माहीत झाले. छत्रपती संभाजी राजांवरील लेखमालेवर खूप चर्चा झाली.

आनंद घोरपडे यांचा जन्म ६ डिसेंबर १९२७ रोजी मुधोळ संस्थान (कर्नाटक) येथे शेतकरी मराठा कुटुंबात झाला. मृत्यू १७ नोव्हेंबर २००९



झाला. एकंदर ८२ वर्षांचे आयुष्य त्यांना लाभले.

आनंद घोरपडे हे इतिहासाचे विद्यार्थी होते. त्यांचे शिक्षण कोल्हापूरच्या राजाराम कॉलेज येथे झाले. त्यांच्यावर शाहू विचारांचा मोठा प्रभाव होता. इतिहाससंशोधनाच्या क्षेत्रात काम करण्याची त्यांची इच्छा होती. पोलीस खात्यात २० वर्षे व त्यानंतर महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळात सेवा बजावून उपसंचालक म्हणून निवृत्ती घेतली. त्यानंतर ते आपल्या आवडीच्या इतिहास या विषयाकडे वळले. छत्रपती शिवाजी महाराज यांच्यावरील पुस्तकाचे लिखाण केले.

साताऱ्याच्या हेमलता भोसले यांच्याबरोबर आनंद घोरपडे यांचा २५ मे १९५२ ला विवाह झाला. उदयसिंह व मंगला ही त्यांची मुले. मुलगा उदयसिंह याने औषधशास्त्रात पीएचडी केलेली आहे. २१ मार्च २०१३ रोजी त्यांचा मृत्यू झाला. अमरसिंह व मृणाल ही त्यांची मुले मुंबईत नोकरी करतात. आनंद घोरपडे यांचे वडील बाळासाहेब दत्ताजी घोरपडे व आई विमलाबाई हे शाहू विचारांचे पाईक होते. सत्यशोधक चळवळीतही बाळासाहेब घोरपडे सक्रीय होते. त्यांनी बांधकाम खात्यात नोकरी केली. बाळासाहेबांना वाचन-लेखनाची आवड होती. हा संस्कार व पुरोगामी वारसा आनंद घोरपडे यांना वडिलांकडून मिळाला. आनंद घोरपडे यांना शिकारीचा छंद होता. जावळीच्या खोऱ्यात असलेल्या गावातील लोकांना वाघ त्रास देत होता. १९५२ साली त्यांनी वाघ मारला. शिकार केलेल्या वाघासोबतचा त्यांचा फोटो हेमलता घोरपडे यांच्या संग्रहात आहे.

शिकारीबरोबर चित्रकलेचीही त्यांना आवड होती. छत्रपती शिवाजी महाराजांवर त्यांनी खूप रेखाचित्र काढली आहेत. ते उत्तम शिल्पकारसुद्धा होते.

१९८५ ला सेवानिवृत्त झाल्यानंतर त्यांनी स्वतःला लेखन संशोधनात गुंतवून घेतले. इतिहासावर महत्त्वाची पुस्तके लिहिली. उतार वयातही जिद्द कायम ठेवून लेखन करण्याचे त्यांचे कार्य प्रेरणादायक आहे.

मराठा बहुजन समाजात सेवानिवृत्तीनंतर बहुसंख्य लोक केवळ मृत्यूची वाट पाहत राहतात. काही जण विनाकारण घरातच लुडबूड करून अडगळ बनून वावरत असतात. अशांनी घोरपडे सरांचा आदर्श घेण्याची गरज आहे. लेखन, साहित्य, कला, अथवा कोणताही विधायक छंद जोपासला पाहिजे. एखाद्या परिवर्तनवादी चळवळीत पूर्णवेळ काम केले पाहिजे. त्यामुळे शरीर व

मन सतेज राहून दीर्घायुष्य लाभेल, यात शंका नाही.

आनंद घोरपडे यांनी मोजकेच, पण महत्त्वाचे लिखाण केले आहे. आपला विचार त्यांनी या माध्यमातून प्रवाहित ठेवला आहे. त्यांची बहुजन समाजाच्या उत्थानाची तळमळ व जिद्द त्यांचे साहित्य वाचताना दिसून येते.

घोरपडे सरांची ही पुस्तके लोकांपर्यंत नेण्याची जिजाई प्रकाशनचे किशोर कद्दू यांची मनिषा होती. हेमलता घोरपडे यांनी या कल्पनेचे हार्दिक स्वागत केले. नव्या स्वरूपात जिजाई प्रकाशनाच्या वतीने ही पुस्तके प्रकाशित होत आहेत, ही खूप चांगली गोष्ट आहे. निश्चितच या विचाराचे स्वागत वाचक करतील, असा विश्वास वाटतो.

दि. ७ सप्टेंबर २०१६ **– गंगाधर बनबरे, पुणे**

**संभाजी** महाराजांच्या बाणेदार व तेजस्वी कारकीर्दीचा अत्यंत दुर्दैवी भाग म्हणजे कैद होईपर्यंत हिंदवी स्वराज्याचा कोणताही गड अथवा प्रदेश मोगलांच्या हाती पडला नव्हता. उलट उत्तरेकडील व दक्षिणेकडील मोगली प्रदेशच संभाजीराजांनी मिळवला होता. त्यांनी स्वपराक्रमाने आपलं छोटं राज्य रक्षिलं. त्याकरिता वेदनामय हौतात्म्य पत्करलं; तरी संभाजीराजांना (मुळात तसे नसताना) बराच काळ व्यभिचारी, व्यसनी, राज्य विध्वंसणारे असं ठरवण्यात हिंदू सनातन्यांना यश आलं. आणि ज्यांनी प्रत्यक्ष प्रजाप्रिय राजाला ठार मारण्याचे अनेक वेळा प्रयत्न केले, राजाला पकडून देण्यास शत्रूला मदत केली, ज्यांनी राज्याचा मोठा हिस्सा शत्रूला खुशाल देऊन टाकण्याचा स्वार्थी डाव टाकला, बलाढ्य शत्रूशी लढा देण्यापेक्षा भेकडपणे त्यास शरण जाऊन त्यांची मांडलिकी पत्करण्याचे व्यूह रचले, ते भ्रष्ट, कपटी, पाताळयंत्री, सनातनी सरकारकून मात्र इतिहासात करड्या व करारी स्वभावाचे व जाणकार म्हणवून रंगवले गेले.

असे का घडले?



www.jijaiprakashan.com





ISBN 9788194984849

₹ 140/-